# इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे व स्त्रियांचे

# पोवाडे.

हें पुस्तक

इतिहासप्रिय जनांच्या रंजनासाठीं

**ह्यारी आर्बुथ्नॉट आक्वर्थ, सी. एस्.**

मुंबईच्या "आन्थ्रॉपॉलॉजिकल सोसायटी"चे उपाध्यक्ष

व

**शंकर तुकाराम शालिग्राम,**

ह्यांनीं तयार करून



पुणें येथें

"आर्यभूषण" छापखान्यांत छापविलें.

आवृत्ति दुसरी.

१९११.

किंमत दीड रुपाया.

# प्रस्तावना.

वृद्ध लोकांची पोवाड्यांवर भक्ति दिसते तशी तरुण लोकांची दिसत नाहीं. पोवाड्यांचा संग्रह पाहिला तरी जुन्या लोकांतच काय तो आढळून येइल. म्हातारे गोंधळी अथवा म्हातारे भराडी वगैरे यांजपाशीं मात्र कांहीं पोवाडे उरले आहेत.

इतिहासाची मागील माहिती समजून घेण्यास हल्लीं जसें साधन आहे तसें यापूर्वी कांहींच नसून फक्त जुन्या माणसांच्या तोंडून मात्र गोष्टीच्या रूपानें किंवा या पोवाड्यांच्या रूपानें ऐकून घेण्यास जागा होती. त्या वेळीं समजूतदार व माहीतगार अशा उदार मनाच्या पुरुषांनीं या पोवाड्यांच्या रूपानें मागील सर्व इतिहास कालरूप सागरांतून तारला ! अलीकडील इतिहासापेक्षां पोवाड्यांतील माहितीवर अधिक भरंवसा ठेवण्यास जागा आहे. कारण पोवाड्यांतील वर्णन बहुतेक कवींनीं आपल्या माहितीनें मिळविलेलें असून त्यांत असत्याचा समावेश थोडा. अलीकडील इतिहास परदेशस्थ लोकांनीं लिहिलेले असून ती माहिती अपुरी असते. पोवाड्यांपासून ऐतिहासिक ज्ञान होण्याचा सुमार आहे तसेंच प्राचीन काळचे रीतिरिवाज, लोकांची अभिरुचि, रागद्वेष इत्यादि गोष्टी समजून येण्यासही जागा आहे. याखेरीज भाषेचे संबंधानें अपूर्व माहिती मिळून शब्दवैचित्र्यही अद्भुत दृष्टिगोचर होतें. त्या काळचा इतिहास लिहूं जाणें असल्यास हें वाचन किंवा पठण अत्यंत श्रेयस्कर आहे.

पोवाड्यांच्या पुस्तकाची ही आवृत्ति निघण्यास **मेहेरबान एच. ए. आक्वर्थसाहेब** बहादूर, मुंबईचे म्युनिसिपल कमिशनर, हे कारण झाले आहेत. माजी **ग्रांट डफसाहेबांनीं** अव्वल इंग्रजींत 'मराठ्यांची बखर' छापून काढतेवेळीं जसे अत्यंत परिश्रम करून आम्हां महाराष्ट्रीयांचा इतिहास पूर्ण केला, त्याचप्रमाणें मराठ्यांचा खरा इतिहास उपलब्ध होण्यास साधन जे पोवाडे, ते मिळतील तितके मिळवून प्रसिद्ध करण्यांत **मे० एच० ए० आक्वर्थसाहेब** यांचाही सारखा उद्योग चालू आहे. माजी **ग्रांट डफ-साहेबांविषयीं** आम्हां महाराष्ट्रीयांची जितकी पज्य बुद्धि आहे तितकीच

किंबहुना त्यांच्याहूनही जास्त पूज्यबुद्धि **मे० आक्वर्थसाहेब** यांजविषयीं होणें साहजिक आहे. कारण मार्जी **ग्रांट डफसाहेबांनीं** ज्या वेळीं 'मराठ्यांची बखर' प्रसिद्ध करण्याचीं साधनें या देशांत मिळविलीं, त्या वेळा मराठ्यांचे पराक्रम आणि त्यांनीं केलेल्या शूरत्वाच्या गोष्टींची कीर्ति प्रांताप्रांतांत गर्जत होती, ती गर्जना आतां लोपली ! कारण त्या कालास चारपांच तपें लोटून गेलीं. आतां त्या गर्जनेकडे कोणाचें लक्ष जावें अशी स्थिति उरली नाहीं. त्यांतूनही परद्वीपस्थांचें चित्त त्या गर्जनेकडे वेधावें हें तर महदाश्चर्य आहे. त्यांच्या मनाच्या थोरपणाविषयीं यापेक्षां आणखी दुसरी साक्ष कोणती पाहिजे ! इतिहास समजून घेणारास मराठ्यांच्या बखरींचा लांबटपणा पाहून कंटाळा येण्याचा संभव आहे. तसा पोवाड्यांचा कंटाळा मुळींच येणार नाहीं. मिळतील तितके पोवाडे छापल ह्मणजे इतिहास रचणारास सुलभ साधन होईल ह्मणून **मे. एच्. ए. आक्वर्थसाहेब** बहादूर यांनीं जे अश्रांत श्रम केले त्यावरून त्यांची परोपकारबुद्धि आणि या राष्ट्राविषयींची आदरबुद्धि दिसून येते. साहेबबहादुरांनीं आपले प्रसिद्धिपत्रांत[1] गोंधळ्यांविषयीं उल्लेख

---

१ हें प्रसिद्धिपत्र सन १८८७ च्या एप्रिल महिन्यांत सर्व सरदारांकडे पाठविलें होतें, तें प्रसिद्धिपत्र येणेंप्रमाणें:—

"या गतकाळांत पोवाड्यासारख्या कवनाकडे कोणी लक्ष दिलें नाहीं या गोष्टीचा, मला वाटतें, सर्व सुशिक्षित हिंदु गृहस्थांना खेद झाला पाहिजे. परंतु याबद्दल विशेष खेद म्हटला म्हणजे मराठ्यांचे वंशांतील लोकांना झाला पाहिजे, आणि मुख्यत्वेंकरून इतिहासप्रसिद्ध जे मोठे प्रमुख घरंदाज व मोठे किताबवाले मराठे लोक आहेत व ज्यांची आज दक्षिणेंतील सरदारांमध्यें गणना होत आहे त्यांना तर तो खेद झालाच पाहिजे. शिवाजीमहाराजांबरोबर स्वराज्यनिष्ठेला जीवनकला आली. त्यांचे लागोपाठ जे राजे व पेशवे झाले त्यांच्या कारकीर्दींत ती विस्तृत होऊन जोरावली. तिच्या अद्भुत उद्भवाबरोबर, पहाडीलोकांत खरोखर ज्याप्रमाणें यावें त्याप्रमाणें कविताशक्तीचें स्फुरण मराठ्यांचे ठायीं आलें. तें आपणास आज अगणित पोवाड्यांचे रूपानें दिसत आहे. ते सर्व पोवाडे गोंधळीलोक बहुतकरून अजूनही गात असतील आणि महाराष्ट्रांतील शहरांत व खेड्यांत इतर लोकही गात असतील; परंतु देशांतील विद्याधनाला व ऐतिहासिक संपत्तीला भर घालण्याकरितां त्यांचा संग्रह व निवड करण्याची आणि ते प्रसिद्ध करण्याची, कोणीच मेहनत आजपर्यंत घेतली नाहीं. यांत कांहीं मी विशेष सांगत आहें असें नाहीं. जें मी सांगत आहें तें सर्वांस माहीत आहेच. + + + + + +

( पुढें चालू )

केला आहे; तसेंच ता० २६ फेब्रुवारी सन १८८७ चे ‘टाइम्स् ऑफ् इंडिया’ पत्रांतही गोंधळ्यांविषयीं त्यांनीं लिहिलें आहे कीं, ज्या गोंधळ्यांनीं महाराष्ट्रीयांचा इतिहास वांचविला नसता तर आह्मी त्या इतिहासास आज मुकलों असतों, त्या गोंधळ्यांचा उपकार केवढा मानावा आणि त्यांची योग्यता किती वर्णावी ! तर त्यांचेविषयीं येथें दोन शब्द लिहिणें इष्ट आहे.

‘गोंधळी’ आणि ‘भराडी’ हे गोंधळांत आणि भराडांत देवाचीं पांच नांवें घेतल्यावर कांहीं कथाभाग लावितात. त्या कथाभागांत थोरांचीं चरित्रें सांगण्याचा बहुतेक संप्रदाय आहे. तीं चरित्रें बिनचूक सांगतां यावीं ह्मणून पोवाडे पाठ करून त्यावर कथा लावतात. गोंधळ घालण्याचा प्रघात फार दिवसांपूर्वीं पडला असावा असें दिसतें. **नामदेवानें** ‘गोंधळ’ म्हणून एक कवन केलें आहे. त्यांत तर मत्स्यावतारापासून सर्व दहा अवतारांपर्यंत गोंधळ केले ह्मणून ह्मटलें आहे. गोंधळी गोंधळांत सांगतात कीं, “श्रीजगदंबेनें दैत्यांचें निर्दाळण केलें त्या वेळीं आकाशमंडप देऊन ब्रह्मा, विष्णु, महेश यांनीं तेहेतीस कोटी देवांपुढें गोंधळ केला.” ‘गोंधळ मांडिला निजरूप मायेचा०’. गोंधळी हे हिंदु धर्माचे. हे मराठ्यांच्या हातचें जेवतात. रोटीव्यवहार होतो, पण बेटीव्यवहार होत नाहीं. बेटीव्यवहार गोंधळी जातींतच

---

( मागील पृष्ठावरून समाप्त. )

विद्याचारसंपन्नता आणि तिच्या अनुषंगानें होणाऱ्या उपयुक्त सुधारणा यांचें पाऊल पुढें असणें हें, व विशेषेकरून पायरस्ते आणि आगगाड्या होऊन दळणवळणाच्या साधनांनीं समृद्धि होणें हें, (ह्यापासून इतर काय फायदे असतील ते असोत), अशा तऱ्हेच्या ग्रंथाच्या वृद्धीस व रक्षणास अनिष्ट आहे. पोवाड्यांपैकीं पुष्कळ पोवाडे अमूल्य आहेत. त्यांचें रक्षण करून त्यांस जर या वेळीं शाश्वत करून ठेवण्याचे छापाल्यानें प्रयत्न झाले नाहींत तर थोड्याच काळांत ते गडप होण्याचा बराच संभव आहे. यास्तव या कामांत आपलें साहाय्य व वजन यांचा लाभ मला मिळेल या उत्कट आशेनें हें विनंतिपत्र मी आपणास लिहिण्याचें साहस करीत आहें. + + + +

नेकनामदार गव्हर्नरसाहेब लॉर्ड री यांस या विषयाची फार गोडी आहे. आणि आपण मला यथाशक्ति मदत करावी अशी त्यांची इच्छा आहे हेंही त्यांच्याच परवानगीनें मी आपणास सुचवीत आहें.”

आपला आज्ञाधारक सेवक,

**एच. ए. आक्वर्थ.**

परस्परांत होतो. राजस्थानांत भाटलोक जसें शूरांचीं कथनें कथून राष्ट्रास स्फुरण उत्पन्न करीत असत, तसाच प्रकार गोंधळ्यांच्या पोवाड्यापासून होई. पेशवाईत गोंधळावर मराठे लोकांच्या मुरकुंडी पडत. तसा प्रकार आतां नाहीं. "त्या भाकड कथा काय ऐकायच्या" असें म्हणून मराठे मंडळ गोंधळांत बसत नाहीं. अरसिक मंडळीस इतिहासाचा आणि कथापुराणाचा कंटाळा येतो, तसाच हा प्रकार होय. हल्लीं मन्वंतर बदलल्यामुळें घरदाज मराठ्यांस युद्धवार्ता कानांनीं ऐकण्याचा कंटाळा येऊं लागला आहे. पेशवाईत गोंधळ इतके होत कीं, गोंधळ घालतां घालतां गोंधळ्यांस उमासा येई. त्यांस फुरसत मिळत नसे. असे गोंधळ आतां मुळींच होत नाहींत, फारच कमी होतात. म्हणून गोंधळ्यांस निर्वाहासाठीं तमाशे करावे लागतात. तमाशे करतात तरी त्यांचा चांगलासा निर्वाह होत नाहीं. पेशवाईत गोंधळ्यांस देणगीही फार मिळे. कडीं, तोडे, गाठे, चौकडे, शेले, दुपेटे इत्यादि देणग्या मिळत. प्रत्येक गोंधळांत शेलापागोटेंतर मिळतच असे. आणि जेवणखाण्याची रेलचेल होत असे. गोंधळी गोंधळांत पोवाडे म्हणतात तसेंच भराडी, वाघे आणि चित्रकथी हेही पोवाडे म्हणतात. इतर जातीचे तमासगीर हे क्वचित पोवाडे म्हणतात. गोंधळी जगदंबेची भक्ति करून गोंधळ घालतात. तसेंच भराडी भैरवनाथाची भक्ति करून भराड घालितात. भराडी भराड घालतेवेळीं पोवाडे ह्मणतात. वाघेमुरळ्या खंडोबाची भक्ति करून खंडोबाचीं आणि ह्माळसाबाणाईचीं गाणीं गातात. प्रसंगीं पोवाडेही ह्मणतात. गोंधळी संबळ, तुणतुणें हीं वाद्यें घेऊन पोवाडे ह्मणतात. भराडी डौरावर पोवाडे ह्मणतात आणि वाघेमुरळ्या खंजिरी मंजिरी घेऊन पोवाडे ह्मणतात. तसेंच चित्रकथी ढोलकें आणि एकतारी हीं वाद्यें घेऊन पोवाडे ह्मणतात. गोंधळी, भराडी, वाघे, चित्रकथी आणि बहुरूपी असे पोवाडे ह्मणतात ह्मणून सांगितलें. पण त्यांत गोंधळ्यांचेंच नांव सर्वश्रुत आहे, याचें कारण रसज्ञ वाचकांकरितां थोडक्यांत सांगतों.

गोंधळ्यांची जात फार काळामागें प्रसिद्धीस आली आहे. सुमारें शंभर वर्षांपूर्वीं गोंधळ्यांत **रामा गोंधळी** ह्मणून होऊन गेला. तो प्रतिगंधर्वच होता. पेशवाईचे अखेरीस तो पुण्यांत प्रसिद्धीस आला. त्याच्या ह्मणणीची योग्यता अप्रतिम होती. त्याच्या गोड सुरावर पुणेंशहर इतकें लुब्ध होऊन गेलें होतें कीं,

त्याच्या तमाशाभोंवतीं हजारों माणसांची गर्दी होऊन जाई! पावं पाव मैल-पर्यंत त्याच्या तमाशाभोंवतीं मनुष्यांचें कडें पडत असे म्हणून म्हणतात. त्याच-प्रमाणें त्यास देणग्याही अशा मिळत कीं, त्या ऐकल्या तर खऱ्या देखील वाटत नाहींत. या रामा गोंधळ्याच्याच लौकिकानें गोंधळ्यांची जात विशेष प्रसिद्धीस आली आहे. पेशवाई नष्ट झाल्यावर रामा गोंधळी पुणें सोडून गायकवाडांची राजधानी बडोदें शहर येथें गेला. तेथें श्रीमंत **सयाजीरावमहाराज गायकवाड** हे गुणीजनांचा सत्कार करण्यास बसलेच होते. त्यांनीं रामा गोंधळी स्वर्गलोकींचें गंधर्वरत्नच म्हणून त्यास जवळ बाळगिलें. पुण्यांतील राजाश्रय नाहींसा झाला म्हणून बहुतेक गुणी मंडळी बडोद्यास गेली. तेथें ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें देणगी देऊन परामर्ष घेतला हें गायकवाड सर-कारास भूषण होय. पेशवाई लयास गेल्यावर बडोदें शहर हें महाराष्ट्रीयांचें माहेरघर बनून तेथें गुणी जनांची चहा चांगली झाली, म्हणून पुष्कळांनीं बडोदें शहरचा रस्ता सुधारला. हा प्रकार **खंडेरावमहाराज गायकवाड** यांचे कारकीर्दीपर्यंत चालला. **मल्हाररावमहाराज गायकवाडांचे** वेळीं तो धरबंध सुटून सर्वत्र अव्यवस्था झाली. जुन्या राजाश्रित अमोलिक आणि दुर्भिळ अशा रत्नांस दुखवून बडोदें शहरांतूनही घालविलें. ही गोष्ट मल्हाररावमहाराजांनीं फारच अनुचित केली. त्याचें प्रायश्चित्त त्यांस भोगावें लागलें.

गायकवाडींत गुणवानांचा योग्य सत्कार होत आला म्हणून वर तारिफ केली; ती आम्हींच केली असें नाहीं तर "फंदी अनंत कवनांचा सागर" यांनींही तसेंच म्हटलें आहे. अनंतफंदी यांस बडोद्यास पांचशें रुपयांचें वर्षासन चालू झालें असून तें अद्यापपर्यंत फंदींच्या वंशजांकडे चालू आहे. बडोद्यास स्वराज्य आहे म्हणून देशी गुणास आणि कौशल्यास एक आश्रयस्थान आहे. मराठी भाषेचा अभिमान बाळगणारे असे संस्थानिक दक्षिणेंतही आहेत; पण गुणाची आणि कौशल्याची चहा करून त्या गुणीजनांस पदरीं बाळगून ठेवण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत थोडें. यामुळें गुणीजनांची चाड व्हावी तितकी होत नाहीं असें दिसतें.

१ या पुस्तकाचे तिसरे भागांत अनंतफंदींचा पोवाडा आहे.

रामा गोंधळी बडोद्यास फारच नांवास चढला होता. आणि आज जें गोंधळ्यांचें नांव चहूंकडे गाजत आहे व गोंधळ्यांजवळ लोकरंजनाची पुंजी जी आहे तिचें कारण रामा गोंधळी व त्याचे आश्रयदाते गायकवाड सरकार हे आहेत. सयाजीमहाराजांचे वेळीं रामा गोंधळी, कुशाबा घोंगडे हे पुण्याहून जाऊन राजाश्रयावर वाढले. त्या लौकिकावर अझूनपर्यंत नामांकित गोंधळ्यांचे फड बडोद्यास जातात, व त्यांस तेथें आश्रय मिळतो. आज साठ वर्षांत रामा गोंधळ्यावर वरचढ असा दुसरा निपजला नाहीं. सगनभाऊची लावणी अशी रामानेंच म्हणावी. अडाख्याच्या ह्मणणीचा रामा गोंधळ्याचा मोठा लौकिक होता. रामा गोंधळ्यामागें तुकाराम गोंधळ्यानेंही बडोद्यास नांव मिळविलें. तुकारामामागें माधव आहे. यानें हल्लींचे महाराजांवर पोवाडा केला आहे. पुण्याचा उदाजी पांडु गोंधळी, संगमनेरचा राणबा गोंधळी, आळेकर गोंधळी इत्यादि अनेक गायकवाड सरकारचे आश्रित होऊन राहिले आहेत. या पुस्तकांतील बहुतेक पोवाडे गोंधळ्यांच्या तोंडून ऐकिले आहेत. ते गोंधळी गायकवाड सरकारचे आश्रित आहेत. त्यावरून असें दिसतें कीं, गायकवाडी नसती तर गोंधळ्यांस डफ, तुणतुणें ठेवून देऊन नांगराचा मुठ्या धरावा लागला असता. आज जें गोंधळ्यांचें नांव राहिलें आहे तें गायकवाडीमुळेंच आहे. इंग्रजांचा बावटा पुण्यास लागला त्या वेळीं बडोद्यास श्रीमंत सयाजीराव महाराजांची कारकीर्द असून बडोदें हें पुण्यनगरच बनून राहिलें होतें. मराठी भाषा तेथील राषदींत केवळ गुंतून राहिलेली होती.[1] नाहीं तर स्वराज्याबरोबर तिचाही लय झाला असता. सारांश, आजपर्यंत जे पोवाडे तगले ते गायकवाडीमुळेंच तगले असें आम्ही म्हणतों.

आजपर्यंत पुष्कळ गोंधळ्यांच्या तोंडचे पोवाडे आम्हीं ऐकले आहेत. त्यांत समशेरपूर, पिंपळवंडी, आळें, ओतर, जुन्नर, खेड, चास, अकलुज, अहमदनगर, पाटस, पुणें, सातारा, फलटण, मिरज, सांगली, शिरोळ इत्यादि ठिकाणच्या गोंधळ्यांचे तोंडून ऐकले आहेत. पोवाडे ऐकण्याचा छंद लहानपणींच होता. पुढें परमप्रिय मित्र कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर, निबंधमालाकार,

---

१ रा. ब. दादोबा पांडुरंग यांच्या मोठ्या व्याकरणांतील प्रस्तावना पहावी.

यांचे संगतींतही ता छंद वाढला गेला. कै० विष्णुशास्त्री यांचे बंधु आणि चुलते आदिकरून रासिक मित्रमंडळीबरोबर पोवाडे ऐकण्याची हौस पुरवून घेतली.

अनुकरणाकडे मनुष्याची प्रवृत्ति साहजिक व बलवत्तर आहे तर लहानपणापासून इतिहासचरित्रें वाचण्याची गोडी लागेल तर किती हितावह होईल ! सदाचरणप्रीति व खरा थोरपण मनांत बिंबण्यास याखेरीज दुसरें कोणतें साधन आहे ? राजांजे पदरीं भाट बाळगीत असत त्याचें कारण फक्त अनकरणेच्छाच होय.

श्रीमंत महाराज गायकवाड सरकार आणि त्यांचें सरदारमंडळ तसेंच सांगली, मिरज, येथील पटवर्धनमंडळ हे दर शिमग्यांत आपल्या आश्रित गोंधळ्यांकडून पोवाड्यांची झडती घेत जातील तर फार चांगलें होईल. पोवाडे तरण्यास हाच चांगला उपाय दिसतो.

पोवाडे मिळवून देण्याचे कामांत पहिल्या प्रतीची मदत श्रीमंत बापुसाहेब निंबाळकर, फलटण संस्थानचे आधपात, यांजकडून मिळाली म्हणून त्यांचे नांवाचा उल्लेख करण्यास मोठा संतोष वाटतो. त्यांनीं आपले संस्थानांतील वकील रा. रा. अंताजीपंत यांस मदतीचे कामगिरीवर नेमून दिलें होतें. त्यांनीं मनःपूर्वक झटून जी मदत केली तिचे उतराई होणें ह्मणजे सर्व वाचकांस त्यांची ओळख करून देणें होय. श्रीमंत सचीवपंत आणि श्रीमंत पंतप्रतिनिधि यांनीं मिळतील तितके पोवाडे गोंधळ्यांकडून उतरून घेऊन पाठविले त्याबद्दल त्यांचे आभार मानणें इष्ट आहे. ह्या पोवाड्यांचा सादर स्वीकार करून या पुस्तकांत घेतले आहेत, व कांहींचा पाठभेदासाठीं उपयोग केला आहे. सांगली संस्थानचे कारभारी रा. ब. वैद्य आाण मिरज संस्थानचे कारभारी रा. ब. चित्रे यांनीं आपले संस्थानांतलि गोंधळी आमचेकडे पाठविले याबद्दल त्यांचे उपकार मानितों. साताराचे श्रीमंत रा. रा. दाजीराव शिरके यांनीं तानाजी मालुसरे यांनीं सिंहगड घतल्याचा पोवाडा मिळवून देण्यासाठीं विशेष खटपट केली. कै. श्री. **बळवंतराव**

---

१ रावसाहेब सीताराम हरि चिपळूणकर.

**विनायकशास्त्री** ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन ह्यांनींही पोवाडे मिळवून देण्याच्या कामीं साह्य केलें हें येथें सांगितल्यावांचून राहवत नाहीं. रा. रा. **पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी** व रा. रा. **काशिनाथ पांडुरंग परब** ह्यांनीं हें पुस्तक छापतेवेळीं जें साह्य केलें तें अवर्णनीय आहे. त्याप्रमाणेंच निर्णय-सागर छापखान्याचे मालक ह्यांनीं हें पुस्तक उत्तम रीतीनें छापून दिलें त्याबद्दल त्यांचेही उपकार मानणें योग्य आहे.

मुंबई,
ता. १० जानेवारी १८९१.

**शंकर तुकाराम शाळिग्राम.**



# अनुक्रमणिका.

## भाग पहिला.

### मराठे छत्रपति राजे.


| अनुक्रम. | विषय. | पृष्ठ. |
|---|---|---|
| १ | शिवाजीमहाराजांनीं अबदुलखानास मारिलें. ... ... ... | १ |
| २ | तानाजी मालुसरे यानें सिंहगड घेतला. ... ... ... ... | २१ |
| ३ | बाजी पासलकर. ... ... ... ... ... ... ... | ६१ |
| ४ | प्रतापसिंह व शाहाजीमहाराज यांचें स्वरूपवर्णन. ... ... | ६६ |
| ५ | प्रतापसिंहमहाराज शिकारीस गेले. ... ... ... ... | ६८ |
| ६ | प्रतापसिंहास इंग्रज सरकारांनीं पदच्युत केलें. ... ... ... | ६९ |
| ७ | प्रतापसिंहास इंग्रज सरकारांनीं काशीस पाठविलें. ... ... | ७२ |
| ८ | प्रतापसिंह काशीस गेल्यावर त्यांच्या राणीनें केलेला शोक. ... | ७४ |
| ९ | प्रतापसिंहाचे पुत्र जंगलीराजे यांचा जन्म. ... ... ... | ७८ |
| १० | प्रतापसिंहाचे धाकटे बंधु शाहाजीराजे गादीवर बसले. ... ... | ८० |
| ११ | शाहाजीराजांचे स्वारीचा थाट. ... ... ... ... ... | ८२ |
| १२ | सातारकर छत्रपति व त्यांचे सरदार. ... ... ... ... | ८३ |
| १३ | आबामहाराजांस सयाजी मोहित्यानें मारिलें. ... ... ... | ८६ |
| १४ | सामानगडच्या गडकऱ्यांनीं बंड केलें. ... ... ... ... | ९१ |
| १५ | त्याच विषयावर दुसरा पोवाडा. ... ... ... ... ... | ९८ |
| १६ | त्याच विषयावर तिसरा पोवाडा. ... ... ... ... ... | १०० |


## भाग दुसरा.

### पेशवे.


| | | |
|---|---|---|
| १ | पानिपत येथील लढाई. ... ... ... ... ... ... | १०५ |
| २ | त्याच विषयावर दुसरा पोवाडा. ... ... ... ... ... | १२४ |

३ त्याच विषयावर तिसरा पोवाडा. ... ... ... ... ... १३०
४ नानासाहेब पेशवे यांचा मृत्यु. ... ... ... ... ... १३४
५ पेशवाईच्या आरंभापासून नानासाहेबांच्या मृत्यूपर्यंतच्या हकीकतीवर पोवाडा. ... ... ... ... ... ... १३६
६ थोरले माधवरावांची पत्नी रमाबाई सती गेली. ... ... ... १४०
७ नारायणराव पेशवे यांचा मृत्यु. ... ... ... ... ... १४४
८ सवाई माधवरावांचा जन्म. ... ... ... ... ... १५७
९ पेशव्यांनीं बदामी किल्ल्यावर मोहीम केली. ... ... ... १५९
१० सवाई माधवराव रंग खेळले. ... ... ... ... ... १६२
११ खर्ड्यांची लढाई. ... ... ... ... ... ... ... १६६
१२ त्याच विषयावर दुसरा पोवाडा. ... ... ... ... ... १८६
१३ त्याच विषयावर तिसरा पोवाडा.... ... ... ... ... १९२
१४ त्याच विषयावर चवथा पोवाडा. ... ... ... ... ... १९४
१५ त्याच विषयावर पांचवा पोवाडा. ... ... ... ... ... २०३
१६ त्याच विषयावर सहावा पोवाडा.... ... ... ... ... २०९
१७ त्याच विषयावर सातवा पोवाडा. ... ... ... ... ... २१६
१८ त्याच विषयावर आठवा पोवाडा.... ... ... ... ... २१९
१९ सवाई माधवरावांच्या मृत्यूवर पोवाडा. ... ... ... ... २२१
२० शेवटल्या बाजीरावाच्या कारकीर्दींतील बंड व दुष्काळ. ... २२८
२१ शेवटले बाजीराव पेशवे. ... ... ... ... ... ... २३५
२२ कीर्कीची लढाई. ... ... ... ... ... ... ... २४४
२३ खडकीची व अष्टीची लढाई. ... ... ... ... ... २४६

---

## भाग तिसरा.

### मराठे सरदार.

१ नाना फडनवीस. ... ... ... ... ... ... ... २५३
२ त्याच विषयावर दुसरा पोवाडा. ... ... ... ... ... २५६

३ महादजी शिंदे. ... ... ... ... ... ... ... २५७
४ जनकोजी शिंदे. ... ... ... ... ... ... ... २६०
५ अहिल्याबाई होळकरीण. ... ... ... ... ... ... २६२
६ मल्हारराव होळकर. ... ... ... ... ... ... २६४
७ यशवंतराव होळकर. ... ... ... ... ... ... २६८
८ फत्तेसिंह गायकवाड. ... ... ... ... ... ... २७१
९ दुसरे सयाजीराव गायकवाड. ... ... ... ... ... २७४
१० नागपुरकर चिमण जी बापू भोंसले. ... ... ... ... २८०
११ नागपुरकर आपासाहेब भोंसले. ... ... ... ... ... २८५
१२ परशुरामपंतभाऊ पटवर्धन. ... ... ... ... ... २९४
१३ परशुरामपंतभाऊंची कर्नाटकावर स्वारी. ... ... ... ३०१
१४ चिंतामणराव पटवर्धन सांगलीकर. ... ... ... ... ३०४
१५ त्याच विषयावर दुसरा पोवाडा. ... ... ... ... ... ३०७
१६ थोरले बाळासाहेब पटवर्धन मिरजकर. ... ... ... ... ३०९
१७ आनंदराव धुळप. ... ... ... ... ... ... ... ३१०
१८ परशुरामपंत प्रतिनिधी. ... ... ... ... ... ... ३१२
१९ फलटणचे निंबाळकर. ... ... ... ... ... ... ३१४

---

# चित्रांची अनुक्रमणिका.


| अनुक्रम. | | पृष्ठ. |
|---|---|---|
| १ | लॉर्ड क्लार्क मुंबई इलाख्याचे गव्हर्नरसाहेब मुखपृष्ठांवर. | |
| २ | शिवाजीमहाराज. ... ... ... ... ... ... ... | |
| ३ | शिवाजीमहाराज घोड्यावर बसलेले किल्ल्यावर चढतात. ... | २१ |
| ४ | शाहुछत्रपति सातारकर. ... ... ... ... ... ... | ८३ |
| ५ | नानासाहेब पेशवे. ... ... ... ... ... ... ... | १३० |
| ६ | थोरले माधवराव. ... ... ... ... ... ... ... | १४० |
| ७ | नारायणराव पेशव्यांचा मृत्यु. ... ... ... ... ... | १४४ |
| ८ | सवाई माधवराव. ... ... ... ... ... ... ... | १५७ |
| ९ | हरीपंततात्या फडके बदामी किल्ल्याचा पोवाडा.... ... ... | १५९ |
| १० | गंगाधरशास्त्री पटवर्धन. ... ... ... ... ... ... | २४४ |
| ११ | बापु गोखले. ... ... ... ... ... ... ... | २४६ |
| १२ | नाना फडनवीस. ... ... ... ... ... ... ... | २५३ |
| १३ | महादजी शिंदे. ... ... ... ... ... ... ... | २५७ |
| १४ | जनकोजी शिंदे. ... ... ... ... ... ... ... | २६० |
| १५ | अहिल्याबाई होळकरीण. ... ... ... ... ... ... | २६२ |
| १६ | चिंतामणरावआपा पटवर्धन. ... ... ... ... ... | ३०४ |

# इतिहासप्रसिद्ध पुरुष व स्त्रिया यांचे पोवाडे.

## भाग पहिला.

### मराठे छत्रपति राजे.

### १. शिवाजीमहाराजांनीं अबदुलखानास मारिलें यावर पोवाडा.

मराठी राज्याचे संस्थापक छत्रपति श्रीशिवाजीमहाराज यांचें जन्म सन १६२७ त शिवनेरी किल्ल्यावर झालें. त्या वेळीं त्यांचे वडील शाहाजीराजे भोंसले हे निझामशाहींत सरदार होते. सन १६३६ त निझामशाही बुडाल्यावर शाहाजींनीं विजापुरकर माहमुद आदिलशहा बादशहा यांची नोकरी पत्करिली, तेव्हां विजापुरसरकारानें शहाजींस पुणेंप्रांताची जहागीर व कऱ्हाडप्रांतांतील २२ गांवांच्या देशमुखीची सनद करून दिली. या जहागिरीची व देशमुखीची वहिवाट शिवाजीमहाराज हे पहात असत. पुढें महाराजांनीं मुसलमानापासून आपला देश मुक्त करावा व मराठी राज्य स्थापावें या हेतूनें आपलें राज्य वाढविण्याचा विचार करून सन

१६४८ पर्यंत तोरणा, कोंडाणा, पुरंदर, राजगड वगैरे मुसलमानांचे किल्ले हळूहळू युक्तीयुक्तीनें आपले हस्तगत करून घेतले. हें वर्तमान विजापुरसरकारास कळल्यावर शिवाजी हें कृत्य शाहाजींच्या सांगण्यावरून करतो असें समजून बादशाहानें सन १६४९ त शाहाजींस विजापुरांत कैद करून ठेविलें आणि सन १६५०।५१ त बाजी शामराज यास शिवाजीमहाराजांस पकडून आणण्यास्तव लष्करासह पाठविलें. महाराजांस ही खबर कळतांच त्यांनीं एकाएकीं बाजी शामराजाचे लष्करावर छापा घालून त्यास तेथून काढून लाविलें. पुढें सन १६५३ त विजापुरसरकारानें शाहाजींस बंधमुक्त केलें, व त्यांची कऱ्हाडच्या देशमुखीची सनद काढून बाजी घोरपड्यास दिली. हें पाहून महाराजांस राग आला व मुसलमानांचा जोर कमी करण्याकरितां सर्व घाटमाथा आपले कबज्यांत आणण्याचा ते विचार करूं लागले. या कृत्यासाठीं जावळीचा राजा चंद्रराव मोरे याचें साहाय्य घेणें अवश्य होतें, ह्मणून त्याजकडे याविषयीं बोलणें लाविलें. मोरे या गोष्टीस अनुकूल होईना ह्मणून महाराजांनीं राघो बल्लाळ नांवाचा एक ब्राह्मण व संभाजी कावजी नांवाचा एक मराठा या दोघांस जावळीस पाठवून एकांतीं चंद्ररावास ठार मारविलें व आपण त्याचें राज्य घेतलें. पुढें हिरडस मावळचा देशमुख बंदल याच्याशीं लढाई करून त्याचेंही राज्य आपल्या राज्यास जोडलें. याप्रमाणें राज्य वाढविल्यावर त्याचा बंदोबस्त राखण्याकरितां महाराज नवे किल्ले बांधूं लागले. त्यांत सन १६५६ त कृष्णानदीच्या उगमाजवळ मोरो

त्रिमळ पिंगळे नांवाच्या एका देशस्थ ब्राह्मणाकडून प्रतापगड नांवाचा किल्ला बांधविला. याच किल्ल्यावर सन १६५८ त विजापुरसरकाराकडून महाराजांस धरण्याकरितां आलेला अबदुलखान नामक सरदार महाराजांचे हातून मारला गेला, याचें वर्णन पुढील पोवाड्यांत आहे.

या पोवाड्याचा कर्ता अज्ञानदास नांवाचा कोणी शाईर होता व तो शिवाजीमहाराजांच्या वेळीं ह्यात होता, असें या पोवाड्याच्या शेवटच्या चौकावरून दिसतें. ह्या पोवाड्याच्या आम्हांस तीन प्रती मिळाल्याः–( १ ) विविधज्ञानविस्तार मासिक पुस्तकाच्या ६ व्या पुस्तकाच्या १० व्या अंकांत छापिलेली; ( २ ) महाडचा सखाराम गोंधळी याजकडून म्हणवून उतरून घेतलेली; व ( ३ ) श्रीमंत पंतप्रतिनिधिसाहेब यांनीं आपल्या संग्रहांतून पाठवून दिलेली. यांत पंतप्रतिनिधींचीच प्रत उत्तम असल्यामुळें तिचा पाठ मुख्य राखून इतर प्रतींतील पाठभेद दाखविले आहेत

चाल—"सांग सखे सुंदरी। कोण्या ग सुभगाची मदनमंजरी॥" रामजोशी.

**माझें[1] नमन आधीं गेणा[2]। सकळिक ऐका चित्त देउन॥ नमियेली सारजा[3]। ल्याली जडिताचें भूषण॥ अज्ञान[4]-**

---

१ 'विविधज्ञानविस्तार' पाठांत या पोवाड्याचा आरंभ असा आहेः— "सगळा देव आदीदेवा। शिवा नमन धरुनी भावा॥ जैसा शिवाजीचा भाव। कलिमधीं प्रसन्न महादेव॥ सांबाचा अवतार। छत्रपति राजा शिव॥ शिवाजीच्या तळ्यांत। पाणी पिती सर्व जीव॥ पाणी पूर्ण पिकलें न्हावें। भाकेंत गुंतला महादेव॥". २ गणपतीस. ३ शारदा, सरस्वती. ४ 'वि०' व सखाराम गोंधळी यांचे पाठांत 'अग्निनदास' असें आहे, पण तें 'अज्ञानदास' या शब्दाच्या अपभ्रष्ट उच्चारामुळें तसें लिहिलें गेलें असावें.

दासाचें वचन । नमिला सद्गुरु नारायण ॥ सद्गुरूच्या प्रसादें । संपूर्ण अंबेचें वरदान ॥ गाइन वजिराचें[1] भांडण । भोंसल्या सरजा[2] दलभंजन[3] ॥ फौजेवर लोटतां । यशवंत खंडेश्वरी प्रसन्न ॥ अज्ञानदास बोले वचन । गाइन राजाचें[4] भांडण ॥ देश ईलाइत[5] । काबिज केलें तळकोंकण ॥ १ ॥

गड[6] मी राजाचे गाइन । कोहज माहुली मर्जन ॥ पारगड कर्नाळा । प्रबळगड आहे संगिर्न ॥ मस्त तळा आणि घोसाळा । रोहरी आनसवाडी दोन ॥ कोरला कासागड मंडन । दर्यांत[10] दिसताती दोन ॥ गड बिरवाडी पांच कोन । सुरगड अवाचितगड भूषण ॥ कुंबलगड भीरिका । कुर्डुगडाचें चांगुलपण ॥ धोडप तळकोंकणचे किल्ले । घाटावरले गड गाइन ॥ २ ॥

गड आहे रोहिडा । जावली प्रतापगड मंडन ॥ मकरंदगड वांसोट । सिंहगड वृंदावन ॥ पुरंधराचें चांगुलपण । उंची झुलवा[11] देत गगन ॥ सोन्याची सुवेळा । आहे राजगड संगिन ॥ कोंडाण्यापासून तोरणा वर्ता । कोर रेखिली घाटमाथा ॥ तुंग आणि तीकोना । विसापुर लोहगड झुलता ॥ गड राहेरीची अवस्था । तीन पायऱ्या

---

१ अबदुलखान हा विजापुरसरकारचा वजीर होता. २ सरजा=सिंह. शिवाजीस 'सरजा' म्हटलेलें पुष्कळ प्राचीन लेखांत आढळतें. ३ सैन्य फोडणारा(?). ४ शिवाजीचें. ५ विलायत, म्लेच्छदेश. ६ किल्ले. ७ हीं किल्ल्यांचीं व प्रांतांचीं नांवें. ८ मजबूद. ९ बळकट, मोठा. १० समुद्रांत. ११ झोंके.

सोन्याच्या तक्का ॥ दुसरा प्रतापगड[1] पाहतां । अवघड दिसे घाटमाथा ॥ ३ ॥

मस्त हुडे[2] दुर्गांचे[3] खण । माहाल राजाचे गाइन ॥ पुणें भिस्तका दरगा । शेकसल्ला[4] पीर पाटण ॥ शिरवळ[5] सुपे देस । घेतला ज्यानें इंदापुरापासुन[6] ॥ महाड[8] गोरेगांवापासुन । घेतलें सिंणगारपुर[9] पाटण ॥ असे तुळजेचे[10] परिपूर्ण । सो-डविले चवदा ताल कोंकण ॥ घेतलीं बारा बंदरें[11] । भाग्य राजाचें संगिन ॥ ४ ॥

देशें[12] दुनया काबिज केली । बारा मांउळें[13] घेतलीं ॥ चंद्रराव[14] कैद केला । त्याची गड जाउंली[15] घेतली ॥ चेउ[16]-पाउली काबिज केली । ठाणीं राजाचीं बैसलीं ॥ घेतली जाउली[16] न[17] माहुली[16] । कल्याण[16] भिंवडी[16] काबिज केली ॥ सोडविलें तळकोंकण[16] । चेउलीं[16] ठाणीं बैसाविलीं ॥ कुबल[18]

१ हें किल्लयाचें व प्रांताचें नांव. २ बुरूज. ३ किल्ला. ४ पुण्यांत पूर्वी पुणेश्वराचें देऊळ होतें, तें मोडून मुसलमानांनीं तेथें शेकसल्ला नांवाच्या पीराचा दरगा बांधला. ५ भोरानजीकचें शिरवळ महाराजांनीं हिरडसमावळच्या देशमुखां-पासून स० १६५५ त घेतलें. ६ पुणें जिल्ह्यांतील इंदापूर. ७ तळकोंकण. ८ गोरे-गांव महाडाजवळच आहे. ९ शृंगारपुर हें कोंकणांत आहे. १० तुळजापुरची भवानी ही महाराजांची कुळस्वामिनी होती. ११ दाभोळ वगैरे. १२ " सांगेन शिवाजीच्या हिकमती । किल्ले दुर्ग झूलती ॥ भले दुणेदार जाणती । मराठे राज-कुमर ऐकती ॥ मोन्या चंद्रराव धरिला । गड पण जावली घेतली " 'वि०' पाठ. १३ नाणें, हिरडस, पवन, अंदर वगैरे. १४ मोरे यांस युसफ अदिलशाह बाद-शाहानें ' चंद्रराव ' हा किताब कांहीं कामगिरीवरून दिला व त्यास जावळीचा राजा केलें. १५ चंद्ररावास स० १६५५ त मारून शिवाजीनें जावळी घेतली. १६ प्रांतांचीं नांवें. १७ न=आणि. १८ कुव्वल=मजबूद.

बाकी घरें । शिवराजाच्या हाता आलीं ॥ [1]मुलाना हा-
माद । फिर्याद [2]बाच्छायाप गेली ॥ बाच्छायजादा क्रोध
आला । जैशी अग्न [3]पेरजळली ॥ [4]जिते धरावा [5]राजाला ।
[6]कुलवजिरांला खबर दिली ॥ ५ ॥

बाच्छाय पाठविलें [7]प्रमाण । वजीर बोलावा [8]तमाम ॥
अवदुलखान [9]रस्तुम जुमा । [9]सिद्दी हिलाल [9]मुशेखान ॥
मेळविले वजिरांला । बाच्छाय बोलावी कवणाला ॥ बो-
लावा [10]बाजी घोरपड्याला । [11]धाटग्या जुंझाररायाला ॥
बोलावा [12]खऱ्या कोवाजीला । त्या [12]नाइकजी पांडऱ्याला ॥
[12]देवकांत्या जीवाजीला । [12]मंबाजी भोसल्याला ॥ बावीस
[13]उंबराव मिळुनी । आले बाच्छायसभेला ॥ ६ ॥

बाच्छायजादा पुसे वजिराला । धरीसा आहे कोण
शिवराजाला ॥ बावीस उंबराव आले सभेला । विडा
पैजेचा मांडिला ॥ सवाई अवदुल्या बोलला । जिता पकडूं

---

१ कल्याणचा सुभेदार मुलाना अहमद याचा खजिना विजापुरास जात असतां महाराजांनीं स० १६४८ त लुटून हस्तगत करून घेतला. २ बादशाहा-पाशीं. या वेळीं विजापुरचे अल्ली अदिलशाह बादशाह होते. हे वयानें लहान असल्यामुळें यांस पुढें ‘ बाच्छायजादा ’ म्हटलें आहे. ३ प्रज्वळली, पेटली. ४ जिवंत. ५ शिवाजीला. ६ सर्व वजीरांस. ७ हुकूम. ८ सर्व. ९ हीं मुसलमान सरदारांचीं नांवें. १० यानें शाहाजीराजांस बोलावून कपटानें विजापुरीं नेलें म्हणून यास पुढें शिवाजीमहाराजांनीं ठार मारिलें. ११ यास महाराजांनीं प्रताप-गडच्या लढाईत धरून कैद केलें होतें, परंतु हा शाहाजीराजांचा मित्र असल्या-मुळें त्यास सन्मानानें परत जाऊं दिलें. १२ मुसलमानांच्या मराठे सरदारांचीं हीं नांवें. १३ उमराव, सरदार.

मैं राजाला ॥ निरोप दिला कुलवजिराला । अबदुल सदरे[1] नेवाजीला[2] ॥ विडा पैजेचा घेतला । तुरा मोत्याचा लाविला ॥ गळां घातलीं पदकें । खान विजापुरीं बोलला ॥ फिरंग[3] घोडा सदरे दिला । बाच्छायानें नवाजीला ॥ तीवरसांची[4] मोहिम । घेउन अबदुल्या चालला ॥ ७ ॥

खान कटकबंद[5] केला । कोटांबाहेर[6] डेरा दिला ॥ मोठा अपशकुन जाहला । फत्या[7] लसकरा हत्ती मेला ॥ खबर गेली बाच्छायाला । बिनीचा[8] हत्ती पाठविला ॥ बारा[9] हजार घोडा । अबदुलखानालागीं दिला ॥ ८ ॥

संगात कुंजर मस्त हत्ती । घेतली झगड्याची मस्तुती[10] ॥ आरोब्याच्या[11] गाड्या । कोतवालतेजी[12] धांवा घेती । सातशें उंट आहे बाणांचा । करडा लष्करी खानाचा । वजीर अबदुलखान । त्याच्या दळाची[13] गणती[14] । बारा हजार घोडा । उंबराव तोबिन[15] चालती ॥ ९ ॥

तेथूनि[16] कुच केलें कटकाला । अबदुल फौजेनें चालि-

---

१ कचेरींत. २ वाखाणिला, स्तुति केली. ३ तलवार. ४ तीन वर्षांची. ५ फौजबंद. ६ शहराच्या तटाबाहेर. ७ फत्तेलष्कर नांवाचा हत्ती. ८ लष्करापुढचा. ९ ग्रांटडफसाहेबांच्या बखरींत, खानाचें लष्कर ५००० घोडा व ७००० पायदळ होतें, असें लिहिलें आहे. १० मस्तुती (?). ११ आरोब्याच्या (?). १२ शृंगारलेले घोडे. १३ सैन्याची. १४ मोजणी. १५ ताब्यांत. १६ "लष्कर चवदा हजार घोडा । तोंडावर धराया चालिला ॥ भांड सर्व देती । कण किल्ले विलोकिती ॥ खान दरमजली कुच केलें । चालून तोरव्यासी आला ॥ बिन फत्तेमारीच्या । बिनीच्या खालीं आला ॥ ब्राह्मण कृष्णाजी बोलला । साहेब अपशकुन जाहला ॥ खान दरमजली कुच केलें । चालून तुळजापुराला गेले ॥ " 'वि०' पाठ. अबदुलखान स० १६५९ च्या सप्टेंबर महिन्यांत विजापुराहून निघाला.

ला ॥ मजलीवर मजल । अबदुल तुळजापुरा आला ॥ फोडिली तुळजा[1] । वरती मसुद[2]च बांधिली ॥ मसुद बांधुनी । पुढें गाय जब[3] केली ॥ अबदुलखान फोडी देवाला । कांहीं एक अजमत[4] दावा मला ॥ कोपली भद्रकाळी[5] । बांधुनी शिवराजा[6]प दिला ॥ अंबा गेली सपनांत । कांहीं एक बोले शिवराजाला ॥ बत्तीस दांतांचा बोकड[7] । आला वधायाला ॥ १० ॥

तेथून कुच केलें कटकाला । अबदुल दरमजली चालिला ॥ मजलीवर मजल । अबदुल माणकेश्वरा आला ॥ तेव्हां त्या अबदुलखानानें । हाल मांडिलें देवाला ॥ तेथुनि कुच केलें कटकाला । अबदुल फौजेनें चालिला ॥ मजलीवर मजल । अबदुल करक्मभोशा आला ॥ तेथुनि कुच केलें कटकाला । अबदुल दरमजली चालिला ॥ मजलीवर मजल । वेगीं पंढरपुरा आला ॥ फोडिला विठोबा । पुंडलिक पाण्यांत टाकिला ॥ ११ ॥

---

१ देवी. २ मशीद. ३ जब केली=ठार मारली. ४ चमत्कार. ५ भवानी देवी. ६ प=पाशीं. ७ अबदुल हाच बोकड. ८ स्थळविशेष. ९ विजापुराहून वाईकडे जाण्याचा नेहमींचा मार्ग म्हटला म्हणजे तोरवें, तिकोटें, होनवाड, आथणी, यांवरून आहे. परंतु अबदुलखान सातशें उंटांसहित फौज घेऊन पाऊस बंद होण्यापूर्वी निघाला तो तिकोटें आणि तोरवें यांच्या दरम्यान डोणनदीला डावें घालून पंढरपुरावरून वाईस आला. याचें कारण, डोणनदीचा उतारा फारच कठिण आहे, तिचें पाणी समुद्रासारखें खारें आहे, आणि नदीच्या पात्रांत हत्ती बुडेल इतका चिखल नेहमीं असतो.

[१]खान कुच केलें कटकाला । अबदुल फौजेनें चालिला ॥ मजलीवर मजल । वेगीं महादेवासीं आला ॥ तेव्हां त्या अबदुलखानानें । दंड बांधिला शंभुला ॥ हाल हिंदुंच्या देवाला । अबदुलखान धाक लाविला ॥ तेथुनि कुच केलें कटकाला । अबदुल दरमजली चालिला ॥ मजलीवर मजल । अबदुल [२]रहिमतपुरा आला ॥ १२ ॥

अबदुल आलासे बोलती । धाकें [३]गैड किल्ले कांपती ॥ वजीर उंबराव बोलती । शिवाजीस [४]गैडे कोंडूं म्हणती ॥ अबदुल सारा आहे किती । त्याच्या दळाची गणती ॥ बारा हजार घोडा । उंबराव ताबिन चालती ॥ [५]सौदेळीं भांडतां । मग कणकीला भीठ किती ॥ १३ ॥

तेथुनि कुच केलें कटकाला । अबदुल वाईलागीं आला ॥ [६]आपुल्या मुलखांत राहिला । कोट बांधुन पिंजरा केला ॥

---

१ "खान दरमजली कुच केला । चालुनि पालीकारणें गेला ॥ पालीचा खंडोबा । अजामत दावी मोगलाला ॥ न्हाटो न्हाटो रे भाई बोलिला । तीन कोस मोड केला ॥ दीपमाळ बांधिली देवाला । मग खानाचा भोग पुरला ॥ खान दरमजली कुच केला । चालुनि आवुंदाला गेला ॥ आवुंदाची यमाई । प्रचीत दावी खानाला ॥ गोंधळ घातला देवीला । मग खानाचा भोग पुरला ॥ पांढऱ्या शंभूला घेतला । खान दरमजली कुच केला ॥ चालून वाईकारणें गेला । आपुल्या मुलखांत राहिला " 'वि०' पाठ. २ हें साताऱ्यापासून ६।७ कोस पूर्वेस आहे. ३ गड किल्ले म्हणजे गडावरचे व किल्ल्यावरचे लोक. ४ गडांत. ५ सौदळीं (?). ६ अबदुलखान कांहीं दिवस वांईचा सुभेदार होता म्हणून "आपल्या मुलखांत राहिला' असें म्हटलें आहे.

बेरेपणाचा कागद । हेजिब[1] महाराजाप गेला ॥ राजा पुण्यांत मस्त झाला । देश पाठीशीं घेतला ॥ सोडुन दिले किल्ले । डेरा जाउलींत दिला ॥ राजा जाउलींत राहिला । हेजिब अबदुल्याचा आला ॥ १४ ॥

हेजिब बोले महाराजाला । खान बऱ्यापणाशीं आला ॥ खानाला भेटतां । थोरें[2] बाच्छाये सल्ला झाला ॥ राजा बोले हेजीबाला । कशाला बोलावितां वाईला ॥ किल्ले गड कोट । दवलत खानाच्या हवाला ॥ जाउली खानाच्या हवाला । लिहुन देतों हेजीबाला ॥ बैसूं दोघेजण । खान बुध[3] सांगेल आह्मांला ॥ लुंगडीं[4] दिलीं हेजीबाला । हेजीब बेगीं रवाना केला ॥ १५ ॥

हेजीबाची खबर ऐकुनी । अबदुल महाभुजंग[6] झाला ॥ अबदुलखान कँउल दिला । रोटीपीर पाठविला ॥ भिउँ नको शिवाजी भाई । आहे तेरा मेरा सल्ला ॥ तुझे गड तुझ्या हवाला । आणिक दवलत देतों तुला ॥ तुझी थोडिशी गोष्ट । क्रिया शाहाजीची आह्माला ॥ ईकडे[10] कउल पाठविला । शीलँचा[11] राँउत[12] निवडिला ॥ हत्तीचे

---

१ जासूद. 'वि०' व 'स० गों०' यांचे पाठांत 'ब्राह्मण कृष्णाजी धाडिला' असें आहे. कृष्णाजी हा वांईचा कुळकर्णी होता. २ विजापुरच्या बादशाहाशीं. ३ बुद्धि, अक्कल. ४ "पोषाक दिला" 'स० गों०' पाठ. ५ लवकर. ६ सर्पासारखा गर्विष्ठ. ७ हुकूम. ८ रोटीपीर (?). ९ शपथ. १० आपल्या सैन्यांत. ११ चिलखत घातलेला. १२ घोडेस्वार.

पायीं तोरेंड[1] । लाविला गजढोंळा[2] ॥ नद्रे पडतां । दुस्त[3] करा शिवराजाला ॥ १६ ॥

राजा हेजीबासि बोलतो । खंड[4] काय मला मागतो ॥ चउआगळे चाळीस गड । मी अबदुलखानालागीं देतों ॥ मजवर कृपा आहे खानाची । जावलींत सदरा संवारितों[5] ॥ तेथें यावें भेटायाला । मी खानाची वाट पाहतों ॥ हेजिब[6] तेथुनि निघाला । अबदुलखानाजवळ आला ॥ अबदुलखानामोहरें[7] । हेजिब टाकिला प्रमाण[8] ॥ अबदुल पाहतो वाचुन । खुंटलें गनिमाचें[9] मरण ॥ हाता आले गड किल्ले । खुशी जाहला अबदुलखान ॥ १७ ॥

हिंगडे सल्ला कउल दिला । खासा राउत निवडिला ॥ चार हजार घोडा । हालका धराया चालला ॥ हत्तीचे पायिं तोरड ज्याला । वरी सोडिल्या गजढाला ॥ फौजामागें फौजा । भार कडक्यानें चालला ॥ रंडतोंडी[10]-

---

१ अलंकार. २ निशाण, बाहुटा. ३ पकडा. ४ खंडणी. ५ शृंगारितों. ६ " तसलिबा दिल्या बामणाला । बामण खानाजवळी आला ॥ शिवाजीराजाचा हेजीब । जिवाजी ह्मालदार धाडिला ॥ खानापाशीं येऊन । घड न बोले अबदुल्याला ॥ चौदा हजार घोडा । तुह्मी आणला कशाला ॥ आवूत द्याया जगदंबेला । हेजीब बोलतांच अबदुलखान खवळला ॥ जिवाजी ह्मालदार शिवाजीराजाजवळी आला ॥ खान दरमजली कुच केला । रडतोंडीची घाटी चढला ॥ चालून गडवेढा दिला । चवदा दिवस कोंड केला ॥ खबर कळली महाराजाला । राजा मुपीत राहिला ॥ " ' वि० ' पाठ. ७ पुढें. ८ पत्र, हुकूमनामा. ९ शत्रूचें. १० नहराचे खालीं रडतोंडीचा घाट आहे. त्यास ' रोटंडा ' किंवा ' मुंबई पॉइंट ' ह्मणतात.

च्या घाटाखालीं । अबदुल सारा उतरू दिला ॥ इसारत [1]सरज्याच्या लोकांला । ज्यांणीं घाट बळकाविला ॥ मागल्याची खबर नाहीं पुढिल्याला । कटकाची खबर कैची त्याला ॥ जाऊं जाणें येऊं नेणें । ही गत झाली अबदुल्याला ॥ जावलींत उतरुनी । अबदुल [2]दिशाभुली जाहला ॥ १८ ॥

राजानी सदरा सवारिल्या । गाद्या पडगाद्या घातल्या ॥ [3]तिवाशा [4]जैमखान टाकिले । सदर पिकदाण्या ठेविल्या ॥ सुरंग चारी खांब सदरेचे । वरी घोंस मोतीयांचे ॥ माणिकाच्या भरणी । हारी मोत्यांच्या बसविल्या ॥ दुसरे सदरेची मांडणी । सूर्य लखलखितो गगनीं । माणिकाचे ढाळ । सदरे सुवर्णाचें पाणी ॥ काचबंदी पटांगणाचा ढाळ । कापुर कस्तुरी परिमळ ॥ १९ ॥

तिसरे सदरेची मांडणी । हिरे जोडिले खणोखणीं ॥ खासियाचे पलंग । ते ठेवोनी मध्यस्थानीं ॥ वाळियाच्या [6]झांजी । दवण्याचे कुंड घालोनी ॥ बराणपुरी चिटाचे । आडोआड पडदे बांधुनि ॥ चाहुंकोनी चारी समया । [7]चांदवा जडिताचा बांधोनी ॥ घोंस मोतियांचे । वर ठिकडी नानापरिची ॥ अवघी जडिताची लावणी । हिरे जोडिले खणोखणीं ॥ बहुत सवारिल्या सदरा । ऐशा नाहीं देखिल्या कोणी ॥ २० ॥

---

१ शिवाजीच्या. २ वाट चुकला. ३ तक्क्ये. ४ सतरंज्या, गालिचे. ५ तेजःपुंज. ६ झांजा (?). ७ छत.

राजानी सदरा सवारिल्या । हेजिब अबदुल्यास धाडिला ॥ मोरो[1] ब्राह्मण राजानें पाठविला । अबदुलखानासी बोलाविला ॥ चार हजार घोडा । कोण्या कामास्तव आणिला ॥ बाहेर निराळा ठेविला । दहा पांचांनिशीं चालिला ॥ एकांतींच्या गोष्टी । तेथें दहा पांच कशाला ॥ पालखी दुर करा भोईयाला । खासा अबदुल चालला ॥ हात चालवा व्हा । दुर करा ह्मणे खानाला ॥ वस्त्रें केलीं हेजीबाला । शामराज[2] नवाजीला ॥ २१ ॥

भवानीशंकर प्रसन्न ज्याला । तुळजा मदत शिवराजाला ॥ भोग पुरला खानाचा । अबदुल जावळींत आला ॥ विनहत्याराविण मोकळा । अबदुल सदरेलागीं आला ॥ अबदुल पहिले सदरे गेला । सदर देखुनी सुखी जाहला ॥ ऐशी सदर नव्हती । आमच्या आली[3] इदलशाला ॥ खान दुसरे सदरे गेला । सदर देखुनि सुखी झाला ॥ ऐशी सदर नव्हती । नवरंगशा[4] बाच्छायाला ॥ अबदुल तिसरे सदरे गेला । सदर देखुनि सुखी झाला ॥ ऐशी सदर नाहीं । अवरंगशा बाच्छायाला ॥ अबदुलखान बोलिला । शिवाजीस आणा भेटायाला ॥ २२ ॥

---

१ मोरो त्रिमळ पिंगळे. यास शिवाजीमहाराजांनीं पेशव्याचा अधिकार दिला होता. २ शामराजपंत हे पूर्वीचे पेशवे. ३ अली अदिलशाह, विजापूरचे बालराजे. ४ औरंगजेब बादशाहास ' नवरंग ' ह्मटलेलें प्राचीन लेखांत आढळतें.

राजा [१]नवगजींत बैसला । [२]मोरो [३]शाम बोलाविला ॥ [४]रघुनाथ पेशवे । [३]नारो शंकर पाचारिला ॥ [३]दाहातोंड्या माणकोजीला । त्या [३]इंगळ्या सुभानजीला ॥ [३]देवकांत्या जिवाजीला । राजानें बोलाविलें तुह्मांला ॥ [३]करनखऱ्या सुभानजीला । बेलदारा [३]पिलाजीला ॥ [३]सेर सुभाजीला । पालीकर [५]नेतोजीला ॥ त्या बोवड्या [३]बहिरजीला । सरदार आले भेटायाला ॥ २३ ॥

राजा विचारी भल्या लोकांला । कैसें जावें भेटायाला ॥ [६]बंककर कृष्णाजी बोलला । शिवबा सील[७] करा आंगाला ॥ भगवंताची सील ज्याला । आंतून बारीक झगा ल्याला ॥ [९]मुसेजरीच्या [१०]सुरवारा । सरजा बंद सोडुन दिला ॥ डावेहातीं बिचवा त्याला । वाघनख सरज्याच्या पंजाला ॥ पटा जिवें[११] ह्माल्याप दिला । सरजा बंद सोडुन चालिला ॥ २४ ॥

---

१ कचेरी (?). २ मोरोपंत पिंगळे. ३ हीं शिवाजीमहाराजांच्या सरदारांचीं नांवें. ४ शामराजपंत पेशव्यांस सिद्दीवर स्वारी करण्यास पाठविलें असतां त्यांचा पराभव झाल्यामुळें पेशवाईचा अधिकार काढून घेतला व सिद्दीचे पारिपत्यास्तव रघुनाथपंत यांस नेमिलें होतें; यावरून शाईर रघुनाथपंतास पेशवे ह्मणत आहे असें दिसतें. वास्तविक पाहतां शामराजपंतांनंतर पेशवाईचा अधिकार रघुनाथपंतांस न मिळतां मोरो त्रिमळ पिंगळे यांस मिळाला होता. ५ हा महाराजांचा पहिला सरनौबत म्हणजे घोडेस्वारांचा सेनापति होता. ६ 'वि०' पाठांत "गाईकवाड कृष्णाजी" असें आहे. परंतु बखरींत "कृष्णाजी भास्कर" किंवा "कृष्णाजी बोकील" असें आहे. ७ चिलखत. ८ चिलखतावर झगा होता. ९ रेशमी कापडाच्या. १० तुमान, विजार. ११ जिवाजी ह्मालदारापाशीं.

माझा रामराम दादानु । गडच्या गडकन्या बोलिला ॥ जतन भाईनु करा । आमुच्या संभाजी[1]राजाला ॥ सैराईत[2] उमाजी[3] । राज्य होईल तुह्मांला ॥ गड निरविती[4] गडकन्याला । राज्य निरविती नेतोजीला[5] ॥ निरवानिरव दादानु । विनंति केली सकलीकाला ॥ येथुनि सलाम सांगा । माझा शाहाजी[6] महाराजाला ॥ खबर गेली जिंजाऊला[7] । शिवबा जातो भेटायाला ॥ पालखींत बैसुनी । माता आली भेटायाला ॥ २५ ॥

शिवबा बोले जिजाऊ सवें । बये वचन ऐकावें ॥ माझी आसोशी[8] खानाला । बये जातों भेटायाला ॥ जिजाऊ बोले महाराजाला । शिवबा न जावें भेटायाला ॥ मुसलमान बेइमान । खान राखिना तुह्मांला ॥ राजा बोले जिजाऊला । येवढी उंबर झाली भेट दिली नाहीं कोणाला ॥ येवढी गोष्ट माते । आज द्यावी मला ॥ आई अबदुलखान आला । यानें धाक लाविला देवाला ॥ जिजाऊ बोले महाराजाला । शिवबा बुद्धिनें काम करावें । उसनें संभाजीचें[9] घ्यावें ॥ २६ ॥

---

१ शिवाजीमहाराजांचा पुत्र. २ पटाईत. ३ हे कोण ! ४ सोंपविती. ५ नेतोजी पालकर. ६ शाहाजीमहाराज ते वेळेस कर्नाटकांत होते. ७ जिजीबाई ही लुखजी जाधवराव यांची कन्या व शिवाजीची आई. हिच्यावर शिवाजीचें फार प्रेम होतें, व तीही शिवाजीच्या कृत्यांस प्रोत्साहन देत असे. ८ आवड, इच्छा. ९ शिवाजीचा वडील भाऊ संभाजी यास कर्नाटकामध्यें कनकगिरी येथील मुसलमानांनीं ठार मारलें त्यांत अबदुलखानाचें अंग होतें म्हणून त्याचें उसनें घ्यावें असा जिजाबाईचा उपदेश.

जिजाऊ घेती अलाबला । शिवबा चढती दवलत तुला ॥ घे यशाचा विडा । शिवबा स्मरे महादेवाला ॥ गळां घातली मिठी । मातेच्या चरणासी लागला ॥ ध्यानीं आठवुनी भगवंताला । शिंवाजी राजा सदरे[1] गेला ॥ २७ ॥

पहिला सलाम । माझा भवानीशंकराला ॥ दुसरा सलाम । माझा शाहाजीमहाराजाला ॥ तिसरा सलाम । अमचे अबदुलखानाला ॥ शिवाजी सरजे सलाम केला । अबदुलखान गुंमान[2] केला ॥ मनीं धरलें कपट । पुरतें कळलें महाराजाला ॥ मग तो शिवाजी सरज्याला । खान दापुनी[3] बोलला ॥ तूं तो कुणबीका छोकरा । सवरतं[4] बाच्छाई सदरा ॥ २८ ॥

इतक्या उपरी राजा बोले । त्या अबदुलखानाला ॥ खाना ज्याची करणी त्याला । कांहींएक भ्यावें रघुनाथाला[5] ॥ तुह्मी जातीचे कोण । आह्मी जाणतों तुह्माला ॥ तू तरी भटारनीका[6] छोरा[7] । शिवाजी सरज्यापर लाया तोरा[8] ॥ यावर अबदुला बोलला । शिवा तुम चलो बिजापुराला ॥

१ " चौघे बळी बांधुनि फळी । एका वळीनें चालिले ॥ पहिल्या सदरेला गेले । गडकऱ्यांनीं दटाविले ॥ दुसऱ्या सदरेला गेले । कारकुन अबदुल्याला बोले ॥ तिसऱ्या सदरेला गेले । कंचनींत बुडविले ॥ अबदुला सदखदां हासिला । जिवाजी झालदार शिवाजी आले सदरेला ॥ " ' वि० ' पाठ. २ तृप्त, घंड. ३ दटावून. ४ सवरणें = शृंगारणें. ५ ईश्वराला. ६ स्वयंपाकीण. ७ मुलगा. ८ इज्जत घेतली.

शिवाजी सरजे नेतां । बहुत दिन लागतील खानाला ॥ कळला पुरुषार्थ । तुमचा बसल्या जाग्यालां ॥ २९ ॥

अबदुल जातका भटारी । तुमने करना दुकानदारी ॥ इतकिया उपरी । अबदुल मनीं खवळिला पुरा ॥ कव[1] मारिली अबदुल्यानें । सरजा गवसून[2] धरला सारा ॥ चालविली कट्यार । सीलवर[3] मारा न चाले जरा ॥ सराईत शिवाजी । त्यानें बिचव्याचा[4] मारा केला ॥ उजवे हातीं बिचवा त्याला । बावनखं[4] सरज्याच्या पंजाला ॥ उदरच फाडुनी । खानाची चरबी आणिली द्वारा ॥ ३० ॥

खान लव्हा[5] लव्हा बोलिला । खानाचा लव्हा बेगिन आला ॥ राजानें पट्टा पडताळिला[6] । अबदुलखानानें हात मारिला ॥ शिरींचा जिरेटोप[7] तोडला । सरजा जरासा लागला[8] ॥ भला सराईत शिवाजी । पट्ट्याचा गुंडाळा मारिला ॥ मान खांदा गवसुनि । जानव्याचा दोरा केला[9] ॥ अबदुलखान शिवाजी दोनी । भांडती दोनी धुरा[10] ॥ बारा हजार घोडा । सरदार नाहीं कोणी तिसरा ॥ ३१ ॥

---

१ मिठी. २ आंवळून. ३ हें चिलखत सातार्‍यास आहे, तें पाहिल्यावर असें वाटतें कीं, हें घालणारा मनुष्य अमानुष शक्तीचा असला पाहिजे. इतकें हें जड आहे. ४ शस्त्रविशेष. ५ पट्टा, खड्ग. ६ म्यानांतून बाहेर काढला. ७ लोखंडी कड्यांचा टोप, शिरस्त्राण. हा सातार्‍यांत राजवाड्यांत अद्याप आहे. ८ शिवाजीमहाराजांस थोडा वार लागला. ९ जानव्यासारखा आडवा वार केला. १० योद्धे.

अबदुलखान झाला पुरा । कृष्णाजी[1] ब्राह्मण उठावला ॥ शिवाजी राजा बोलला । ब्राह्मणा मारूं नये तुला ॥ तुजशीं मारितां । शंकर हांसेल आम्हांला ॥ नाइकतां ब्राह्मणें । हात दुसरा मारिला ॥ ब्राह्मणा मारूं नये तुला । क्रिया[2] शाहाजीची आम्हाला ॥ कृष्णाजी ब्राह्मण । हात तिसरा टाकिला ॥ होईल ब्रह्महत्या भोंसल्यासी । शिवाजीनें राखिला ॥ कृष्णाजी ब्राह्मण मागें सरला । सैद[3] बंडु मोहरे आला ॥ जवळ होता जिऊ म्हाल्या । त्यानें सैद[4] पुरा केला ॥ ३२ ॥

संशय खानाचा फिटला । खान पळता पाय काढिला ॥ मेळविला भोयांनीं । पालखींत घालून चालविला ॥ कोंवजीचा संभाजी भोंसला । मोठे उडीनें आला ॥ जखमा केल्या भोयांच्या पाया । खटारा धरणीवर पाडिला ॥

---

१ अबदुलखानाचा वकील. "त्याचा बामण म्होरे आला ॥ परत रे माघारा । सरजा शिवाजी बोलला ॥ ब्राह्मण मारूं नये तुला । क्रिया देवाची आम्हांला ॥ महाराज खदखदां हांसिला । हातिंचा पटा टाकुन दिला ॥ शिवाजीचा जिवाजी म्हालदार । त्यानें शीघ्र उडी घातली ॥ काढिला बराणपुरी बरचा । त्याणें अचाट फेंकून दिला ॥ नाभिकमळीं बैसला । बरचा पाठिला फुटला ॥ ब्राह्मण हर हर बोलला । त्याचा प्राण निघून गेला ॥" 'वि०' पाठ. २ शपथ. ३ अबदुलखानाचा हुजऱ्या. ४ जिवा म्हालदारानें सैद बंडु मारिला "जवळ होता जिवा, ह्मणून वांचला शिवा" अशी गोंधळी लोकांत एक ह्मण आहे. ५ संभाजी कावजी यानें चंद्रराव मोरे यांचे बंधूस ठार मारिलें होतें. ६ पालखी.

शिवाजीराजा[1] वेगिन आला । शिर कापुनी गडावर गेला[2] ॥ जराचाच मंदिल । शिरीं त्या संभाजीचे[3] घातला ॥ फाँ[4]-जिलखाना क्रोध आला । बाण आणि बंदुका थोर वर्षाव एकच केला ॥ शिवाजीराजाचा चपाटा । फाजिलखान बारा[5] वाटा ॥ हाल महाराजाचे झाले । अबदुलच्या लोकांला ॥ ३३ ॥

प्रतापगडाहुनि केला हल्ला । मारिती खुण सरज्याच्या लोकांला ॥ धरल्या चारी वाटा । ज्यांनीं घाट बळकाविला ॥ दळ त्यासमई । पायदळचा कडका आला ॥ सि-

---

१ "शिवाजी आले । शिर कापुनि घेऊन गेले ॥ प्रतापगडची भवानी । शिर वाहिलें जगदंबेला ॥ बत्तीस दांतांचा बोकड मारला गे होता । आहुती द्यावी अबदुल्याची ॥" 'वि०' पाठ. २ तें शिर प्रतापगडच्या देवीस वाहिलें. देवीनें अबदुल्याला बोकड म्हटलेलें वर आलेंच आहे. आणि आश्विन शुद्ध ७ म्हणजे नवरात्रांच्या हवनाच्या दिवशीं अबदुल्याचा वध झाला. तेव्हां अबदुल्या बोकडाचें शिर देवीस बळी वाहणें युक्तच आहे. अबदुल्या बुरूज प्रतापगडाच्या देवीपुढें असून त्याखालींच अबदुल्याचें शिर पुरलें आहे. शिवाजीमहाराजांस मूळ देवी प्रसन्न झाली ती प्रतापगडचीच. भवानी तलवार प्रतापगडदेवीपासूनच मिळाली. त्या देवीपुढें शिवाजीमहाराजांचे वंशजांनीं दिलेला चौघडा अजून झडतो. ३ संभाजी कावजी. ४ अबदुलखानाचा पुत्र. ५ बारा वाटा पळाला. "येथून इशारत कुल राजांच्या लोकांला । बारा तोफा मारा केला ॥ आवाज प्रतापगडावर होती । कडका पायदळ येती ॥ पडले धडधडा । बोलले निशाणाचे हत्ती ॥ त्रिमुख कागड्या । खुरे राव लोटला ॥ रडतोंडी घाटी । तुक्या भिवाजी भिडला ॥ साठ आरबांच्या । घोड्या पाडाव केला ॥" 'वि०' पाठ. प्रतापगडावरून खून मिळतांच मारा करावा अशी प्रथमचीच योजना होती.

लीमकर[1] खोपडे[1]च्या । काकडे[1]च्या सुर्व्या[1] लोटला ॥ अंगद हनुमंत रघुनाथाला । पायचे पायदळ शिवाजीराजाला ॥ फिरंग[2] ठेवी त्याला जाउद्या त्याला । राखु नका तुह्मी उगारल्या पाइकाला[3] ॥ फत्ते महाराजाची झाली । वाट[4] दिली कुलवजीराला ॥ ३४ ॥

पळतां फाजिलखान । त्याचा दुमाळा[5] घेतला ॥ माघारा फिरोनि । जान[6] हातीचा आरोबा[7] दिला ॥ शिवाजीचे हाल । फाजिलखान घाय पुरा केला ॥ घोडा आणि राऊत । ज्यांणीं पाडाव केला ॥ वळल्या हातीवरल्या ढाला । चार हजार घोडा अबदुल्या जावळींत बुडविला ॥ भवानीशंकर प्रसन्न झाला । यश राज्याला खंड्याला[8] ॥ सरजा तोरंड[9] मांहीमोर्तब[10] शिवाजीला । फत्ते[11] झाली महाराजाची ते वेळ पन्हाळा घेतला ॥ ३५ ॥

अज्ञानदास विनवी श्रोत्याला । राजा अवतारी जन्मला ॥ नळ नीळ सुग्रीव जांबुवंत । अंगद हनुमंत रघुनाथाला ॥ एकांतीं भांडन । जैसें रामरावणाला ॥ तैसा

---

१ शिवाजीच्या सरदारांचीं नांवें. यांनीं वाटा रोखिल्या होत्या. २ शस्त्र ठेवील त्याला जाऊं द्या, उगारील त्याला राखूं नका ह्मणजे मारा, असा शिवाजीचा हुकूम. ३ शिपाई. ४ वाट दिली म्हणजे पळविलें. ५ पाठ घेतली. ६ जान (?). ७ आरोबा (?). ८ खंडेश्वर, खंडोबा, शिवाजीचा कुलस्वामी. ९ अलंकार. १० माहीमरातब=पोषाक, सरंजाम, वगैरे. ११ " महाराज पन्हाळ्यावर गेले । पन्हाळा चौफेरी बांधिला ॥ कैदीन भांडला पन्हाळा । नही देंइ बाच्छायाला ॥ " ' वि० ' पाठ.



छत्रपति शिवाजी महाराज.

शिवाजी सरजा । एकांतीं नाटोपे कवणाला ॥ इष्टी पर्यंस[1] शिवाजीला । कलीमधीं अवतार जन्मला ॥ विश्वाची जननी । अंबा बोले शिवाजीला[2] ॥ मोठे भक्तीचें फळ । महादेव भाकेला गोंविला ॥ जिकडे जाती तिकडे । यश राज्याच्या खडाला[3] ॥ ३६ ॥

माता जिजाऊ बोलली । पोटीं अवतार जन्मला ॥ शंकपाळ[4] शिवाजी महाराजानें केला । आतां मी गाईन भोंसले शिवराजाच्या ख्याति ॥ दावा हेवा जाण । अखेर संग्रामाच्या गति ॥ राजगड राजाला । प्रतापगड जिजाऊला ॥ धन्य जिजाऊचे कुशी । राजा अवतार जन्मला ॥ आपल्या[5] मतें अज्ञानदासानें । बीरमाल[6] राज्याचा गाइला ॥ शिवाजी सरज्यानें । इनाम घोडा बक्षीस दिला ॥ शेरभर सोन्याचा । तोडा हातांत घातला ॥ यश जगदंबेचें । तुळजा प्रसन्न शिवराजाला ॥ ३७ ॥

---

## २. तानाजी मालुसरे यानें सिंहगड घेतला, यावर पोवाडा.

सिंहगड ऊर्फ कोंडाणा हा किल्ला पुण्याचे आग्नेयीदिशेस सुमारें

---

१ पर्यंस (?). २ शिवाजीच्या पूर्वजांनीं भक्तीनें महादेवास प्रसन्न करून घेऊन त्याजपासून 'तुझे वंशीं मीं जन्म घेऊन राज्य आक्रमण करीन' म्हणून वरदान घेतलें होतें, त्यास अनुलक्षून हें आहे. ३ खडाला (?). ४ शंकपाळ (?). ५ "सरदार मिळाले सदरेला । बाईनें शाहीर बोलाविले ॥ अमिनदास कवीश्वर । त्यानें कडाका गाइला ॥ दिला एक गांव बक्षीस त्याला । दोन सोन्याचे लंगर चढविले हाताला ॥" 'वि०' पाठ. ६ बीरमाल (?).

सहा कोसांवर व रायगडाचे पूर्वेस सुमारें पंधरा कोसांवर एका उंच टेंकडीवर बांधिलेला आहे. किल्ल्यांत जाण्यास बिकट पायवाटा असून मुख्य कल्याण दरवाजा आणि पुणें दरवाजा असे दोन मोठाले दरवाजे आहेत. किल्ल्याच्या आंत सुमारें एक कोस लांबीरुंदीचें त्रिकोणाकृति पटांगण असून भोंवतीं बळकट तटबंदी आहे. ह्या किल्ल्याचें नांव 'कोंडाणा' असें पूर्वीं होतें, तें शिवाजीमहाराजांनीं सन १६४७ त बदलून 'सिंहगड' ठेविलें. हा किल्ला कधीं व कोणीं बांधिला हें कळत नाहीं, पण सन १३४० त नागनाईक नामक सरदाराच्या ताब्यांत हा असतां दिल्लीचा बादशाह महंमद तघलक ह्यानें किल्ल्यास वेढा दिला; परंतु नागनायकानें त्याचा बचाव मोठ्या शौर्यानें केला, ह्यामुळें दिल्लीपतीस वेढा उठवून जावें लागलें. सन १४८६ त हा किल्ला अहमदनगरच्या गादीचा मूळपुरुष अहमद निझामशाह ह्याच्या स्वाधीन झाला. सन १६३३ त तो निझामशाहाच्या तर्फे शिवाजीमहाराजांचे वडील शाहाजीराजे ह्यांच्या स्वाधीन झाला. सन १६३७ त शाहाजीराजांनीं निझामशाहाची चाकरी सोडून विजापुरकरांची धरिली, त्यामुळें हा किल्ला विजापुरकरांच्या ताब्यांत गेला. सन १६४७ त शिवाजीमहाराजांनीं मुसलमान किल्लेदारापासून युक्तीनें हा किल्ला हस्तगत करून घेतला. त्या वेळेपासून सन १६६६ पर्यंत तो महाराजांचे ताब्यांत होता. सन १६६६ त मोगलांबरोबर महाराजांनीं तह केला त्या तहान्वयें जे वीस किल्ले मोगलांस परत द्यावे लागले, त्यांत सिंहगड होता. हा किल्ला परत घ्यावयाचा असा महाराजांचा निश्चय

असल्यामुळें त्यांनीं पुढें चार वर्षांनीं ह्मणजे सन १६७० त तानाजी मालुसरे ह्या शूर सरदारास सैन्यासह पाठवून तो मोगलांपासून हिसकून घेतला, याचें वर्णन पुढील पोवाड्यांत आहे.

ह्या पोवाड्याचा कर्ता तुळशीदास नांवाचा शाईर होता. हा मागील पोवाड्याचा कर्ता अज्ञानदास ह्याचा कोणी संबंधी दिसतो. हा शिवाजीमहाराजांचे वेळीं पुण्यांत मंडईचे बाजारांत राहत असे, व हा पोवाडा रचतांना अबदुलखानास मारल्याचा पोवाडा ह्यानें पाहिला असावा असें वाटतें. कारण कित्येक ठिकाणीं ह्या दोन्ही पोवाड्याच्या ओळींच्या ओळी जमतात. हा पोवाडा श्री० दाजीसाहेब शिरके यांनीं राघु बिन नारोजी रसाळ गोंधळी, वडघर, मांजरवाडी, जि० कुलाबा, यास मुद्दाम बोलावून आणवून त्याजकडून ह्मणवून उतरून घेतला.

**चाल–**" सांग सखे सुंदरी । कोण्या ग सुभगाची मदनमंजरी ॥ " **रामजोशी.**

**राजगड राजाचा[1] । प्रतापगड जिजाबाईचा[2] ॥ सिंहगड**

---

१ शिवाजीमहाराज सन १६६४ पर्यंत राजगडावर राहत असत. हा किल्ला महाराजांची राजधानी होती. नंतर सन १६६४ सालींच महाराजांनीं सुरत शहर लुटून पुष्कळ संपत्ति रायगडावर आणून ठेविली आणि तेव्हांपासून रायगड किल्ला ही आपली राजधानी केली. रायगडास पूर्वीं ' रायरी ' असें नांव होतें. बाराव्या शतकांत रायरीस ' रायगिरी ' ह्मणत; आणि तो किल्ला विजयनगरच्या ताब्यांतील मराठे पाळेगार यांच्या ताब्यांत होता. सन १६४८ मध्यें तो किल्ला मराठ्यांच्या ताब्यांत आला. यूरोपांतील जिब्राल्टर किल्ल्यासारखा रायगड किल्लाही फार मजबूद आहे. शिवाजीमहाराजांस राज्याभिषेक याच किल्ल्यावर झाला. २ जिजाबाई प्रतापगडावर राहत असत.

पन्हाळा । पहा त्या मोंगलाचा ॥ सरजा शिवाजी शिवभजन । काबिज[१] केलें तळकोंकण ॥ गड माहुली घेतली । कल्याण भिंवडी काबिज केली ॥ खबर त्या विजापुराला[२] गेली । ठाणें राजाचें बसलें ॥ शिवाजी महाराज । राजगड[३] किल्ल्यावर बसले ॥ जिजाबाई माता । आहे प्रतापगडावरी ॥ सोमवाराच्या दिवशीं । हातीं हस्तनाची[४] फणी ॥ उंगवते[५] बाजुला नजर केली । नजर सिंहगडावर गेली ॥१॥

बारा मावळ पुण्याखालीं । बारा मावळ जुंनराखालीं[६] ॥ पुण्यांच्या[७] तोंडाला जेजुरीच्या बारीला[८] । किल्ला सिंहगड पाहिला ॥ नवें कोंबडीचें अंडें । ऐसा किल्ला झळकला[९] ॥ ऐसा पंतोजी[१०] तो काका । त्यानें हुजऱ्या बोलाविला ॥ जावें राजगड किल्ल्याला । सांगा शिवाजीमहाराजाला ॥ जेवावें राजगड किल्ल्याला । अंचवावें[११] प्रतापगडाला ॥२॥

---

१ सर केलें. २ विजापूरच्या बादशाहाकडे खबर कळली. ३ शिवाजीमहाराज या वेळीं रायगड किल्ल्यावर असावे असें दिसतें. कारण मर्ढेघाट, बिरवाडी आणि पोलादपूर हीं गांवें रायगडच्या खालीं असून रायगड आणि प्रतापगड ह्यांच्या मध्यें आहेत. तसेंच ग्रांटडफच्या इतिहासांत तानाजी रायगडाहून निघाला असें आहे. परंतु गोंधळ्यानें पोवाडा ह्मणतेवेळीं राजगड हा शब्द उच्चारिल्यामुळें तो शब्द तसाच कायम ठेविला आहे. ४ हस्तीदंती. ५ पूर्वेस. ६ पुण्यासारखींच बारा मावळें जुन्नराखालींही असल्याचें ह्मणत. ७ पुण्यापासून सहा कोसांवर सिंहगड किल्ला आहे. ८ रस्त्यावर. ९ सिंहगडाची शोभा दुरून अप्रतिम दिसते. १० पंतोजी काका हा प्रतापगड किल्ल्यावरचा जिजाबाईसाहेबांचा विश्वासू सेवक होता. ११ जरूरीचें बोलावणें करावयाचें असल्यास " तेथें जेवीत असल्यास आंचवण्यास येथें यावें " असें सांगण्याची चाल आहे. तसा निरोप शिवाजीमहाराजांस जिजाबाईसाहेबांनीं पाठविला.

शिवाजीमहाराज पांच पोषाख नटला । पाईं तुमानी सुरवारी[1] चढविल्या ॥ अंगीं किनखाप[2] घातले । शिरीं जिरीटोप घातला ॥ हातीं वाघनखें घालून । कृष्णघोडीला[3] जिन केला ॥ ढाल पाठिवरी टाकिता झाला । सोनसाळी[4] पट्टा हातांत घेतला ॥ कृष्णघोडीला चाबुक केला । आला मढ्यांच्या[5] घाटाला ॥ घाट मढ्याचा उतरला । आला बिरवाडी[6] गांवाला ॥ गांव बिरवाडी सोडिला । आला पोलांतपुराला[7] ॥ पोलातपुर सोडिलें । घाट पाराचा[8] वेंघला[9] ॥ आले प्रतापगड किल्ल्याला । सलाम[10] जिजाबाईला केला ॥ ३ ॥

---

१ सुरवारी कापडाचे पायजमे चढविले. २ किनखापी कापडाचे अंगरखे घातले. ३ कृष्णघोडी हें घोडीचें नांव आहे. हें तिचा रंग काळा असल्यावरूनही पडलें असेल. ४ सोन्याचें काम ज्या पट्ट्यावर केलें आहे असा. ५ मढेघाट म्हणून एक कोंकणांत जाण्याचा घाट आहे. हा कुलाबा जिल्ह्यांत बिरवाडी प्रांतांत असून तेथून पुण्यास जाण्याचा रस्ता होता. सन १८२६ पर्यंत त्या घाटानें ओझ्याचे बैल जाण्यास अडचण पडत असे. त्या घाटानजीकचें गांव वाडी बुद्रुक हें आहे. ६ बिरवाडी रायगडाखालीं नजिकच व महाडापासून सहा मैल दूर आहे. ७ पोलादपूर हें गांव कुलाबा जिल्ह्यांत असून बिरवाडीपासून सात मैलांवर आहे, व महाडच्या दक्षिणेस दहा मैलांवर आहे. सातारकर छत्रपतिमहाराजांची बखर लिहिणारे मल्हार रामराव चिटणीस हे पोलादपुरचेच. ८ पारघाट महाडापासून पंधरा मैलांवर आहे. ९ चढला. १० नमस्कार केला. पूर्वी यावनी भाषा मराठी मार्फत बरीच संपादत असे तीस अनुसरून "सलाम केला" असें म्हटलें आहे.

धाडला तुह्मीं हुजरांचा जासूद । काम सांगावें आ-ह्माला[1] ॥ शिवाजीमहाराज । डाव फांशाचा खेळावा ॥ डाव खेळावा उमाजी[2] यानें । तूं माता मी तुझा पुत्र ॥ डाव खेळावा मातेसंगें । हें आमचें महत्व[3] नव्हे ॥ मायलेंकरांचा डाव । ह्यामधिं कांहीं गुंता नाहीं ॥ येवढ्या जाबावरून । ज्यानें तिर्वड[4] मांडिली ॥ हातीं फांसा ह्यानें घ्यावा । डाव पहिला येऊं दे तुला ॥ मी बायकोची जात । पहिला डाव येऊं दे तुझा ॥ ४ ॥

हातीं फांसा जो घेतला । बारा बारा तो बोलला ॥ फांसा जमिनीवर फेंकला । त्याचा तिरपगडा पडला ॥ तिरपगडा बोलला । त्याची बेती हो पडली ॥ बेती हो बोलला । त्याचे बारा जे पडले ॥ तिन डाव गेले ज्याचे । त्या शिवाजीमहाराजाचे ॥ जिजाबाई ग माते । आतां डाव येऊं दे तुझा ॥ येवढ्या जाबावरून । बाईनें हातीं फांसा घेतला ॥ प्रतापगडची भवानी देवी । तूं पाव माझ्या नवसाला । बारारे बोलली बाई । बाईचे बारारे पडले ॥ बाई बेतीन बोलली । बाईचे बेतीन पडले ॥ तिरपगडें बोलली । बाईचें तिरपगडें पडलें ॥ जिजाबाईचे डाव पुरे झाले । बाईचे डाव पुरे रे झाले ॥ ५ ॥

---

१ आज्ञाधारक सेवक जसा आपले स्वामीपाशीं विनय दाखवितो तसा प्रकार शिवाजीमहाराजांचा मातोश्रीविषयीं आहे. महाराज परममातृभक्त होते ह्मणून मातोश्रींची आज्ञा शिरसावंद्य मानीत. २ उमाजी ( ? ). ३ योग्यता नव्हे. ४ तीनही फांसे जोडले.



ऐक जिजाबाई । सत्ताविस किल्ल्यांचा मी राजा ॥ माग माग जिजाबाई । जें मागाल तें देतों तुज ॥ नाशकाची बारी सांवताची वाडी । ह्यांतून किल्ला मागून घ्यावा ॥ तुंग तिकोना लवुगड किल्ला विसापुर । ह्यांतून कनूचा मागून घ्यावा ॥ ह्यांतून नको मला बाळा । पुण्याचे तोंडाला ॥ आहे जेजुरिच्या बारीला । पुरंदर किल्ल्याला ॥ बारे पुरंदर किल्ला । आहे सिंहगड किल्ला ॥ घेऊन द्यावा मला । आयुष्य मागेन तुझ्या राज्याला ॥ नांव घेतां सिंहगडाचें । राजा थरथरां कांपला ॥ हा किल्ला उदेभान[1] मोगलाचा । बाई उदेभान मोगलाचा ॥ जे उमराव गेले सिंहगडाला । त्यांच्या पाठी ग पाहिल्या ॥ नाहीं[2] पुढे पाहिले । किल्ला आहे वाघाचा जबडा ॥ सत्ताविस[3] किल्ल्यांची बारी । ह्यांतून मागावा बाईनें ॥ नाहीं सिंहगड किल्ला दिल्या । मी शाप देईन ॥ राज्य जाळून टाकीन उभे । नको बाई चल माझ्या राजगड किल्ल्याला ॥ ६ ॥

बारा भोयांची पालखी । आंत बाईला बसविली ॥ राजगड किल्ल्याला । शिवाजीमहाराज जाऊन तक्तावर

---

१ उदेभान हा मोगल नसून राठोड रजपूत होता असें 'शिवराजभूषण'-काव्यावरून दिसतें, परंतु याचे आचरणावरून यानें मुसलमानी धर्म स्वीकारला असावा, किंवा निदान हा मोगलांचा सर्वथैव अनुयायी होता असें अनुमान होतें. २ ते जिवंत परत आले नाहींत असा अर्थ. ३ या किल्ल्यांपैकीं प्रसिद्ध किल्ल्यांचीं नांवें:–रायगड, राजगड, प्रतापगड, जावळी, रोहिडा, मकरंदगड, पुरंदर, तोरणा, तुंग, तिकोना, विसापुरगड, लोहगड आणि मंडनगड.

बसले ॥ ज्यानें वात लावूनी । जात शोधाया लागले ॥ सिंहगड किल्ला घेणें । मला कोणी उमराव दिसेना ॥ प्रहर रात्रीपासूनि । बारांचा अंमल झाला ॥ प्रतापगडाखालीं । उमराठ्या[1] गांवाला ॥ ज्यानें उमराव शोधिला । माझा तान्या[2] मालुसरा ॥ तानाजी सुभेदार । पन्नास माणसांचा सरदार ॥ शिवाजीराजाचे राज्यास । ऐसा उमराव होणें नाहीं ॥ किल्ला घेईल सुभेदार । तानाजी सुभेदार ॥ खरखर लखोटा लिहीला । ज्यानें हुजऱ्या बोलाविला ॥ जावें उमराठ्या गांवाला । तानाजी सुभेदाराला ॥ तीन दिसांचा वायदा जो केला । बारा हजार फौज ती घेऊन भेटावें तिसऱ्या दिवसाला ॥ ७ ॥

पंतोजी तो काका । ज्यानें लखोटा घेतला ॥ ज्यानें राजगड तो सोडिला । आला येल्याचे पेठेला ॥ पेठ येल्याची सोडिली । आला डोणीचे पाण्याला ॥ घाट मढ्याचा उतरला । आला बिरवाडी गांवाला ॥ हुजरा तेथून निघाला । आला कोलातपुराला ॥ तेथून निघाला । गेला उमराठ्या गांवाला ॥ सवाप्रहर दिवस आला । तानाजी सुभेदार राजा सदरेला[3] बैसला ॥ ८ ॥

जासूद महाराजांचा पाहिला । तानाजी सुभेदार सुखी झाला ॥ पोटीं रायाबा तो बेटा । स्वयंवर[4] बाळाचें मांडिलें ॥

---

१ हें गांव प्रतापगडाखालीं असावें. २ तानाजी मालुसरा हा महाराजांच्या बाळपणच्या अत्यंत जिवलग मित्रांपैकीं एक होता. ३ सभेंत. ४ लग्न.

काढल्या पंचमीच्या हळंदी[1] । काढलें षष्ठीचें लगिन ॥ लगिन बाळाचें मांडिलें । आली सिंहगडची कामगिरी[2] ॥ लगिन रायाबाचें[3] राहिलें । ज्यानें उमराव बोलाविले ॥ ज्याचा शेलार तो मामा । ज्याचा सूर्याबा[4] तो बंधु ॥ येसा कणकर रुमाजी दादा । ज्यानें सरदार बोलाविला ॥ माझ्या शेलार[6] तूं मामा । आली सिंहगडची कामगिरी ॥ दादा परपर बावाजी । ज्यानें हुजऱ्या बोलाविला ॥ मिषा तोंड मकाजी । ज्यानें हुजऱ्या बोलाविला ॥ ९ ॥

मामा बोलाया तो लागला । ऐंशीं वर्षांचा म्हातारा ॥ लगिन राहिलें रायाबाचें । तो मजला सांगावी ॥ माझ्या तानाजी सुभेदारा । जे गेले सिंहगडाला ॥ त्याचे पाँठिरे पाहिले । नाहीं पुंढारे पाहिले ॥ ज्यानें आंबारे खाईला । बाठा बुरजा लाविला ॥ त्याचें झाड होउनि आंबे बांधले ।

---

१ लग्नाचे अगोदर सुमुहूर्तावर होणारा संस्कार. २ लढाई. ३ तानाजीचा मुलगा रायाबा याचें. ४ सूर्याजी हा तानाजीचा बंधु मोठा पराक्रमी होता. सिंहगड किल्ला हस्तगत झाल्यावर महाराजांनीं सूर्याजीस तेथील किल्लेदार नेमिलें; व पुढें एक महिन्यानें छत्रपतींनीं अविंधांपासून पुरंदर किल्ला घेतला त्या वेळींही ह्यानें फार वर्णनीय शौर्य दाखविलें. ५ येसाजी कंक (?). ६ शेलार हें एक मराठ्यांचें प्रसिद्ध आडनांव आहे. शेलार हा शब्द 'शिलाहार' किंवा ' शिलार ' ह्या नांवाचा अपभ्रंश दिसतो. शिलारवंशाचे राजे कोंकणांत सन ८१० पासून १२८० पर्यंत ह्मणजे सुमारें ४५० वर्षें राज्य करीत होते. ह्या वंशांत अपराजित ऊर्फ बिरुंदक राम हा मोठा पराक्रमी राजा झाला. ह्याची राजधानी ठाणें ( श्रीस्थान ) येथें होती. ७ पाठीमागें. ८ पुढें. ह्मणजे ते जिवंत परत आले नाहींत असा अर्थ. ९ कोय.

किल्ला हातीं नाहीं आला ॥ सिंहगड किल्ल्याची वार्ता । काढूं नको तानाजी सुभेदारा ॥ जे गेले सिंहगडाला । ते मरूनशानी गेले ॥ तुमचा सपाटा होईल । असें बोलूं नकोरे मामा ॥ आम्ही सूरमर्द[1] क्षत्री । नाहीं भिणार मरणाला ॥ १० ॥

मग रायाबा तो बेटा । बाबाच्या जवळ आला ॥ ऐक ऐक माझ्या बाळा । जातों आम्ही सिंहगडाला ॥ माझें लगिन करील कोण । रायाबा पुसे बाबाला ॥ साता नवसांचा माझा रायाबा । त्याचें लगीन मागीन ॥ भिऊं नको माझे बाळा जातों राजगड किल्ल्याला । जाऊन सांगतों महाराजाला ॥ सात दिवसांचा वायदा[2] । घेऊन येतों तुझ्या लग्नाला ॥ आहें मी महाराजांचा चाकर । लखोटा हातांत घेतला ॥ ज्यानें एका लखोट्याचे । बारा लखोटे केले ॥ धाडले कागद खोऱ्याला[3] । मोठ्या मोठ्या सरदारांला ॥ पंधरा गांवचे पारूचे । त्यानें आपणाजवळ बोलाविले ॥ दसपटिचे मोकाशी । त्यानें आपणाजवळ बोलाविले ॥ उमराठ्याचे शिरके । त्यानें आपणाजवळ बोलाविले ॥ नांदविचे[4] सांवत । त्यानें आपणाजवळ बोलाविले ॥ वडघरचे[4] नाईक । त्यानें आपणाजवळ

---

१ शूर, प्रतापी. २ मुदत. ३ आसपासच्या दऱ्याखोऱ्यांतल्या खेड्यांला. ४ नांदवी व वडघर हे दोन्ही गांव कुलाबा जिल्ह्यांत आहेत. ज्या गोंधळ्याकडून हा पोवाडा मिळाला तो वडघर येथील राहणारा होता असें ह्या पोवाड्याच्या आरंभीं दर्शविलेंच आहे. ५ अस्सल मराठे.

बोलाविले ॥ सिलमाचे ठाकूर । त्यानें आपणाजवळ बोलाविले ॥ बाराहजार फौजेला । ज्याचा लखोटा पोंचला ॥ ११ ॥

अरे फलाणाचे फलाणा । घाव घाला निशाणा ॥ बारा[1] हजार लोक बिनहत्यारी । हातें सैन्य बोलाया लागलें ॥ बिनहत्यारी लोक । कसे जाऊं महाराजांचे भेटिला ॥ ज्यानें सैन्य पाहिलें । बारा हजार लोक बिनहत्यारी आले ॥ आंकड्या[2] कोयत्या त्या कमरेला । टापसीच्या खोळा डोईवर[3] घेतल्या ॥ हातीं सोटा घेऊन । सलाम त्यांनीं केला सुभेदाराला ॥ माझे तानाजीची हिम्मत । म्हणून मिळाली जमात[4] ॥ ज्यानें पेटारा उघडिला । बारा हजार रुपया बाहेर काढिला ॥ बारा हजार मनुष्यें । त्यांचे हातांमधिं दिला ॥ दाढी डोई रे करावी । [6]चिरी मिरी रे घ्यावी ॥ चला महाराजांचे भेटिला । राजगड किल्ल्याला ॥ १२ ॥

बारा हजार फौज बोलूं लागली । मनीं विचार त्यानें केला ॥ जातों राजगड किल्ल्याला । धनगर अडाविल बायकोला ॥ अब्रू घेईल आमुची । बारा हजार रुपया

---

१ मल्हार रामराव चिटणीसकृत बखरींत एक हजार मावळे तान्हाजीबरोबर होते असें आहे. २ आंकड्या कोयत्या हीं जंगलांतील हत्यारें आहेत. तीं च कमरेस बांधून लोक आले होते. ३ टापसीप्रमाणें डोकीवर. ४ जात किंवा जमाव, मंडळी. ५ श्मश्रु. ६ किरकोळ बक्षिस. पण तेंच बक्षिस सोन्याच्या कड्यातोड्याबरोबरचें त्या मावळे मंडळीस वाटलें.

त्यानें मागें लावून दिला ॥ सुभेदार बोले त्या सेनेला । बारा हजार रुपया काय केला ॥ घेतलें धनगराचें घोंगडें । त्याला मागें लावून दिला ॥ बारा भोयांची पालखी सवारिली । तोरण[1] पालखीला बांधिलें ॥ पाय दिला पालखीमध्यें । हात पालखीला दिला ॥ रायाबा तो बेटा । बाबाच्या आडवा येणार झाला ॥ माझें लगीन करिल कोण । तुम्ही जातां सिंहगडाला ॥ भिऊं नको माझे बेटा । तुझे मी येतों लग्नाला ॥ आधीं लगीन सिंहगडचें[2] । मग करीन रायाबाचें ॥ १३ ॥

हुकूम ज्यानें भोयांला केला । आले नगरीचे[3] वेशीला ॥ तोरण पालखीचें तुटून । उजव्या बाजूवर पडलें ॥ माझ्या शेलार तूं मामा । आम्ही जातों सिंहगडाला ॥ अपशकुन झाला । माझ्या तानाजी सुभेदाराला ॥ तानाजी सुभेदारानें । ह्याचा गुमान[4] नाहीं केला ॥ गेला गांवाच्या शिंवेवर । ज्याला आडवा तास[5] गेला ॥ मग तो शेलार मामा बोलला । तानाजी सुभेदाराला ॥ तानाजी सुभेदारा । मोहोरें बरें नाहीं होणार ॥ राजा शिवाजीचें देणें । अढळपदीं सोनें ॥ १४ ॥

---

१ माळेसारखें लांब आम्रपल्लवाचें किंवा सुंदर पुष्पांचें शुभसूचक केलेलें असतें तें. २ अगोदर सिंहगड घेईन, नंतर तुझें लग्न करीन असा अर्थ. ३ गांवच्या वेशीवर तोरण तुटलें. ४ पर्वा. ५ तास पक्षी आडवा जाणें हा एक शकुन मानतात.

अपशकून मानूं नये । ज्यानें हर हर वाहिला ॥ गांव उमराठें सोडिलें । पांचकर्णांचा बाजा केला ॥ आले त्या पोलातपुराला । पांचकर्णांचा बाजा केला ॥ गेले बिरवाडी गांवाला । पांचकर्णांचा बाजा केला ॥ घाट मढ्याचा वेंघला । गेले डोणीचे पाण्याला ॥ गलीम[1] तेथुनि निघाला । गेला येल्याच्या पेठेला ॥ गलीम तेथूनि निघाला । गेला राजगडच्या पोटाला ॥ बारांच्या अंमलांत । गेले किल्ल्याच्या पोटाला ॥ बारा हजार फौज चाले । धुरळा गगनास[2] गेला ॥ १५ ॥

हिरव्या[3] बुरजावरून । जिजाबाईनें पाहिला ॥ माझ्या शिवाजीमहाराजा । गलीम वैरियांचा[4] आला ॥ तोफांला आग घाला । गलीम मारावा किल्ल्याखाला ॥ शिवाजीमहाराजानें । गलिम नजरेनें पाहिला ॥ तो शिवाजीमहाराजाचा । भगवा[5] झेंडा ओळखिला ॥ माझे जिजाबाई माते । आमचा तानाजी सुभेदार आला ॥ नांव घेतलें

---

१ मुसलमान लोक मराठ्यांस 'गलीम' ह्मणत. गलीम म्हणजे शत्रु. २ आकाशापर्यंत धुळीचे लोट उडाले. ३ हिरवा बुरूज हा रायगडावर जो उंच बुरूज आहे त्याचें नांव. ४ शत्रूचा जमाव. ५ शिवाजीमहाराजांचे फौजेंत भगवा झेंडा फडकत असे. हा झेंडा त्यांस रामदासस्वामींनीं दिला. छत्रपतींनीं स्वामी सातान्याच्या किल्ल्यावर भिक्षेस आले असतां आपलें सर्व राज्य अर्पण करून त्याबद्दलची चिठ्ठी स्वामींच्या झोळींत टाकल्याची कथा रामदासस्वामींच्या बखरींत आढळते.

सुभेदाराचें । बाई गद्गदां हांसली ॥ सैना तानाजीची पाहिली । मनांत संतोषित झाली ॥ १६ ॥

बारा हजार फौज घेऊन । सुभेदार दरवाजाला[1] आला ॥ पहिल्या सदरे[2] जमाडिला[3] । सूर्या गगनीं लखाकला ॥ दुसऱ्या सदरेमधीं । कमरकमर कांपुस[4] टाकला ॥ तिसऱ्या सदरेमधीं । ज्यानें चांदवे बांधिले ॥ चवथ्या सदरे-मधीं । हंड्या झुंबर बांधिले ॥ पांचव्या सदरेमधीं । महाराज शिवाजी बैसले ॥ सुभेदार सलामाला गेला । महाराजावर घुसा केला ॥ मागचे दिवस मागल्यापरी । मोहरिल दिवस मोहरल्यापरी ॥ माझ्या बेट्याचें लगीन तुह्मीं जासूद धाडिला । तुमचा काय वाद केला ॥ ऐक तानाजी सुभेदारा । आमची कामगिरी नव्हे तुह्माला ॥ जिजामातेनें बोलाविलें । दोघांचा जबाब जिजाबाईनें ऐकिला ॥ जिजाबाई बोलाया लागली । मी जातीनें जाईल ॥ आतां सुभेदार येईल । माझी अबरू घेईल ॥ १७ ॥

सर्व शृंगार नेटली[5] । धांवा अंबाबाईचा[6] मांडिला ॥ भले भले अंबाबाई । तानाजी सुभेदार आला ॥ इच्छे[7]-प्रमाणें होऊंदे । सिंहगड किल्ल्याची पंचारती केली ॥ गेली सुभेदाराला ओंवाळायाला । तुझे जाऊं अलाबला ॥

---

१ किल्ल्याच्या दरवाज्यांत आला. २ सदर म्हणजे दिवाणखाना—समागृह. ३ जमाडिला ( ! ). ४ रुजामे, गाद्या वगैरे. ५ डागडागिने अंगावर घालून पोषाख केला. ६ देवीचा धांवा केला. ७ सिंहगड घेण्याचीच इच्छा होती.

तानाजी सुभेदारा । चढत्या दवलतीचें राज्य येऊंदे तुला ॥ सुभेदाराला ओंवाळितां । त्याचा राग निघून गेला ॥ ज्याला वर्तली चिंता । ही आहे महाराजांची माता ॥ इच्या आरतीला । मी घालूं काय आतां ॥ ज्यानें [1]मंदिल काढिला । बाईचे पायांवर ठेविला ॥ जिजाबाई बोलली । तानाजी सुभेदाराला ॥ माझा सुभेदार शाहाणा । [2]हात मस्तकीं ठेविला ॥ माग माग जिजाबाई । जें मागशील देतों तुला ॥ काय मागूं सुभेदाराला । ह्या ह्मातारपणीं सिंहगड किल्ला ॥ घेऊन द्यावा मला । आयुष्य मागेन तुझ्या राजाला ॥ माझा शिवाजी थोरला माझा तानाजी [3]धाकटा । लेकाचें वाण दिलें त्याला ॥ १८ ॥

सुभेदार तेथुनि निघाला । आपल्या सेनेमधिं आला ॥ शेलार त्याचा मामा । त्याला पुसाया लागला ॥ गेला बाईच्या भेटीला । तुह्मीं [4]काय मजकूर केला ॥ काय सांगूं शेलार मामा । जाणें आहे सिंहगडाला ॥ जावें जावें बाईच्या भेटीला । बारा हजार फौज आली तुझ्याग कामाला ॥ [5]नाहीं गाढव वळायाला । जेवण कर बारा हजारांला मग आह्मी जाऊं सिंहगडाला ॥ माझ्या सुभेदार बाळा । तुजवर घातलें गडाचें ओझें ॥ भला भला

---

१ मंदिल काढणें याहून अधिक लीनपणा नाहीं. २ हात मस्तकावर ठेवणें याहून अधिक प्रेम नाहीं. ३ तानाजीस धाकटा पुत्र ह्मणून मानलें. ४ काय केलें त्याची हकीकत. ५ ही फौज तुझ्या कामासाठीं आली, गाढवें राखण्यास आली नाहीं.

सुभेदारा । यावें जेवायाला ॥ आहे गडाची रे वस्ती । येथें अन्नरे मिळेल ॥ नाहीं मिळायाचें पाणी । जावें गुंजवऱ्या नदीला ॥ आंघोळ करायाला । मग यावें जेवायाला ॥ १९ ॥

बारा हजार फौजेनिशीं । सुभेदार गडाखालीं उतरला ॥ गडाखालीं उतरून । ज्यानें विचार काढिला ॥ मग त्या शेलार मामानें । विचार काढिला ॥ भलाभलारे सुभेदारा । तीन कोस जावयाला वेळ फार झाला ॥ धोपेर[1] संध्यारे करा । चला जाऊंरे जेवणाला ॥ बारा हजार फौजेंतुन । एकटा सुभेदार गेला ॥ गुंजवऱ्या नदीला । आंघोळ करायाला ॥ ज्यानें आंघोळ संध्या केली । आला आपल्या फौजेमधीं ॥ बारा हजार फौज घेऊन । आला दरवाज्याचे तोंडीं ॥ ज्यानें सैंपाक पाहिला । बारा हजार पाट मांडला ॥ बारा हजार द्रुनं[2] । बारा हजार पंचपात्री ॥ बारा हजार लाविला ठाव । सैंपाक वाढून त्वरीत झाली ॥ २० ॥

ज्यानें सैंपाक पाहून । हुर्दं[3] ज्याचें भरून आलें ॥ आग लागो जेवणाला । माझा बाळ अंतरला ॥ ज्याचा शेलार तो मामा । बोलाया लागला ॥ भला भला सुभेदार । ऐशीं वर्षांची उमर ॥ ह्यारे जिजाबाईची । एकटी वाढील रे कुणाला ॥ मामा बोले सुभेदाराला । अठरा

१ हातपाय धुऊन जेवणास चला. २ द्रोण. ३ हृदय.

शाखा अठरा भाज्या ॥ एक ठिकाणीं करा । जेवण वाढिलें फौजेला ॥ अर्धे उठून उभे राहिले । बारा हजार फौजेनें एकच गर्दी केली ॥ कोणी करितो पोळी पोळी । कोणी करितो खिर खिर ॥ कोणी करितो भाजी भाजी । कोणी करितो डाळ डाळ । त्यानें एकच गर्दी केली । जिजाबाई माता बहुत श्रमी झाली ॥ धांवा अवघा मांडिला । प्रतापगडची भवानी[1] धांव संकटाला ॥ सातारगडची मंगळाई । पुण्याची पर्वती ॥ माझे पाराचे वरदानी । पावग संकटाला ॥ पांचजणी देवी । धांवुनिया आल्या ॥ सैंपाक वाढाया लागल्या । ऐकेनात कुणाला ॥ ज्याचा मापट्याचा आहार । त्याचा अधोलीचा झाला ॥ ज्याच्या मोहरें पांच पोळ्या । त्याच्या पंधरा पोळ्या झाल्या ॥ खाववतील त्यानें खाव्या । उरतील त्यांनीं गडाखालीं टाकाव्या ॥ २१ ॥

बारा हजार फौज । जेऊन तृप्त झाली ॥ तानाजी सुभेदार गेला । शिवाजिच्या मुजऱ्याला ॥ आह्मी जातों सिंहगडाला । आमचा रायाबा संभाळा ॥ जर आलों सिंहगडाहून । लगीन करीन रायाबाचें ॥ जर गेलों तिकडे

१ तुळजापूरची भवानी शिवाजीमहाराजांची मूळची कुलदेवता. सन १६६१ च्या पावसाळ्यांत शिवाजीमहाराजांस राजकारस्थानामुळें तुळजापुरास जातां आलें नाहीं म्हणून महाराजांनीं प्रतापगडच्या किल्ल्यावर मोठ्या समारंभानें भवानीची स्थापना केली. शिवाजीमहाराजांची प्रसिद्ध भवानी तलवार प्रतापगडच्या भवानीपासून महाराजांस मिळाली असें ह्मणतात.

मेलों । लगीन करा रायाबाचें ॥ मज बापाची सरदारी । द्यावी रायाबा बेट्याला ॥ दिवटी बुदलीची जहागीर । द्यावी रायाबा बेट्याला ॥ डोंजगांव द्यावा पानसुपारिला । मालसन्याचा दंड द्यावा इनाम खायाला ॥ सुभेदार तेथून निघाला । आला बाईचे भेटिला ॥ डोईचा मंदिल काढला । बाईच्या चरणावर ठेविला ॥ आह्मी जातों सिंहगडाला । माझ्या बेट्याला सांभाळा ॥ बाईनें पेटारा उघडिला । पांच पोषाख काढिले ॥ त्या ग सुभेदाराला दिले । यांतून जरी जगून तूं आला ॥ नवा पोषाख करिन तुला । ज्यानें पोषाख तो केला फौजेमधीं गेला ॥ २२ ॥

शेलार मामानें पाहिला । माझ्या ऐक सुभेदारा ॥ बारा हजार फौज । आलीरे तुझ्या कामाला ॥ हा पोषाक तो घ्यावा नेऊनशानी द्यावा । देशील तर द्यावा बारा हजारांला ॥ येवढ्या जाबावरून । बाई मनीं चरकली ॥ काय सांगूं सुभेदाराला । देईन बारा हजाराला ॥ चढविन सिंहगडची पायरी । बाईनें कोठार उघडिलें ॥ मोहरे येरें बारा हजार तलवार । बारा हजार काढिल्या ढाला ॥ बारा हजार गुर्दा । बारा हजार सिंगडा ॥ बारा हजार चौकडा । बारा हजारांना तोडा ॥ बारा हजार पोषाक । बारा हजारांना केसरी झगा ॥ घेरदार बारा हजार । कोणी उमराव समजेना ॥ एकापेक्षां एक अधिक । दादा फौज निघाली ॥ २३ ॥

---

१ पुढें ये असें ह्मणाली.

माझे जिजाबाई माते । माझ्या बाळाला सांभाळा ॥ तानाजी सुभेदार । बारा भोयांचे पालखीमधिं बसला ॥ सर्व सेनेला मग तो मुजरा केला । बसा बसा दादांनो ॥ आह्मी जातों सिंहगडाला। आमचा रामराम तो घ्यावा ॥ ज्यानें राजगड तो सोडीला। पांचकर्णांचा बाजा केला॥ [1]गलीम तेथून निघाला । [2]साखरेच्या मुक्कामीं गेला ॥ पांचकर्णांचा बाजा केला । गलीम तेथून निघाला ॥ गेला खामगांवाला । पांचकर्णांचा बाजा केला ॥ गलीम तेथून निघाला । गेला डेऱ्याच्या मुक्कामीं ॥ पांचकर्णांचा बाजा केला। गलीम तेथून निघाला ॥ गेला सिंहगडच्या पोटाला । तेथुनि कर्णा बंद केला ॥ २४ ॥

गलीम आनंदी बारीला । दबा दिला भला ॥ माझ्या शेलार मामानें काळी घोंगडी हांतरिली। विडे पैजेचे मांडले ॥ ज्यानें विडा उचलावा । त्यानें जावें सिंहगडच्या माहितीला ॥ माहिती काढून येईल त्याला । छत्री घोडा इनाम त्याला बारा गांव इनाम देईन त्याला ॥ ज्या वीरांच्या वरती माना । त्यांनीं खालती घातल्या॥ हात कोणी लाविना विड्याला । तानाजी सुभेदार भला ॥ त्यानें हात विड्याला घातला । विडा मंदिलीं खोंविला ॥ २५ ॥

सूर्याबा रे बंधु [3]आँरता येरे माझ्या दादा । आह्मी जातों

---

१ मराठ्यांचें सैन्य. २ साखरें हें गांव कुलाबा जिल्ह्यांत आहे. ३ इकडे अथवा जवळ.

सिंहगडाला ॥ जगुनशानि आलों । लगीन करूं रायाबा-चें ॥ गेलों तिकडे भेलों । लगीन करा रायाबाचें ॥ ता-नाजी सुभेदार त्यानें पोषाख काढिला । पाटलाचा थाट केला ॥ जंगल लागलें दारुण । वेळु करकरां वाजती ॥ लागलें चिंबारीचें[1] रान । लागलें आळविचें[1] रान ॥ आरी-बोरीचें दारुण । वाट नाहींरे जावयाला ॥ काळोखी रात्र । वाट नाहींरे जावयाला ॥ वन धुंडाया लागला । वाट मिळेना जावयाला ॥ सुमार पाहाया लागला । बारे धोंडीवर चढला ॥ गेला कोळ्याचे ग्याटोला[2] । बाराजण कोळी होते पहिल्या ग्याटाला ॥ त्यानें सुभेदार पाहिला । मारा मारा ह्या चोराला ॥ सुभेदार बोलाया लागला । भ्यालों ह्या चोराला ॥ हे ठार मारतील मला । चोर अ-सलों ठार मारा ॥ साव असलों तर काय मारतां । बाय-कोच्या याराला ॥ जरा बत्ती तुह्मी लावा । यावें मला पाहावयाला ॥ २६ ॥

पहिल्यानें सरदार पाहिला । धन्य याची नारायणा ॥ कोण तुमचें नांव गांव । येवढें सांगावें आह्मांला ॥ मी साखरेचा पाटील । गेलों होतों पुण्याला ॥ मंडईच्या वाड्यांत । गेलों होतों पट्टी[3] लावायाला ॥ जात होतों घराला । तेथें वाघानें आडविला ॥ तुमच्या आलों आ-श्रयाला । भलेभलेरे दादांनो ॥ वाईनें निघालों । पान

१ वृक्षविशेष. २ पाहऱ्याला. ३ सरकारी धारा देण्यास.

226692

खायाला विसरलों। पान द्यावें खायाला ॥ ऐक ऐक दादा। ह्या बारा वर्षांमधीं पान खाल्लें नाहीं ॥ बटवा खाकेचा सोडिला । यानें विडे जे काढिले ॥ बारा त्या कोळ्यांला। यानें बारा विडे दिले ॥ अफु माजुमाचे विडे कोळ्यांला दिले । कोळी झिंगूनशानी गेले ॥ २७ ॥

बारा बाराजण कोळी। पहिल्या दरवाज्याची भेट[1] करी॥ बारा असामींचा कोण सरदार सांगावा। आहें मी खंडोजी नाईक बारांचा सरदार ॥ ऐक खंडोजी नाईक । तुमची तैनात[2] सांगावी ॥ तीन रुपयांची तैनात । मला सरदाराला मिळती ॥ ह्यानें कंठी जी काढिली । दिली खंडोजी नायकाला ॥ ज्यानें तोडा जो काढिला । दिला विठोजी कोळ्याला ॥ चौकडा काढिला । दिला मालोजी कोळ्याला ॥ बारा कोळ्यांला बारा । ऐशा वस्ता त्यानें दिल्या ॥ कोळी फितूर[3] ते केले। ऐक ऐक पाटीलबोवा ॥ मोठ्या वस्तू आह्मांला जिरतील कशा । काम सांगा आह्मांला ॥ काम तुह्मांला सांगेन । भाक द्यावी रे मजला ॥ इमान ज्यानें दिलें । कोळ्यांनीं इमान दिलें ॥ मी आहें कोणाचा कोण । नांव सांगतों रे तुह्माला ॥ राजा शिवाजीचा उंबराव । आहें मी तानाजी सुभेदार॥ पन्नास माणसांचा सरदार । आहें मी एकला ॥ आलों सिंहगडच्या माहितीला । लांबी रुंदी सांगा मला ॥ २८ ॥

---

१ रखवाली करी. २ वेतन, पगार. ३ किल्ल्याचा भेद पूर्वी तानाजीनें केला होता, असें मल्हार रामरावही आपल्या बखरेंत म्हणतात.

नांव घेतां शिवाजीचें । कोळी खालती बसले ॥ ऐक ऐक तानाजी सुभेदारा । शिवाजीचें कुत्रें[1] नाहीं येत सिंहगडाला ॥ ज्यानें वस्ता घेतल्या । त्यानें सुभेदाराच्या पुढें ठेविल्या ॥ घे रे सुभेदारा । आल्या वाटेनें जावें राजगडकिल्ल्याला ॥ ऐक खंडोजी नाईका । इमान तूं रे मला दिलें ॥ द्यावी सेजेची बाइल । पण इमान देऊं नये ॥ येवढ्या जाबावरून । कोळी सांगायाला लागला ॥ ऐका सिंहगडची माहिती । तिनकोसांचा आहे बा घेरा ॥ दिडकोसाची आहे बा रुंदी । आहे अठराशें[2] पठाण सिंहगडाला ॥ आहे उदेभान मोंगल । दीड गाई दिड शेळी सवामण तांदुळ वेळेला ॥ अठराजणी बिब्या[3] । आहेत त्याच्या पलंगाला ॥ घेतो तेल्याची पहार । मणगटावर घालतो ॥ सरी करून घालतो । बिबिच्या गळ्यांत ॥ चांदवडी रुपया । दोहों बोटांनीं तोडितो ॥ २९ ॥

आहे बाच्छायाचा हत्ती । त्याचें नांव चंद्रावळी ॥ एक बाच्छायाचा हत्ती । करिल सब दुनियेची माती ॥ उदेभानाचा प्रधान । आहे सिद्दी हिलाल ॥ एक शेळी अर्धी गाई । आदमण तांदुळ त्याचे एका वेळेला ॥ नउजणी बिब्या । सिद्दी हिलालाच्या पलंगाला ॥ बाराजण

---

१ शिवाजीच्या तर्फेचा कोणीही मनुष्य. २ कृष्णाजी अनंत सभासद व रघुनाथ यादव चित्रगुप्त यांचे बखरींत बाराशें पठाण होते असें आहे. ३ बायका.

होते लेक । उदेभानाच्या पेक्षां भारी ॥ उगवत्या बाजुला । कडा आहे डोणागिरी ॥ तेथें आहे सोलाची जागा । डोणागिरीच्या कड्याला ॥ ३० ॥

बसावें सरदारांनो । जातों आपल्या गोटाला ॥ बाराजण कोळी चरण धरुन । तुह्मी काय सांगतां आह्मांला ॥ त्या मर्दाला पाहून । कोळी रडाया लागले ॥ शिवाजीच्या राज्यांत कोणी । तुजसारखा सरदार नाहीं पाहिला ॥ भिऊं नकोरे दादांनो । हा किल्ला हातीं आला तर ह्या किल्ल्याची सरदारी देईन तुह्मांला ॥ हजाराची तैनात देईन । बारा असामींला ॥ तानाजी सुभेदारानें दिला हातचा लखोटा । त्या खंडोजी कोळ्याला ॥ ३१ ॥

सुभेदार तेथुनि निघाला । आला आपल्या फौजेला ॥ ज्याचा शेलार तो मामा । त्याच्या पुढें धांवत आला ॥ तुह्मीं गेला सिंहगडाला । नवस केला बहिरोबाला ॥ माझा सुभेदार येऊंदे । बारा बकरे देईन तुला ॥ तुह्मी चला हो किल्ल्याला । जातों नवस फेडायाला ॥ ऐक ऐक शेलार मामा बारा द्यावयाचे ते चोवीस देऊं । पण किल्ला येऊंदे हाताला ॥ बहिरोबा आहे ओंगळ । त्याचा नवस पाहिजे फेडला ॥ ऐक ऐक शेलार मामा माझ्या महा-

---

१ सांखळ लावण्याची.

राजाचें देणें । अढळ पदीं सोनें ॥ नाहीं आह्मी बहिरोबा जाणित । साडेतिनशें देव पाणी रांजणांत भरतात ॥ ऐसा शिवाजीमहाराजा । आहे तळकोंकणचा राजा ॥ ३२ ॥

चला माझे दादांनो । हुकूम सैन्याला केला ॥ बारा हजार फौज गेली । कल्याणदरवाज्याला ॥ ज्यानें पेटारा उघडिला । काढिली यशवंत घोरपड ॥ सातशेर शेंदुर । तिच्या मस्तकीं थापिला ॥ भांग मोत्यांचा भरला । चरणीं मस्तक ठेविलें ॥ सांखळी कमरेला बांधिली । यशवंत घोरपड ज्यानें किल्ल्याला लाविली ॥ अर्ध्या किल्ल्याला गेली । घोरपड माघारी परतली ॥ [1]आउक्ष तानाजीचें समजली । घोरपड फिरली ती सुभेदारानें पाहिली ॥ सत्ताविस किल्ले मीं घेतले । घोरपड कधीं मागें नाहीं फिरली ॥ राग आला त्या मर्दाला । मी आहें मराठ्याचा पोर नाहीं भिणार मरणाला ॥ एक हात टाकीन । अठरा खांडोळीं पाडीन शिळ्या भाकरीसंगें खाईन ॥ त्या मरणाचे धास्तीनें । सात वेढे जी फिरली नखें रोंऊन बसली ॥ ३३ ॥

जावें जावें शेलारमामा सोल[2] बघायाला । ज्यानें टिचकीनें मारिली ॥ सोलाला जोरानें लागली । काळी घोंगडी जी सोडली ॥ ज्यानें बटवा जो सोडिला । बारा

---

१ आयुष्य. २ सांखळी.

विडे काढिले ॥ कोण शूर मर्द आहे क्षत्री । त्यानें विडा उचलावा हात सोलाला घालावा ॥ ज्या वीरांच्या वरती माना । त्यांनीं खालीं घातल्या माना ॥ सुभेदार बोलतो । भरा नायकांच्या बांगड्या ॥ एवढ्या जाबावरून । राग आला त्या सैन्याला ॥ मोहिता ह्मणतो [1]धार माझी । धाग ह्मणतो धार माझी ॥ चवाण ह्मणतो धार माझी । जाधव म्हणतो धार माझी । गायकवाड ह्मणतो धार माझी । शिरके म्हणतो धार माझी ॥ माहडिक ह्मणतो धार माझी । बारा हजार फौजेनें एकच गर्दी केली ॥ ३४ ॥

अरे फलाणाचा फलाणा । घाव घाला निशाणा ॥ [2]वस्त आली मोगलांची । त्यानें कानोसा घेतला ॥ हांक मारिली गेटाला । खंडोजी नायकाला ॥ किस्का गलबला मेरे भाई । एवढा सांगावा आह्मांला ॥ खालून कोळ्यानें जबाब दिला । जंगलमें धनगराचा वाडा ॥ त्यामध्यें बडा वाघ शिन्या । गाईकी [3]बैचडी खाते ॥ रांड पोर [4]किंचाड करते । वरती सुखी राज्य करा ॥ ३५ ॥

सुभेदार बोलतो सेनेला । पहिली सोल शिवाजीमहाराजांची ॥ दुसरी सोल अंबाबाईची । तिसरी सोल तानाजी सुभेदाराची ॥ पट्टे घेतले तोंडामधीं । सोल धरली हातांमधीं ॥ आपल्या बेताचे माणुस पन्नास मोजीले । सुभेदार गडावर चढले ॥ पन्नास कमी बारा हजार फौज ।

---

१ धार ( ? ). २ चोरगस्त. ३ वत्स. ४ गलबला.

खालीं होती त्यानें एकच गर्दी केली ॥ सूर्याबा जो बंधु। त्यानें एकच गर्दी केली ॥ दादा वरती गेला । बारा हजार फौजेनें हात सोलाला घातला ॥ तीन पुरुष वरती गेले । सोल मधींच तुटली ॥ पन्नास कमी बारा हजार । फौज धरणीवर पडली ॥ ३६ ॥

सुभेदार तो वरती जाऊन । त्याला दोन घटका झाल्या ॥ माझ्या शेलार तूं मामा । कां वेळ लागला फौजेला तूं जावें बघायाला ॥ सोल पाहून मामा । धोतरांत [2] * * ला ॥ काय सांगूं सुभेदारा । सोल ते तुटली आली मरणाची वेळा ॥ सुभेदार बोलाया लागला । नाहीं सोल रे तुटली माझें आयुष्य तुटलें ॥ ऐक ऐक शेलार मामा । माझ्या रायाबा बेट्याला रामराम सांगा ॥ ३७ ॥

शेलार मामा बोलतो। ऐक ऐक मी तुला एक तोंड सांगतों॥ आहे अठराशें फौज। किल्ल्याला अठराशें पठाण ॥ आहे उदेभान मोंगल । आहे सिद्दी तो हिलाल आहे चंद्रावळी हत्ती ॥ उडी टाका किल्ल्याखालीं । ह्मणजे पहायाला नको ॥ भला भला शेलार मामा । उडी टाकिली तरी प्राण जायाचा ॥ पन्नास माणसाचा सरदार ।

---

१ सूर्याजी मालुसरे यांचे नांवाची सनद सिंहगडचे कामगिरीबद्दलची करून दिली आहे, ती अजून मालुसऱ्यांचे घरीं आहे व तें इनामही अजून चालू आहे. मालुसरे हे राजगड तालुक्यांत आहेत. राजगड तालुका श्रीमंत पंतसचीव यांचे हद्दींत आहे. २ अश्लील शब्द काढून त्याचे जागीं फुल्या घातल्या आहेत.

सत्तावीस किल्ल्यांचा मी सरदार नाहीं भिणार मरणाला ॥ शूर मर्दांची कीर्ति । धांवा केला अंबाबाईचा ॥ प्रतापगडची भवानी । पाव माझ्या नवसाला ॥ सातारची मंगळाई । मग पुण्याची पर्वती ॥ तुळापुरची भवानी । माता पाराची वरदानी ॥ ३८ ॥

पांच देवी पुढें धांवत आल्या । गळ्यांत कवड्यांच्या माळा ॥ हात मारिला पाठीवर । भिऊं नको सुभेदारा ॥ यश तुझ्या तरवारीला । बळ देवीचें सांपडलें ॥ जोर हातींचा चढविला । मागची पुढची आशा सोडली ॥ खुन डोळ्यावर चढला । ऐक माझ्या शेलारमामा ॥ जेथें सुभेदाराचा पटा । तेथें पन्नासांचा पटा ॥ जेथें सुभेदाराची मान । तेथें पन्नासांची मान चलचल माझ्या मामा ॥३९॥

गेले पहिले दरवाजाला । ज्यानें दिंडीनें पाहिला ॥ होती आरबाची जात । होती मोगलाची जात ॥ होती मुसलमानाची जात । अफु माजुम खाली ॥ मदनमस्त झाली । ज्यानें डाव जे मांडिले ॥ कोण बारा बारा बोलती । कोण [1]ग्यारा रे बोलती ॥ ह्यानें एकच गर्दी केली। खणाखण वाजिती ॥ [2]व्हाळ [3]आसुदाचे वाहती । रक्त अंगाला लागलें खुन डोळ्याला चढला ॥ कोण करितो खुदा खुदा । [4]बुंधा धरणीला पडला ॥ कोण करितो अल्ला अल्ला । खालीं [5]कॉला जो पडला ॥ ४० ॥

---

१ अकरा. २ ओहोळ, पाट. ३ अशुद्धाचे, रक्ताचे. ४ बुधा ( ! ). ५ काला ( ! ).

पहिला दरवाजा मारिला । गेला दुसऱ्या दरवाजाला ॥ काळोखी रात्र घोर[1] । रात्रीचा अम्मल झाला ॥ दुसऱ्या दरवाजाला होता । तिनशें पठाण ज्यानें दिन दिन वाहिला ॥ मुसलमानी लोक दादा । बिनफिकिर होते नाहीं गलीमाची माहित ॥ तानाजी सुभेदार जैसा ठाणांत । वाघ लोटला सेनांत ॥ पांच पट्ट्याचा मारा केला । सवा घटकेमधिं तिनशें पठाण कापिला ॥ गेला तिसऱ्या दरवाजाला । होता चारशें पठाण ॥ दिन दिन ज्यानें वाहिला । चारशें पठाण कापिला ॥ एकंदर हिशेब नऊशें मनुष्यांचा झाला ॥ ४१ ॥

ऐक शेलार मामा । गलीमाचा हिशेब घ्यावा ॥ एक ह्यानें कमी । नउशें पठाण झाला ॥ त्यांत बोंब्या[2] निघून गेला । उदेभान मोंगलापाशीं गेला ॥ अठरा तो पेले अफूचे । उदेभान एकटा प्याला ॥ भंगीच्या जुड्या । आणि अफुच्या वड्या खाल्या ॥ उदेभान मोंगल मगरमस्त झाला । आठरा पलंग ज्यानें बिब्यांचे सँवारिले[3] ॥ ज्यानें लुंगिज सोडिली । ज्यानें खुंटीवर ठेविली ॥ चोर्नें[4] कराया चालला । तों ह्मोरें बोंब्या अवचित गेला ॥ मेरे उदेभान मोंगला । आग लागो तुझ्या चोऱ्याला ॥ सिंहगड किल्ला डुंब[5] होया । माई नऊशें पठाण कापिला ॥

---

१ प्रहर. २ हेर. ३ शृंगारिले. ४ ह्या शब्दाचा अर्थ 'चैन' किंवा 'विलास' असावा असें वाटतें. ५ बुडाला, ह्यातांतून गेला.

काळोखी रात्र नाहीं गलीमाची माहित । नऊशें पठाण काट्या ॥ **हमारे पर बैठ्या । आह्मी नाहीं चोऱ्याला सोडताया ॥ जा बालेकिल्ल्याला । जाऊन सांगा हत्तीच्या महाताला ॥ अठरा घागरी कुसुंबा पाजा हत्तीला । अठरा अफूचे ते पेले ॥ अठरा माजुमाच्या वड्या पांच पटे त्या सोंडेला । चंद्रावळीचा हत्ती जाऊंदे कल्याणदरवाज्याला ।४२।

सुभेदारानें काय केलें । सुभेदार बोलतो मामाला ॥ नउशें पठाण कापिला[1] । माझा जीव श्रमी झाला बटवा सोडा पान खायाला ॥ शेलार तो मामा शिणल्यावर दादा पोट रे फुगलें । भला भला माझ्या मामा ॥ बाराच्या ठोक्याला । किल्ला सई करून देतों तुला ॥ पान खाऊंदे मला । पान जो खातांना सोहरें हत्ती धांवत आला ॥ किस्का उमराव । मेरा भाई सांगावा मजला ॥ उंबराव शिवाजी महाराजाचा । मी आहें तानाजी सुभेदार ॥ नउशें पठाण कोणी काट्या सांगावें मजला । नउशें पठाण आह्मी काट्या ॥ महाता बोले सुभेदार । कुणब्याच्या पोरा काय तुझा एवढा तोरा ॥ जंगलामधीं तूंरे जावें । लकडी तोडावी त्याची मोळी बांधावी जाऊन बनियाला ओपावी[2] ॥ ज्यानिं धानोऱ्या[3] आणाव्या । रांडा पोरारे घालाव्या ॥ एवढ्या वड्या वड्या सरदारी एवढ्या वड्या तलवारी । कोठें होत्या तुझ्या बाला[4] ॥

१ कापले. २ विकावी. ३ धान्यविशेष. ४ बापाला.

सुभेदार बोले महाताला । ऐक मुसाऱ्याच्या पोऱ्या जाऊन ताग तूं पेरावा ॥ गोणी ताढुक वळावा । यावें कुणाव्याच्या वाड्याला ॥ भात रुपयाचें घ्यावें । तुझ्या रंडीनें भरडावें ॥ कणी कोंडा आपण खावा । तांदूळ बनियाला ओपावा ॥ एवढ्या बड्या बड्या अंबाऱ्या एवढ्या बड्या तलवारा । कोठें होत्यारे मुसंड्या तुला ॥४३॥

सलाम सलाम मेरे भाई । पाहिला हात येऊंदे रे तुझा ॥ पैलवान हत्तीवर बसला । शिवी दिली हत्तीला ॥ तेरी रंडीका नर । ह्याला पाहून घ्यावा ॥ हत्ती सात पावलें मागें गेला । पांच पट्याचा मार केला ॥ संभाळ संभाळ मेरे भाई । आतां संभाळ सुभेदारा ॥ हा हत्ती बाच्छाईचा । मीरे आहे महाराजाचा ॥ पहिला हत्तीनें डोईवर मारा केला । सुभेदार भला हत्तीच्या पोटाखालून निघून गेला ॥ हत्तीनें मारा केला । बंदुकीचा गजभर चिरा जो तुटला ॥ वरून पहिलवान बोलला । सहाही पाताळ गाडिला ॥ राग आला सुभेदाराला । सात हात जमीन उडाला लाथ मारिली महाताला ॥ अल्ला ह्मणून बोलला । शब्द हत्तीनें ओळखिला ॥ हत्तीनें उलटा पाठीवर मारा केला । ह्या वैऱ्याला मारायाला ॥ सुभेदार सेंराईत भला । कावा नदरेचा राखिला ॥ सळ पट्याचा सोडिला । नऊ तुकडे सोंडेचे नऊ सांखळीचे ॥ अठरा

---

१ धान्य भरण्यासाठीं तागाची केलेली. २ पटाईत.

खांडोळीं पाडिलीं । सुभेदार खालीं उतरला ॥ पन्नास माणूस लागलें हत्तीला भोकाया । शेलार मामा धांवत आला ह्याचा भोचु दे रे बो * ॥ ४४ ॥

तिथून बोंब्या निवून गेला । मेरे उदेभानभाई आग लागो तुझे चोन्याला ॥ सिंहगड किल्ला डुब होया । हम चोन नाहीं सोडताई ॥ जा पिराच्या दर्ग्याला । सांगा सिद्दी हिलालाला ॥ पांच हत्यारें घेऊन जावें । कल्याण-दरवाजाला ॥ सिद्दी हिलाल भला । ज्याच्या नऊजणी बिब्या पलंगा निजायाला ॥ चोन कराया लागला । ला-खोटा मोगलाचा दिला ॥ सिद्दी हिलालानें । त्यानें वा-चून पाहिला ॥ सिंहगड किल्ल्याला गलीम बहुत आला । तुह्मीं जावें लढायाला ॥ सिद्दी तो हिलाल पांच पोषाग नटला । दोहीं हातांत दोन पट्टे नऊजण बिब्या हारोहारीनें उभ्या केल्या ॥ ज्यानें पहिला हात टाकिला । अठरा खांडोळीं पाडिलीं ॥ आसुदाचा टिळा त्याला । उमराव तेथून निघाला सुभेदारापाशीं आला ॥ ४५ ॥

सलाम सलाम मेरे भाई । किस्का तूं उमराव ऐसा सांगावा मजला ॥ उमराव आहे शिवाजीचा । मी ता-नाजी सुभेदार ॥ एक कुळंब्याच्या पोरा । पागोट्याच वेढे घाल गळ्यामधीं शरण यावें सरदाराला ॥ सुभेदार त्याला बोलता झाला । घ्यावें तोंडांत तृण, घ्यावी डो-ईवर वाहण, शरण यावें सुभेदाराला ॥ पहिला हात येऊंदे

तुझा सिद्दी तूं हिलाला । पहिला हात जो टाकिला सात हात जमीन उडाला ॥ हातांमधीं हात त्यानें अठरा टाकिला । सुभेदार गुंजभर नाहीं ढळला ॥ अरे सिद्दी तूं हिलाला । दुसरा हात येऊंदे तुझा ॥ सुभेदार बोलला संभाळ संभाळ मेरे भाई । आतां हात येतो सुभेदाराचा ॥ नऊ हात जमीन उडाला । मारा सुभेदारानं केला ॥ बत्तीस वेढे पागोट्याचे । बत्तीस वेढे मंदिलाचे ॥ बेंबीपावेतों चिरित नेला । खुदा खुदारे बोलला जुध्या धरणीवर पाडिला ॥ ४६ ॥

बोंब्या तेथुनि निघाला । उदेभानापाशीं गेला ॥ मेरे उदेभान भाई आग लागो तुझ्या चोन्याला । सिंहगड किल्ला डुब होया ॥ नऊशें पठाण कापिला । बाच्छाईचा हत्ती कापिला ॥ सिद्दी हिलाल कापिला । हमकु किल्ला डुब होया ॥ हम चोन नाहीं सोडताई । जावें जळमंदिराला ॥ आहेत बाराजण छोकरे । जावें कल्याणदरवाजाला लढायाला ॥ पत्र मोगलानें लिहिलें । धाडलें बाराजण छोकऱ्यांला ॥ कल्याणदरवाज्याला । तुह्मीं जावें लढाईला ॥ बाराजण भाऊ केला मरणाचा पोषाग पांच हत्यारें घेतलीं । तेथुन निघाले आले सुभेदाराजवळी ॥ सलाम सलाम मेरे भाई । किस्का तूं उमराव सांगावें आह्माला ॥ उमराव शिवाजी महाराजाचा । आहें मी तानाजी मालूसरा ॥ सुभेदार भाई । पहिला हात येऊंदे

तुझा ॥ तुह्मी आहां मोगलांचे बाळक । पहिला हात येऊंदे तुमचा ॥ बाराजण लडक्यांनीं । चोविस हात जे टाकिले ॥ सुभेदार भला । नाहीं तो जाग्यावरून हालला ॥ सुभेदार भला । त्यानें धांवा अंबेचा मांडला ॥ अंबाबाई तूं पावगे माझ्या नवसाला । नऊ हात जमीन उडाला ॥ बाराजण लडक्यांचीं । चोवीस खांडोळीं पाडिलीं ॥४७॥

तेथून बोंब्या निघून गेला । उदेभानाच्या जवळ आला ॥ मेरे उदेभान भाई आग लागो ह्या चोन्याला । सिंहगड किल्ला डुब होया ॥ नऊशें पठाण काटचा । बाच्छाईचा हत्ती काटचा ॥ सिद्दी हिलाल काटचा । तुह्मारे बारा लडके काटचा ॥ लडक्याचा तो जाव ह्याच्या कानावरतीं गेला । उदेभान मोगल ज्या बिबी * * बसला होता तेथून उठेनासा झाला ॥ लेंकांचा तो दुःखाचा शब्द । ज्याच्या उरामधीं बसला ॥ खरखर लखोटा लिहिला । त्या बोंब्यापाशीं दिला ॥ जाऊन सांगा उमरावाला । उदेमान तो मोगल पळून पुण्याला गेला ॥ झेंडा लावा सिंहगडाला । यश तुमच्या तलवारीला ॥ ४८ ॥

उदेभान तेथुन निघाला । आला पिराच्या दरग्याला ॥ फोडल्या कापसाच्या उंदी । ओतले तेलाचे बुधले ॥ ज्यानें आग जी लावली । ज्यानें उजेड तो केला ॥ गलीम किती मोजून पाहिला । पन्नास माणूस ह्याच्या आले

१ ठिक्या.

हिशोबाला ॥ उदेभान माणूस पाहून । त्याच्या भुजा ज्या थरारल्या ॥ पन्नास माणूस माझी आंबाडाचीं[1] भाजी ॥ मोगल मागें परतला । गेला आखाडखान्यामधीं[2] ॥ पायीं तुमानी सुरवारा घातल्या । अठरा खंडीचे किनखाप त्यानें आंगांत घातलें ॥ बारा आतबंडीचा[3] जोडा । त्यानें पायांमधीं घातला ॥ ज्यानें वाघनखें चढविलीं । जिरेटोप डोईस घातला ॥ अठरा जागीं बिव्या । हारोहारीनें उभ्या केल्या ॥ सळ पट्याचा सोडिला । अठरा बिव्यांचीं खांडें केलीं ॥ आसुदाचा टिळा ल्याला । गाभणीगाई जो काटली ॥ गेला पिराच्या दर्ग्याला । सवामण उद जाळिला ॥ एका हातीं गुरदा एका हातीं घेतला पट्टा । दोपट्टयाचा मारा केला ॥ आला कल्याणदरवाज्याला । ज्यानें सलाम वाहिला ॥ दादा नउशें पठाण । ज्यानें दिमतीला[4] घेतला ॥ ४९ ॥

सलाम सलाम मेरे भाई । उंबराव किस्का सांगावा मजला ॥ उंबराव शिवाजीमहाराजाचा । आहें मी तानाजी सुभेदार ॥ उंबराव मोगलानें पाहिला । ऐसा भला आहेसरे दादा ॥ तुझ्यासारखा भाई पाठीला असावा । खाणें घालावें वजिराला वजीर पाळावा बाजूला ॥ सोड महाराजांची चाकरी । कर माझी मोगलाची चाकरी ॥ हवाला देतों सिंहगडाचा । हजार रुपयांची तैनात देतों

१ आंबाडाची (?). २ शस्त्रांचा आखाडा. ३ आतबडीचा (?). ४ मदतीला.

बसून खायाला ॥ सुभेदार बोले मोगलाला । सोड सिंहगडाची गादी ॥ चल माझ्या राजगड किल्ल्याला । चलावें महाराजाचे भेटीला ॥ राजगड किल्ल्याचा हवाला । उदेभान देतों तुला ॥ एवढ्या जाबावरून । घुस्सा आला मोगलाला ॥ पहिला हात येऊंदे तुझा । उदेभान हात येऊंदे तुझा ॥ तानाजी सुभेदार धांवा अंबेचा मांडिला । धांवधांव अंबाबाई ॥ अंबा त्या बाईनें घोसे[1] गाईचा पाहिला । देवी मागें जी सरली ॥ मोगलासमोर उभारिला । गर्भगाळ[2] कोसळला ॥ नऊ हात जमीन उडाला । मोगलाला माराया गेला ॥ हातामधीं हात ज्यानें अठरा टाकिले । गुंजभर नाहीं जो सरला ॥ ऐका उदेभान मोगला । पहिला हात माझा झाला ॥ दुसरा हात येऊंदे तुझा । सुभेदार बोलतो मामा ऐक निर्वाणाची वेळा ॥ लग्न करा रायाबाचें । दोहों हातांचा मुजरा सांगा शिवाजीमहाराजाला ॥ उदेभान मोगल बारा हात जमीन उडाला । वचक[3] सुरबाईचा दाविला मारा कैफाचा केला ॥ पन्नास वेढे पागोट्याचे पन्नास वेढे मंदिलाचे बेंबीपावेतों चिरित नेला । सुभेदार धरणीला लोटिला ॥ ५० ॥

पन्नास माणूस त्यानें रोजेंन्या । मांडिल्या आमच्या

१ मांस. २ गर्भगाळ (?). ३ वचक सुराबाईचा (?). ४ तानाजी ज्या ठिकाणीं पडला त्या ठिकाणीं एक थडगें बांधलेलें अद्याप तेथें आहे. ५ रोदन.

सुभेदार धन्या ॥ आह्माला संभाळील कोण । आणलेंस वाघाच्या रानाला ॥ मग तो शेलार मामानें । मुर्दा मांडीवर घेतला ॥ उदेभान बोलायाला लागला । दादा आपल्या सेनेला ॥ हातमी[1] नउशें पठाण । पन्नास माणूस घेऊन जावें ॥ कल्याणदरवाजाला । आहुती द्यावी ह्यांची बुरजाला ॥ लोक खळखळा रडती कैसें झालें नारायणा। दिन दिन पठ्यानें वाहिला मारायाला लागला ॥ सुभेदार मेलेला मुरदा ईरयानें[2] झाला । ऐशी वर्षांचा तो मामा त्याच्या आंगांत संचारला ॥ यश आलें मोगलाला। मोगल मागें जात होता ॥ मग तो सुभेदाराचा पट्टा । शेलार मामानें घेतला ॥ फीर ग मर्दांचे लंडे फीर ग मर्दांचे लंडे । मोगल मागें पहात होता ॥ दोहों हातांनीं कचका दिला । बेंबीपावता चिरित नेला ॥ खुदा खुदा बोलला । बुधा धरणीला पाडिला ॥ ज्यानें भाव जो आंतला सोडिला मग तो नऊशें पठाण होता उदेभानाचा । ह्यांची लढाई चालली ॥ ह्याचे पन्नास माणूस ह्याच सुभेदाराचे । उदेभान मोगलाचे नऊशें पठाण राहिले ॥ नऊशें पठाण । मार माराया लागले ॥ त्यामधें एकटा शेलार मामा लढनेवाला । पन्नास माणसांतून पंचवीस माणूस पडला ॥ ५१ ॥

नऊशें पठाण बोलाया लागला । चला कल्याणदर-

---

[1] हातमी (?). [2] इरयानें (?)



वाजाला ॥ आहुत देऊं पंचवीस माणसांची । संकट पडलें अंबाबाईला ॥ प्रतापगडची भवानी । उभी राहिली सांकडयाला ॥ पिवळें पातळ नेसली । गळीं कवडयांची माळा ॥ संकट पडलें देवीला । यश जातें शिवाजी महाराजाचें ॥ देवीनें आपल्या हातून दरवाजा उघडिला । पन्नास कमी बारा हजार फौज किल्ल्याला घेतली ॥ ज्याचा सूर्याबा तो बंधु । मामाला पुसाया लागला ॥ शेलाररे मामा । माझा दादारे कुठें आहे बंधुरे कुठें आहे ॥ शेलार मामारे बोलला । जरी मेलासे बोललों तर सारी फौज बसेल ॥ सुभेदार आहे बाले सद्रेमधीं । मी आहें कल्याणदरवाजाला ॥ नऊशें पठाण मारावा । मग जाऊं दादाच्या भेटीला ॥ मग त्या बारा हजार फौजेनें । ज्यानें हर हर वाहिला ॥ एका एकाच्या मागें तिघे तिघे लागले । नऊशें पटाण कापिला ॥ पांढरें निशाण उपटलें । भगवा झेंडा शिवाजीचा ॥ पांच तोफा जों मारिल्या । यशाच्या तोफा जों मारिल्या ॥ त्या तोफांचा आवाज । गेला राज-

---

१ संकट निवारण करण्यास उभी राहिली. २ शिवाजीमहाराजांस प्रतापगडची देवी प्रसन्न होती अशी लोकवार्ता आहे. तें स्थान अजूनपर्यंत जागृत असून शिवाजीमहाराजांचे वंशजांकडून तेथें चौघडा, नगारखाना ठेविलेला आहे. ३ बालेकिल्ल्यांत. ४ लढाईचे वेळीं मराठे 'हर हर' शब्द बोलून गर्जना करितात आणि मुसलमान 'दिन दिन' शब्द बोलतात. ५ मोंगलांचें निशाण पांढरें असून त्यावर अर्धचंद्र असावयाचा. ६ गड घेतल्यावर झोपडें किंवा कांहीं पेटवून किंवा तोफा मारून खूण कळवावयाची मराठ्यांत चाल होती.

गड किल्ल्याला ॥ शिवाजी महाराज बोलला । माझ्या सुभेदारानें सिंहगड सही केला ॥ शिवाजी महाराजानें । यशाच्या दहा तोफा सोडिल्या ॥ ५२ ॥

ज्याचा सूर्याबा तो बंधु । शेलार मामाला बोलला ॥ चला जाऊं दादाच्या भेटीला । चला जाऊं दादाच्या भेटीला ॥ शेलार मामानें सूर्याबा बंधूचे । पटे घेतले आपल्या हातामधीं ॥ गेले मुर्द्याचे जवळ । वरून शेला उघडिला ॥ मुर्दा दादाचा पाहिला । मुर्दा सुभेदाराचा पाहिला ॥ माझ्या सुभेदार दादा लग्न रायाबाचें राहिलं । ह्याचें लग्न करील कोण । बारा गेटांचे कोळी निघाले । आले सुभेदाराजवळ ॥ आमचा सुभेदार धनी । आह्मांला तैनात देईल कोण आह्मांला हवाला देईल कोण ॥ सुभेदार बोलायाला लागला । भिऊं नका रे दादांनो ह्या दादाचें वचन पुरें करीन ॥ जातों राजगड किल्ल्याला । सांगतों शिवाजी महाराजाला सिंहगडचा हवाला देतों तुह्मांला ॥ अबिर गुलाल । ज्याचे मुद्यांत भरला ॥ दोरा रेशमाचा घातला । मुर्दा पालखींत ठेविला ॥ पंचवीस

---

१ तान्हाजी मालुसरे काळोख्या रात्रीं सिंहगड घेण्यास गेला, त्या वेळीं शिवाजीमहाराज हे राजगडचे माचीवर सर्वांत उंच ठिकाणीं बसले होते. तेथें किल्ला सर झाल्याची खूण कळलीं. पण पुढें तान्हाजी मालुसरे पडल्याचें वर्तमान जेव्हां कळलें तेव्हां शिवाजीमहाराज ह्मणाले कीं, ' गड सांपडला पण सिंह गेला ! '

कमी बारा हजार लोक सगळे घेतले । वाजतगाजत मुर्दा गेला राजगड किल्ल्याला ॥ ५३ ॥

आले किल्ल्याचे पोटाला । पांचकर्णांचा बाजा केला ॥ अवाज महाराजानें घेतला । सुभेदार किल्ला घेऊन आला ॥ सुभेदाराची पालखी । नेली राजाचे सदरेला ॥ शिवाजी महाराजानें । मुर्दा पाहिला सुभेदाराचा ॥ शिवाजीचे राज्यांत ऐसा । उंबराव होणें नाहीं सुभेदारासारखा ॥ जिजाबाई धांवत आली । पालखी पाहिली ॥ गर्व आला सुभेदाराला । नाहीं आला भेटायाला ॥ बाई पालखी-पाशीं आली । बाईनें शेला उघडिला ॥ मुर्दा सुभेदाराचा पाहिला । आंग धरणीला टाकिलें ॥ सुभेदारासारखा । ऐसा क्षत्री होणार नाहीं ॥ बाजू गेली महाराजांची । बाजू गेली शिवाजीची ॥ मग त्या शिवाजीनें चाकराचे साठीं । डोईला रुमाल बांधला ॥ बारा भोयांचे पालखींत । सुभेदाराचा मुर्दा जो घातला ॥ वाजतगाजत आणला उमराठ्या गांवाला । ह्याचे लेकाचे भेटीला ॥ पांच-कर्णांचा आवाज । रायाबा बेट्यानें केला ॥ रायाबा बोलतो । बाबा आले माझे लग्नाला ॥ पालखीपाशीं धांवत आला । मुर्दा बाबाचा पाहिला ॥ साता दिवसांची मुदत । केली माझे लगनाला ॥ बाबा माझें लगीन करील कोण । यजमान होईल बाबा कोण मंडपांत मिरवेल कोण ॥ आग लागो ह्या लग्नाला । कां माझा बाबा निघून गेला ॥

शिवाजी राजानें । मुलगा पोटासंगें धरिला ॥ भिऊं नको माझे बेटा । शिवाजी महाराज तो गेला तान्हाजी सुभेदार आहे तुला ॥ बारा दिवसांचें सुतक धरलें । शिवाजी महाराजांनीं सुभेदाराचें ॥ ५४ ॥

मग त्या तेराव्या दिवसांत । स्वयंवर बाळाचें तें मांडिलें ॥ ज्यानें मंडप घातला । मंडपाला तोरण बांधिलें ॥ पहिली नवरी रद्द केली । कडाशीचे दरकराची केली रायाबा बेट्याला ॥ स्वयंवर केलें रायाबाचें । रायाबा पुढें तो बसविला ॥ बापाची सरदारी । दिली रायाबा बेट्याला ॥ दिवट्याबुदलीची जहागिर । दिली रायाबा बेट्याला ॥ पन्नास माणसांची सरदारी । दिली रायाबा बेट्याला ॥ डोणजं तें गांव । दिलें पानसुपारीला ॥ मालुसऱ्याचा दंड । दिला इनाम खायाला ॥ रायाबा तो बेटा ज्यानें संगतिला घेतला । आले राजगड किल्ल्याला ॥ ज्यानें पंतोजी तो काका । ज्यानें हुजऱ्या बोलाविला ॥ पंतोजी तो काका । जावें पुण्याचे शहराला ॥ मंडईच्या बाजारीं । आहे तुळशीदास शाहिर ॥ घेऊन यावें त्याला । राजगड किल्ल्याला ॥ तुळशीदास शाहिर । त्यानें सदरेला आणिला ॥ डफ तुणतुणें घेऊन । मग त्या तान्हाजी सुभेदाराला ॥ शिवाजी महाराजांचा । पोवाडा कटिबंध केला ॥ हजार रुपयांचा तोडा । हातामधीं घातला त्यारे तुळशीदास शाहीराच्या ॥ शूरमर्दाचा पोवाडा । शूर-

मर्दानें ऐकावा ॥ शिवाजीचे राज्यांत । ऐसा उमराव होणें नाहीं ॥ पोवाडा गात्याला उद्धाण ऐकत्याला घडो पुण्य । सत्ययुगींचा पोवाडा कलयुगीं वर्तला ॥ सत्तावीस किल्ल्यांचा सरदार निघूनशानी गेला । ऐसा पुनः होणें नाहीं ॥ ५५ ॥

---

## ३. बाजी पासलकराचा पोवाडा.

शिवाजीमहाराजांच्या अत्यंत प्रीतींतल्या बाळमित्रांपैकीं बाजी पासलकर एक होते. हे आठ गांवचे देशमुख असून रायगडाखालीं छत्रीनिझामपुराजवळ कुरडूं ह्या नांवाचे खेड्यांत राहत असत, आणि खिंडीचें नाके संभाळीत. तानाजी मालुसऱ्याप्रमाणें बाजी पासलकर हे शिवाजीमहाराजांस अनेक युद्धप्रसंगीं उपयोगी पडले होते, आणि त्यांचें शौर्य व पराक्रम पाहून छत्रपतींनें त्यांस आपल्या पायदळाचे सरनोबत ( सेनापति ) नेमिलें होतें. वाडीच्या सांवतां-बरोबर शिवाजीमहाराजांच्या लढाया झाल्या त्यांत महाराजांच्या सैन्याचे मुख्य बाजी पासलकर हे होते व ह्यांच्यामुळें सर्व लढायांत महाराजांची सरशी होई. त्यांची एक घोडी होती, ती घेण्यासाठीं विजापुरकरांनीं काय काय खटपटी केल्या त्यांचें वर्णन पुढील पोवाड्यांत आहे.

ह्या पोवाडा यमाजी नांवाच्या शाईरानें रचिला. तो आह्मांस महाडच्या सखाराम गोंधळ्यापासून मिळाला.

चाल—" लक्षुमि गर्वे निंदा बोलुनि झिडकारिति पार्वती "—प्रभाकर.

पहिलें नमन माझें देवा नारायणाशीं । दुसरें नमन माझें सद्गुरूच्या चरणाशीं ॥ जाउलीच्या मैदानीं बैसले शिपाई मजलशीं । मिळून बारा मराठे कधीं न येती जाउलीशीं ॥ येथून जोहार पाठवा मोऱ्या[1] चंद्रावाला । बादशाहा देईल आज्ञा तरी मी जाईन कुरडुंला ॥ लाटिन त्या बाजीची घोडी[2] भेटवीन तुम्हाला । पैजेचा विडा सोनू दळव्यानें घेतला ॥ १ ॥

कुरडुंच्या[3] मैदानीं नांदे बाजी पासलकर । आठगांवचा देसाई[4] त्या बाजीचा धाक थोर ॥ दंडा एवढी मिशी बाजी पाच्छाई महाजर । आनंत्या खुर्चुला घरीं शिंपीयाचा पोर ॥ आनंत्या नित्यनेम उठतो दंड सवाशें काढितो । तीन म्हशींचें दुभतें एकला आनंत्या जेवितो ॥ आलिया मर्दांचे फटकारे संभाळितो । सांगेन मर्दांची ख्यात बंदा बाजीचा म्हणवितो ॥ २ ॥

---

१ जावलीचे किल्लेदार चंद्रराव मोरे. २ बाजी पासलकराजवळ यशवंता घोडी, गजली फिरंग, आणि अजगर ढाल हे तीन जिन्नस अप्रतिम असत. त्यांत घोडी तर एक अपूर्व रत्नच होतें. ती घोडी आपणास मिळावी अशी विजापुरकरांची फार इच्छा होती. पण ती मिळवून देतो कोण, ही विवंचना करीत असतां पैजेचा विडा मांडला. ३ छत्रीनिजामपुराजवळ रायगडाखालींच कुरडू खेडें आहे, तेथेंच बाजी पासलकर राहत आणि खिंडीचें नाकें संभाळीत. ४ बाजी पासलकर हे आठ गांवचे देशमुख होते. हल्लीं त्यांचे वंशज तुकाराम पांडुजीराव पासलकर देशमुख हे असून त्यांचें वतन मुसें ता० प्रचंडगड इलाखा सचीवपंत येथें आहे.

पांचशें पायदळ खासा सोनू दळवी चालला । दळव्याचा भार कुरडूंच्या मैदानीं गेला ॥ हांटल्या कळकी जाळ्या दळवी जाळ्यांत लपला । चांग यान धोब्यानें रूप अस्त्रीचें घेतलें ॥ कानीं नाहीं बाळ्या वरून सारफळ्या ल्याला । कपाळीं नाहीं कुंकू ज्यानें विटकर उगाळिला ॥ नयनीं नाहीं काजळ ज्यानें कोळसा घातला । घागर चुंभळ घेऊन कुरडूंच्या पाणवठ्यावर[1] गेला ॥ ३ ॥

रावराणूजी रावकृष्णाजी गेले पारणें सोडायाला । आमचा येल्या मांग बायकोला मूळ[2] गेला ॥ खंड्या यान महार शिंदी[3] पिऊनि पडला । आमचा बाजी बोवा नेटका जेवाया बैसला ॥ बाजीच्या पंक्तीला चवदा रजपुत जेविती । उठल्या अंबाई[4] धाकली बिंबाई वाढिती ॥ एका आगळे बंदी शंभर मंदिरांत वागती । चांग यान धोब्यानें पाळत घेतली पुरती ॥ ४ ॥

मकरतराव जांवाई ज्याच्या वाड्यांत शिरला । बुरजीं होत्या टेहळ्या धाडधाडसा बोलला ॥ उठल्या अंबाई उंच[6] दरवाजा लाविला । धांवली बिंबाई परॅस[7] दरवाजा

---

१ पाणी भरण्याची जागा त्यास पाणवठा म्हणतात. २ कोसीदोकोसी सासुरवाडीस गेला. ३ जशी ताडाच्या झाडापासून पिण्यासाठीं ताडी काढतात तशी शिंदीच्या झाडापासून पिण्यासाठीं हलके लोक शिंदी काढतात, हा प्रघात पूर्वींचाच दिसतो. ४ अंबाई आणि बिंबाई ह्या दोघी बाजी पासलकराच्या बायका. ५ घरांतील चाकर एकशें एक होते. ६ पुढील मोठा दरवाजा. ७ मार्गाल लहान दरवाजा.

लाविला ॥ पांचशें दळव्याचा ज्याचा एकच रगडा झाला । अंबाइनें बिंबाईनें ज्यानिं उरावर हांटिलें ॥ ह्याच जांबा-यानें आमचें घर ग बुडविलें । यासुद्धां तिनदां येउनि घरावर घातले ॥ बिंबाई बोलली रावराणूजी नाहीं घरीं । आमचा येल्या मांग शंकर अंतरला दूरी ॥ असता खंड्या महार फोडता दळव्याची कोटगिरी । त्याच्या बायकोला देत्यें गळ्यांतील बिलगिरी[1] ॥ ५ ॥

रोही[2] रानांत चरले आज बाजीच्या आखरा[3] आले । फरक देखिली जागा रोही वाड्यांत शिरले ॥ 'मारीन मुसळा घाय' आनंत्या शिंपी याचा बोल । बाहेर मकरतराव दळवी गदगदां हांसले ॥ मकरतराव बोलला 'अरे तूं शिंपियाच्या पोरा । तीन पायल्या हरबऱ्यास रे घेतला खराखुरा ॥ मारीन फिरंगीचा हात एवढा कारे करशी तोरा । तुझ्या पूर्वजांस उणें, झडकरी येई तूं सों-मुरा' ॥ आनंत्या बोलला 'आज मुंढ्याच्या चिंध्या होती । तीन पायल्या हरबरे बाजीबोवाच्या कामा येती' ॥६॥

कास कासलीवरून ज्यानें कंबरबस्ता[6] केली । आनंत्या खुर्चुला याची धुमरे द्वारा गेली ॥ रागयानें क्रोधें किली कवाडा मोडिली । उंचद्वाराचे दळवी ज्यानें परसद्वारा नेले ॥ चवदा यानें मुडदे ज्यानें वाड्यामध्यें केले । पांचशें सोनदळवी वाड्याबाहेर घातले ॥ ७ ॥

---

१ गळ्यांतील दागिनाविशेष. २ हरणाची जात. ३ विश्रांतीची जागा. ४ तलवारीचा. ५ पुढें. ६ कंबर बांधिली.

त्यानें ह्मून घोडा दृटाविला बाजींच्या आंगावर घातला । आणिक फिरून ' संभाळ मामा ' बाजीबोवाला बोलला ॥ ......................... । सराइत[1] होता बाजी ज्याचा मारा संभाळिला ॥ मेणों[2] सुद्धां फटकारा दिला जांवई धरणीला पाडला । होती अजगर ढाल जांवई ढालेनें दाबिला ॥ ८ ॥

येल्याची ह्मातारी[3] येल्याशीं सांगूं गेली । काय बसलास येल्या तुझी कुरडूं मारून नेली ॥ आनंत्या बोलला हां ग आला माझा भाई[4] । काय पाहतोस दादा ह्मणतो घोड्यांच्या रे पायीं ॥ मर्प[5] नाहीं हत्यार मुसळाचा घाव लागला । त्यानें मग घोडा दृटाविला येल्याच्या आंगावर घातिला ॥ सराईत होता येल्या ज्याचा मारा संभाळिला । मागल्यान हस्तकें ज्याचें शीर उडविलें ॥ रुमालांत घालून बाजीला दावायासी नेलें । काय आज्ञा यमाजीला गुरूची कृपा आहे त्याला ॥ बाजी यान बोंवाचा ज्यानें पवाडा रचिला । सव्वाशेराचा लंगर ज्यानें हातामधीं घातला ॥ ९ ॥

## सातारकर छत्रपतींचे पोवाडे.

शिवाजीमहाराजांनीं सातारचा किल्ला सन १६७३ त मोगलां-

---

१ बाजीची घोडी फारच सराईत होती. २ मेण्यांत घातलेल्या तरवारींचा. ३ आई. ४ साह्यकर्ता. ५ घोडीसाठीं ही कलागत आहे असें सांगितलें, कारण हा जांवई होता. ६ मजपाशीं.

पासून घेतला. नंतर महाराजांचे द्वितीय पुत्र राजाराममहाराज यांनीं सन १६९२ त सातारा ही मराठ्यांची राजधानी केली. त्यापूर्वी रायगड येथें गादी होती. त्यानंतर ताराबाई ( स० १७००–१७०८ ), शाहूमहाराज ( स० १७०८–१७४९ ), रामराजे (स० १७४९–१७७७), दुसरे शाहूराजे (स० १७७७–१८१०) प्रतापसिंहमहाराज ( स० १८१०–१८३९ ), शाहाजीराजे (स० १८३९–१८४८), इतक्या कारकीर्दी होऊन स० १८४९ च्या मे महिन्याच्या १ ले तारिखेस शाहाजीराजांस औरसपुत्र नसल्याकारणानें इंग्रजसरकारानें सातारचें राज्य खालसा केलें. ह्या शेवटच्या दोन तीन कारकीर्दीस अनुलक्षून पुढील पोवाडे रचिले आहेत.

## ४. प्रतापसिंह व शाहाजीमहाराज यांचें स्वरूपवर्णन, यावर पोवाडा.

हा पोवाडा हरी राम नांवाच्या एका कवीनें केला असून आह्मांस एका गोंधळ्याकडून मिळाला.

**चाल**–" गोरा रंग गोजिरा शिराही तऱ्हा तुझ्या गडे स्वरूपाची । " **लावणी.**

**प्रतापसिंह महाराज राम लक्षुमण बंधु[1] विराजती ।**
**हिंदुपद् बादशाही दक्षणची पूर्णज्ञानी शुद्धमति ॥ ध्रु० ॥**
**पूर्वतपाचें फळ तेज निर्मळ सोज्वळ कोमळ कांती ।**
**राजवंशी राजेंद्र जगामधिं नांव शोभलें छत्रपति ॥ पगडी**

१ प्रतापसिंह ( बुवासाहेब ) व शाहाजी ( आपासाहेब ) हें दोघे बंधु शाहूमहाराजांचे पुत्र होते.

कंगणीदार अंगावर जुहार भारवर नाव किती । हिरे माणिक रत्नांचे जडाव शिरपेंचांवर चमकती ॥ शुभ्र शिरा पोषाख डौल साधा बांधा नामी आकृती । सांबरूप भोळे अवतार जसे कृष्ण गोकुळीं नांदती ॥ भोंवताले भले लोक हुजूर हुजरे चरणावरी लोळती । प्रतापसिंह० ॥ १ ॥

काय सांगूं तारीफ कुळीमधीं दीप केवळ पहा चंद्र जसे । कनवाळू अंतरांत जगासी अन्न पुष्कळ देतसे ॥ आदिशक्ती आदिमाया भवानी तिचें ध्यान अंतरांत वसे । द्वारीं झडे चौघडे आनंदांत पूजा नित्य होत असे ॥ आंपासाहेब[1] महाराज दिगंबर मूर्त कनय्या डौल दिसे । गोरा रंग गोजिरा शिरा मोत्यांचे हार कंठांत वसे ॥ जसे आकाशीं सूर्य चंद्र तसे जगाला भासती । प्रतापसिंह० ॥२॥

अजब थाट स्वारीचा घाट गर्दी भोंवताले मानकरी । चवरी आणि अबदागिरवाले चोपदार पुढें ललकारी ॥ बाणदार बोथाटी भाले वाद्यें वाजती नानापरी । आली गोल मोंगलाई स्वारी जरीपटका शोभला हत्तीवरी ॥ अंबारींत राजेंद्र भूपती मोरचेल प्रधान करीं । सेनापति रणशूर वीर अर्जुन बैसले बाजुवरि ॥ कोतवाल सांडणी हौदे झालरी कलाबतू चमकती । प्रतापसिंह० ॥ ३ ॥

आघाडी पिछाडिस नौबद बाई नृत्य रंग नाचती रंभा । नानापरी वाद्यें उठलीं नौबत वाजति भं भं भा ॥

---

१ शहाजीमहाराज.

दावलखान देविदास ज्याचें पसंत गाणें बसलें चित्तीं । बापु भोंसले हुजूर हुजरे फार दया त्यांच्यावरती ॥ कवि म्हणे हरी राम लक्ष महाराजांच्या चरणावरतीं । प्रतापसिंह० ॥ ४ ॥

---

### ५. प्रतापसिंहमहाराज शिकारीस गेले, यावर पोवाडा.

हा पोवाडा सगन भाऊकृत असून आम्हांस एका गोंधळ्यानें दिला.

चालः—" गोरा रंग गोजिरा शिराही तन्हा तुझ्या गडे स्वरूपाची ।" लावणी.

शाहू छत्रपति महाराज धनी होते कीर्तिवान फार ।
चौदा पेश्व्यांचें राज्य करितो, राज्य चालविलें हंबीर ॥ध्रु०॥

बुवासाहेब[1] बाळासाहेब[2] दिसे प्रत्यक्ष सांबावतार । बुचड्यामध्यें ठेवि हत्यारें अंगीं चपळाई फार ॥ कीर्तवानानें केली कीर्त म्हणून सांगाया फार । स्वारीचा हा थाट अजब निघतो बावन हुजराती चाले मोहरें ॥ स्वारी निघत्ती शहरामध्यें तयारीचीं हत्यारें घेऊन फार। शिकारीचा फार शोक चाल केली जंगलावर ॥ सर्व जंगल धुंडित आले मारी व्याघ्र रानडुकर । शिवबंदीचा[3] बडा थाट सेनापति चाले मोहरें ॥ वरीं येतां स्वारी भालदार पुकारी मोहरें । लिंबू नारळ उतरून टाकिती मागल्या चौकावर ॥ १ ॥

---

१ प्रतापसिंह. २ हे प्रतापसिंहाचे सेनापति होते. ३ पलटणीचा.

वाड्यामधिं येतां स्वारी येऊन बैसले तक्तावर । झोंपे-मधिं पडलें स्वप्न राज्य लुटाया शत्रु आले फार ॥ झोंपें-तून जागी होऊन स्वारी बैसली मंचकावर । बुवासाहे-बांनीं हांक मारिली बाळासाहेब आला मोहरें ॥ झोंपे-मध्यें झालें निमित्त जलदी सांगावें आह्मांस फार । सगन भाऊ बडा हुशार कीर्त केली या धन्यावर ॥ तुह्मांस आह्मी एकच युक्ति सांगतों राज्य राखावें जप्तीनें फार । आल्या शत्रुशीं व्हावें सादर हटूं नये मागें मोहरें ॥ शहर सातारा दिसे अजब तऱ्हा तऱ्ह जगास महशूर । पेशवे धनी होऊनी गेले कीर्त सांगाया झाली फार ॥ २ ॥

---

## ६. प्रतापसिंहमहाराजांस इंग्रजांनीं पदच्युत केलें, यावर पोवाडा.

ह्या पोवाड्याचे बाळा गोंधळी सातारकर याजवळ अकारा चौक आहेत, पैकीं आह्मांस हे चारच मिळाले. कवीचें नांव माहित नाहीं.

**चाल**– " तलवार पुण्यावर धरून । मोगल आला चढाई करून ॥ " **पोवाडा.**

गड सातारा सर करून । फिरंगी आला सराइत करून ॥ ध्रुवपद ॥

श्रावेण[1] वद्य पंचमी तयारी वास्तु झाली पुढें । रणे-बहिरी[2] सांपडला जंबुक[3] पसरले चहूंकडे ॥ ............ ।

---

१ शके १७६१ इ. सन १८३९. २ सिंह ( प्रतापसिंह ). ३ कोल्हे ( इंग्रज ).

खुप सिंहावर गर्दी झाली हर्षले टोपडे ॥ (चाल) ॥ पहाँटेचे प्रहररात्रीं, उभे भंवताले संत्री । सांपडले मोती जंत्री, घातलें अन्न सत्पात्रीं ॥ ( चाल ) ॥ केला घाट इंग्रजानें, शहरांत येऊन दारुण । झाली रयत बहू हैराण, चालविलं गलाबरत्न ॥ (चाल) ॥ प्रहरांत आले निंबावर जांबुळवाडा । शेरीच्या पुढें माळावर पडला वेढा । झाले इंग्रज तयार लाखोटे धाडा । ............ ॥ (चाल पहिली) ॥ इंग्रज हा तोफा भरभरून । गड सातारा० ॥ १ ॥

रामदास स्वामींचें वचन शिरपेंचावरती खूण । हस्त शिरावर ठेऊन बोले स्वस्थ आह्मी रक्षण ॥ तळ उठला लवकर निघाले इंग्रज तयार होऊन । चौगर्दा चौफेर कुंपनी हुशार चहूं बाजूनें ॥ (चाल) ॥ तळ उठला प्रहर दिवसाला, मानकरी जवळ बाजूला । हात जोडिले कृष्णाला, लोकांचा कहर झाला ॥ (चाल) ॥ खंडोबाची विनी मोहरें, ढाल भगवी सडका चार । संगे कुंपनी बहादूर, निघाले देशावर ॥ (चाल) ॥ बाळासाहेब[1] सेनापती भले रणशूर । लढाईचा बेत होता कीं गांवाबाहेर । बुवासाहेब बुद्धिवंत बोले उत्तर । शहराचा होईल खराबा आपण बाहेर ॥ ॥ ( चाल पहिली ) ॥ असा विचार पुरता धरून । गड सातारा० ॥ २ ॥

रागरंग पाहून उतरले कृष्णेच्या पलिकडे । साहेबाचा

---

१ बळवंतराव राजे भोंसले सरलष्कर हे प्रतापसिंहमहाराजांचे सेनापति होते.

मनसुबा हुशारी पलटण मागेंपुढें ॥ ........... । अशी वेळ कर्माची झोका होता राज्याशीं अवघड ॥ (चाल) ॥ सूर्याशिीं कळंक चढला, बंधूशीं[1] अंतर पडला। जसा हृदयीं अग्न धडधडला, चमचमाट मेघ गडगडला ॥ (चाल) ॥ धरली मोहिम जाण्याची, अशी कृपा झाली कृष्णाची । बडी कैद टोपीवाल्याची, वासना रती धर्माची ॥ (चाल) ॥ कडेकोट निघून गेले हो देउरावर । तळ पडला जाऊनशिनी हो गांवाबाहेर । चवदा पेटयांची गर्दी जवळ हुजूर । ............... ॥ ( चाल पहिली ) ॥ मसलतीनें घटका भरून । गड सातारा० ॥ ३ ॥

दूर कुचावरती कुच चालले गेले निरा उतरून । जेजुरीस गेल्यावर झालें मार्तंडदर्शन ॥ ......... । तळ्याचे बाजूस होळकर मोर्त दृष्टी पाहून ॥ (चाल) ॥ उधळिला त्यानें भंडार, भरगच्ची पोषाग चार । प्रसन्न झाले मल्हार, कोतवाल नाचे बेबहार ॥ (चाल) ॥ केली तडप बहु जाण्याची, संगें स्वारी राणीसाहेबाची । एक कटाव बहु फौजेची, झुंड पडली सरदाराची ॥ (चाल) ॥ उन्हाच्या झळ्या लागती अतिदारुण । दरपना रात्रीं चंद्र घेऊन । भिंवराच्या पलिकडे मोंगलाई संगीन । आली मोंगलाई दिलदार येऊं भेटून ॥ ( चाल पहिली ) ॥ चालविले कशावरुन । गड सातारा० ॥ ४ ॥

---

[1] बंधु शाहाजीराजे (आपासाहेब) ह्यांशीं मनापसिंहमहाराजांचें वांकडें होतें.

## ७. प्रतापसिंहमहाराजांस इंग्रजांनीं काशीस पाठविलें, यावर पोवाडा.

हा पोवाडा सगनभाऊकृत आहे. हा कवि शेवटचे बाजीरावाचे कारकीर्दींत पुण्यांत होता. हा आह्मांस एका गोंधळ्यानें दिला.

चाल—"दोंदिवसांची तनु हे साची सुरतरसाची करुनि मजा ॥" रामजोशी

मुळापासून चाल झाली कुठे दिसेना अंतर । बाळा-साहेब हुशार करकट्टे लढणेवाले फार ॥ इंग्रजांनीं घेतला मुलुख चालून आले दक्षणेवर । कोलापूरवाल्याशीं जिं-किलें लढण्यास टिकेना कोणी फार ॥ शहरामध्यें द्रव्य फिरविलें राज्य घेतलें हातावर । सारें शहर फिरून आला डेरा दिला पवय नाक्यावर ॥ साहेब लोकांनीं देऊनी ताजिमा पहिली खुर्ची केली मोहरें । मनामधिं कांहीं भीति आणूं नये आपला चालला एकच विचार ॥............ चौदा पेठ्यांचें राज्य करावें आह्मांस आनंद फार ॥ १ ॥

बुवासाहेब बाळासाहेब मारून टाकावे जलदिनें फार । आपासाहेब मागून बोलता झाला भाऊबंद कसे मी मारूं ॥ आपल्या हातानें घ्यावा प्राण मारा सांगतों किल्ल्यावर । इंग्रजांनीं करून तयार तोफा आणिल्या पवय नाक्यावर ॥ जलदिनें हा बार भरून हल्ला उठवि-ला किल्ल्यावर । शहरामधिं झाली चलबिचल बुवासाहे-बास दहशत पडली फार ॥ २ ॥

बाळासाहेबास आला क्रोध लढाईची करून तयारी ।

सारें लष्कर शिबंदिशीं जलदी उठवि फार ॥ बुवासाहे-बास कळली बातमी हात जोडून बाळासाहेबामोहरें । आग लागों द्या लढण्याला इंग्रज येईना हार ॥ सातार किल्ला खूप जिंकिला इंग्रजांनीं कैद केले । बाळासाहेब बुवासाहेबास जलदीनें निंबावर नेले ॥ अंबारींत बंधू बै-सले झालरी लाविल्या हत्तीला । इंग्रजांनीं जिंकून सातारा आपला अंमल बसविला ॥ बाळासाहेब बुवासाहेबास वनवास ईश्वरानें दिला । अवघे मानकरी येती भेटीला असा राजा नाहीं होणार साताऱ्याला ॥ ३ ॥

निंबावरती डेरा दिला बारा दिवस वनवास कंठीला । पुन्हां तेथून निघून चालले पुण्यक्षेत्र काशीला ॥ ऐन जंगलामधिं राजा जन्मला जंगली राजा नाम पावला । सगनभाऊ गर्जे सभेमध्यें यानें पवाडा केला ॥ मोठ्या मोठ्याची कीर्त करीतो अशी चाल होईना कोणाला । बुवासाहेब बाळासाहेब यांणीं धास्ती पाळून व्यर्थ प्राण सोडीला ॥ अवघ्या राज्याची हीच गति पुकार झाला सर्वांला । अवघे राज्य करीना लढाई खंडणी देती बहा-दुर इंग्रजाला ॥ ४ ॥

---

## ८. प्रतापसिंह गेल्यावर त्यांचे राणीनें शोक केला, यावर पोवाडा.

ह्या पोवाडा राघुजी पाटील नांवाच्या कवीनें केला असून आम्हांस एका गोंधळ्याकडून मिळाला.

चाल—" कां उगाच फिरसी बारे, समजनासि कां रे० "—लावणी.

गेले ब्रह्मावर्तावर बाजी, अशी तरी का मर्जी, बुडाली रोजगाऱ्याची रोजी, करावें काई । कशी निष्ठुर माया केली ग विठाबाई ॥ ध्रुपद ॥

तक्त सातारा शहर पुणें, साडेसात सुभे दक्षिणे, करनाटक हिंदुस्थान, फिरती द्वाही । ठाईं ठाईं बसल्या नवाब पाठवितो चौथाई ॥ शिंदे होळकर मोठें बंड, लाविले दिल्लीअटकेवर झेंडे, काबीज केले चारी खंड हालविली शाही । मला कळत नव्हतें होतें लहान पराई ॥ गेले सवाई माधवराव, तवापुन आला राज्याला खेव, पाण्यामधिं बुडाली नाव, कापली गायी । जानू जोशी सांगत होते लबाड नाहीं ॥ रास्ते आणि निपाणकर, प्रतिनिधी नारो शंकर, झाली लढाई बेटावर, आले हातघाई । ते बापु गोखले भले शूर शिपाई ॥ आपआपसांमधिं बैदा झाला, मालकमसाहेब टोपीवाला, रात्रीचा दिवस त्यानें केला, आले लवलाही । गेले जिकडे तिकडे पळोन बाराभाई ॥ आजिंठ्याचा घाट औघड, लाखन वाडा सातपुडा, तापी नर्मदेच्या पलीकडे, शिंदेशाही । कशी निष्ठुर० ॥ १ ॥

कुणीकडे जाऊं बाई कुणी आयरान, पहाड पर्वत कोकस्थान, दहा दिशेस दिसे बाई भयान, भालवा भुकती । ते वनामधीं वनगाई मुकणा हत्ती ॥ गर्जती शिवा यान[1] शार्दूल, भुंकार देती वानर नीळ, टाहो फोडिती कोयाळ, दिवसा राती । घडी घडी याद मला प्राणसख्याची होती ॥ बाई ग वनिंचीं वनफळें, चार बोर चवेणी केळ, पिकले करवंदी जांभळी, आवळी तुरती । तिथें कैचा अन्नाचा पदार्थ तेच खाती ॥ दैव झाला पाठमोरा, नसतीं विघ्नें येती घरा, राया गिरजेच्या शंकरा, गुण आठवूं किती । त्या नळराजानें मोकलली दमयंती ॥ तीर्थें केलीं पायीं अनवाणी, घालित्यें नित्य तुळशिला पाणी, जशी अणुध्वजाची राणी, मार्ग लक्षिती । राव सोडुन गेले शहर पुण्याची वस्ती ॥ ............ ............... । कशी निष्ठुर० ॥ २ ॥

गाई लाविती माना वर, दुसरा ऐकुनी ध्यानी धर, दखनमधिं गड सातारा, अजब किल्ला । कळ उत्पन्न झाली फेरा आला राजाला ॥ आपासाहेबाचा विचार, बाळाजी नातू मनसुबदार, कोणी ह्मणत लबाड खरा, विताबा केला । अशी गुजगुज वार्ता कळली इंग्रजाला ॥ आपा असें काय मन केलें, गैराशिस्त कसे नाशिले, बाळासाहेब धाकटें मूल, कळेना त्याला । चौदा पेट्यांचें

१ यान=आणि.

राज्य नको आह्माला ॥ निघाले राजवाड्यांतून, चुलते पुतणे दोघेजण, तुह्माला माझ्या गळ्याची आण, करावी सला। त्यांनीं मुकाम जाउन निंबावर्ती केला ॥ हत्ती घोडे लावलष्कर, उचलून दिली शिक्के कटार, पालखी मेणे अबदागीर, ठार संशय गेला। श्रीअक्रूरानें श्रीहरि मथुरेशीं नेला ॥ विनविती नानापरि सरदार, अष्ट उमराव निंबाळकर, आह्मां आहे हेच बरे, जातो काशीला। तुह्मी फिरा माघारी कां तरि श्रमी झाला ॥ शाहूछत्रपतीचें देणें, सरलें आज वडिलांचें पुण्य, कृष्णाबाईचें दर्शन, अंतरलें मला। खळखळा रडती मोठा आकांत झाला ॥ गेला राज्याचा अधिकारी, दिलगीर रयत झाली सारी, कशी केली वा श्रीहरी, मोकलली गायी। कशी निष्ठुर० ॥ ३ ॥

जंगल तऱ्हतऱ्हेची झाडी, सावमाव पिंपळ वड, फणसे अनासें बहु गोड, अंजीर पिकला। ताडी माड येळ विक्राळ गेले गगनाला ॥ वन बाई पाहतां नागदृष्टी, जागोजाग भिलाची हाटी, रात्रंदिवस लागतो पाठी, झोंप नाहीं त्याला। हा गिराशाचा मुलुख ओंगळ मेला ॥ बाई मी होतें गरोदर, नऊ मास झाले पुरे, जवळ नाहिं बाई सातारें, आठव केला। तो जंगलीराजा जंगलामधिं झाला ॥ ईश्वरी मायेचें कौतुक, मला दाविलें बाई पुत्रमुख, मोठें जिवा वाटलें सूख, आनंद जाला। बहुतांचा आणि ला-

त्यांचा पालनवाला ॥ असें दुःख आठवूनियां रडे, आडवें बाळ घेऊनियां पुढें, नाहीं जंगल झाडी दाट, हिरवा पाला । नाहीं फार सांगतां दुःखाचा डोंगर झाला ॥ कर्ता हर्ता ईश्वर गाजविला, राणी विनविती राजाला, वनामधिं टाकुनि गेले मला, समशेर बाळासाहेब गेले कैलासाला । त्या दखनच्या राजाला वनवास आला ॥ .................................................................. । कशी निष्ठुर ॥ ४ ॥

अवघा झाला येकंकार, समसमान मांगमहार, कायद्यामधिं आणिले सारे, फार औघड । कशी आड ना विहीर झाली मागें पुढें ॥ असें बोलून होते काई, आधींच दिली होती चौथाई, शत्रु आले आपले पायीं, झाले जड । वाजती बिगुल बासरी झाले बंद चौघडे ॥ सोनें होत माती, सरलीं पुण्यें हरली मती, मी अज्ञान तरी किती, गाऊं तुमच्यापुढें । सद्गुरु गोपाळाची जडणी रसाळू गोड ॥ देवनुक्र खंडे गाऊं खोर, चोबाजूला बुरुज चार, मारुती सहित येशी द्वार, घरोघरीं आड । गुणी राघूजी पाटिल गुणाचे गाडे ॥ बाजीराव म्हणता बला, कुणीकडे गेला नऊशें भाला, कवीनें मनीं पुरुषाद केला, जमा नाहीं । कशी निष्ठुर० ॥ ५ ॥

---

## ९. प्रतापसिंहमहाराजांचे पुत्र जंगली राजे यांचा जन्म, यावर पोवाडा.

हा पोवाडा विविधज्ञानविस्तार पु० ९ पृ० ११८ वरून घेतला आहे.

चाल—“ कां उगाच फिरसी बारे, समजनासि कांरे० ”—लावणी.

दक्खणेमधीं सातारा हुई, कैद झाली इंग्रेजी लैई[1], शाहु छत्रपती महाराज गेले बाई। गादीला धनी असा परतून होणार नाहीं॥ कसें केलें कृष्णाबाई, माझे दिनाचे आई, मोठे मोठे मानकरी झाले गाँई[3]। ते आपासाहेब महाराज कपटी हुई॥ इंग्रजानें फितूर केला, मिळून आपासाहेबाला, त्यांहीं माहुलीचे वर बसून मनसुबा केला। त्या दिवशीं जाहिर केलें सातार्‍याला॥ दुसर्‍या दिवशीं कळलें महाराजाला, एक महिना सहा दिवस झाले त्याला, मग मोठी चिंता पडली त्यांला बाई॥ शाहू०॥ १॥

बुवासाहेब सातार्‍याचे धनी, कैद केले इंग्रजांनीं, ते दोघे बंधु नेले जिथें होती राणी। मेण्याच्या झडपा लाविल्या इंग्रजांनीं॥ इंग्रज भाषिले भोयांला, मेणा मागें मोहोरे केला, क्षणभरी विस्मय झाला आपाला। दादांचा

---

१ अतिशय. २ राज्याला. ३ गाईप्रमाणें गरीब. ४ हे प्रतापसिंह यांचे धाकटे बंधु शहाजी. ५ हा सर्व प्रकार सन १८३९ त झाला. ६ हे बुवासाहेब महाराज (प्रतापसिंह) आणि शहाजी (आपासाहेब) या दोघांत भेद —ीं शहाजीस राज्याचा मालक करून प्रतापसिंहास कैद केलें. मेणे बरोबर चालविले असतां एक दूर काढून नेला.

मेणा दूर कसा राहिला ॥ मेण्यांतून खालीं उतरला, ताकिद केली साऱ्या सैन्याला, त्या दिवशीं सेनापति शिंवे[1] झाला । तो दिवस गेला अस्तमानाला ॥ बुवासाहेब रडूं लागला, उभ्यानें आंग टाकी धरणीला, चौदा दिवस झाले बंधूच्या मरणाला बाई ॥ शाहू० ॥ २ ॥

दैवाची झाली भाव पुत्र जन्मला, नांव जंगैली[3] राजा ठेविला, ठसा सैन्यांत पडला । खुशाली झाली बुवासाहेबाला ॥ बुवासाहेब पुढें निघोन गेले काशीला, पुकारा दिला सर्व दक्षिणेला, चट्ट निरोप दिला अवघ्या मानकऱ्याला । तो खंडोबा शिंदा जवळ तिथें राहिला ॥ दोन हत्ती इनाम बक्षीस दिले त्याला, तो निघोन आला दक्षिणेला, त्या दिवशीं गिराण होतें पूर्णीमेला । जाऊन अग्न लाविला होळीला ॥ दोन प्रहराचा अम्मल झाला, रडती सारे इंद्रचंद्र डळमळला, आज कशी आंधारी चढली साताऱ्याला बाई ॥ शाहू० ॥ ३ ॥

इंग्रज बोले त्या बाळाला, चलारे आपुल्या साताऱ्याला, गादिवर बसवितों तुला । मग जंगलीराजांनीं जबाब कैसा दिला ॥ धनी असतां साताऱ्याला, चौदा पेट्यांला इंग्रज आला, गांवगन्ना हुकुम फिरविला । किं पाटिल

---

१ बाळासाहेब सेनापति. २ मेला. ३ जंगली राजाचे वेळीं चौदा पेटे राज्य खालसा करून इंग्रजांनीं महाराजास नेमणूक करून दिली होती. तीही नुकती बंद केल्याचें सर्वांस आठवत असेल.

कुळकरणी असावे चावडीला ॥ बाबाजीनें पोवाडा केला, नागू खूण सांगे विठूला, मारुती प्रसन्न त्याला । गांव नातेंपोतें राहतो महादेव धरित्रीला बाई ॥ शाहू० ॥४॥

---

## १०. प्रतापसिंहांचे धाकटे बंधु शाहाजीराजे गादीवर बसले, यावर पोवाडा.

हा पोवाडा पिराजी नांवाच्या कवीनें केला असून आह्मांस एका गोंधळ्याकडून मिळाला.

चाल—" जाऊं नकारे विषयाटविची वाट कठिण मोठी । " रामजोशी.

आपासाहेब धनीमहाराज छत्रपति राजे । दक्षिणी उभारिल्या गुढ्या नौबदी वाजे ॥ ध्रुपद ॥

धनी अक्कलवंत महाराज शंभुअवतार । तलवार नवे मुद्रेचा सवाई भार ॥ अष्ट प्रधान अष्ट उमराव मिळाले सारे । कालु करणे वाजे होती तोफेचा मार ॥ षण्मास वाडा वर्जिला धन्य अवतार । तेव्हां अमृत वेळ लागली सांगूं कोठवर ॥ बाईजू साहेब गव्हरनर साहेब वचन झालें खरें । दैवाचें सूत्र सहज फिरति वरवर ॥ माहिमोर्तब सूर्यपान मोर्चल साजे । स्वारीचा कडडड कडाका आकाशीं गर्जे ॥ आपासाहेब० ॥ १ ॥

विसाव्याच्या जागेचा गुण आहे प्रकाश भारी । वनवास आला होता तेव्हां जमविली स्वारी ॥ बाधाजीपंत नातूची झाली तयारी । बाईजू साहेब गव्हरनर साहेब

मुख्य बाहेरी ॥ जलद गुढ्या उभारा मुहूर्तावरी । कंपनी बहादूरचा हुकूम आणवितो लौकरी ॥ जशी चंद्राची कळा अस्मानी प्रकाश भारी । बजाबा नाना पराडकर रथांत स्वारी ॥ जरीपटका चौघडा येथें आणविला पाहिजे । आगड धों धों वाजे नौबत घोष बाजे ॥ आपासाहेब० ॥२॥

मामा शिरके धुरंधर यांची तऱ्हा कांहीं अवघ्यावर न्यारी । तिळमात्र खोटें आवडेना अवमान करी ॥ कडीं-तोडे पेंडीं मोत्याचीं सिरपेंच लहरी । त्याचा सरंजाम आहे साधा घोड्यावरी ॥ बाळाजीपंत नातूची अक्कल आहे ती गहिरी । महाराजाचा कुलू अकत्यार आहे त्याज-वरी ॥ टाकोटाक लोक बोलवा चिंतोपंताचे पल्ह्यावरी । हसनमिरदा ललकारे नानापरी ॥ ललकारीची आवई गेली दुरवर घंटा बाजे । बैठका चिराकदानें लकलकाट शत्रु लाजे ॥ आपासाहेब० ॥ ३ ॥

आबा भोईटे भाऊ फौजदार फलटण देशीं । किती दिवस प्रार्थना करिती ह्या पायाशीं ॥ आपासाहेब धनी-महाराज दयावंत राजवनसी । बोलणें जसें बृहस्पति हि-त्याच्या राशी ॥ पांडु हवलदार सेवेशीं हात जोडूनि डावे बाजूसि । सखारामअण्णावर बहूत मर्जी खाशी ॥ केला नवा पवाडा पिराजिनें राव आज । महाराजाच्या कचेरि-मध्यें गाया नित्य रोज ॥ आपासाहेब० ॥ ४ ॥

---

## ११. शाहाजी राजांचे स्वारीचा थाट,
### यावर पोवाडा.

हा पोवाडा मार्तंड बाजी नांवाच्या शाईरानें रचिलेला असून आम्हास एका गोंधळ्याकडून मिळाला.

चाल—"दोदिवसांची तनु हे साची सुरतरसाची करुनि मजा ॥" रामजोशी.

छत्रपतीचें तक्त शहर सातारा हिंदुपदबादशाही । कुळीला कुळदैवत स्वामी किल्यावर मंगळाबाई ॥ ध्रुपद ॥

लखलखाट भरथाट सेनेचा मानकरी भले भले भाई । सर लष्करसी हुकूम शेजा करिती भोईटे भोई ॥ ठाईं ठाईं रिसाले उभे स्वारांला गणती नाहीं । भरजरी निशाणें फडकती डंका वाजे सवाई ॥ सन्निध तोफखाना उभा लागली एकच घाई । मानकऱ्यांचे थाट चवऱ्या उडताती दोही बाहीं ॥ पायदळा बाके लोक भले लढाऊ शिपाई । झाला हुकूम बक्षीचा उभे आपल्या मिसलीनें राही ॥ छत्रपतीचें० ॥ १ ॥

स्वारीचा निश्चय होतांना जहागिरदार बोलाविले । पंत प्रतिनिधी जवळ होते आणि अक्कलकोटवाले ॥ सचिवपंत भोरचे राहणार निंबाळकर फलटणवाले । डफळे पांढरे आले स्वारिशीं सुमंत मंत्री मिळाले ॥ झाली शहरामधिं एकच गर्दी दुतर्फा हत्ती चाले । घाटगे घोरपडे मोहिते जसे रणामधिं रणदुल्हे ॥ रात्रंदिवस हुकुमांत मुत्सद्दी होते ग मोठे बाई । सेनापति साहेब मामा बोलाविले लवलाही ॥ छत्रपतीचें० ॥ २ ॥

हणमंतगजावर स्वारी अंबारी ऐरावती तयार । देतां सिडी शिपाई पंत प्रतिनिधि मोर्चेल वर ॥ दिवाणावरी पूर्ण कृपा सर्व हातामधिं कारभार । बंदोबस्त अवघा राखावा जहागिरदार बरोबर ॥ नांव यशवंतराव भाऊ प्रसन्न स्वामी मल्हार । चौदा पेटे जहाज मुठीमधिं हुकुम सुटे वारंवार ॥ सान्निध सेवेमधिं उभे हात जोडून सन्मुख राही । होती वडिलांची कृपा त्यामधिं प्रसन्न झाली सगुणाबाई ॥ छत्रपतीचें० ॥ ३ ॥

लखालोट भरथाट स्वारीचा लोक करिताती मुजरा । भालदार पुढें ललकारे बिनीवर ताकीद करा ॥ छत्तिस वाद्यें वाजूं लागलीं हत्तीवरता फरारा । जाही जाही नौबद वाजती शिंग वाजे तऱ्हा तऱ्हा ॥ गुरु धोंडी पाथरूट आमचा चौमुलुखामधिं असकारा । मार्तंड बाजीची जडणी कोंदणामधिं जसा हिरा ॥ होते स्वारीमध्यें स्वामी माझे आले घराला लवलाही । झाला आनंद नारीस ओंवाळी पावली विठाबाई ॥ छत्रपतीचें० ॥ ४ ॥

---

## १२. सातारकर छत्रपति व त्यांचे सरदार, यावर पोवाडा.

हा पोवाडा मरी पिपाजी नांवाच्या कवीनें केला असून आम्हांस एका गोंधळ्याकडून मिळाला.

चाल–घडीग वरुपाची भेट करवा प्राणपतीची ॥
नाहीं आस्था धनद्रव्याची घालितें आण माझ्या रकाची । घडीग० ।

अरे तूं सृष्टीचा दाता, निष्ठुर बसला लक्ष्मीकांता, कसा

वावडिसी दिला गोता, वरचेवर। कधीं येतील छत्रपति-
राजे हंबीर ॥ ध्रुपद ॥

सातारा तक्त आहे अजब शहर, शाहू छत्रपतिचें नगर कोपले देव त्रिपुरगौरीहर, सर्वांवर। महाराज कीर्त राहिली दुनयावर ॥ पदरीं आहेत बावन सरदार, कऱ्हाडचे पंतांचा मान थोर, पंत सचीव दप्तरदार, कचेरी समोर। न्याय इनसाफ होतो बरोबर ॥ पुणें शहर दिलें त्यानें दानाशीं, श्रीमंत बाजी पेशव्याशीं, हें वर्तमान अवघ्याशीं, जागा महशूर। लाल कसा मिळेल हिऱ्याचे किमतीवर ॥ प्रधान सेनापति दाभाडा, पायामध्यें शोभे सोन्याचा तोडा, त्याचा जासूद गायकवाड, बडोद्यावर। अहो कीर्ति वाढली भाग्य नशीब थोर ॥ अरे तूं० ॥ १ ॥

गेले साताऱ्याचे धनी, पुन्हां नाहीं आले माघारे परतोनी, रयत झुरती मनीं, अवघी सारी। लक्ष्मी रीझली कसी या नीचा घरीं ॥ पडला अंधार शहरांत, गाय कशी वधिली कृष्णेंत, झालें पाप फार जाग्यांत, अरिष्टें भारी। नेत्र झांकून कशी बसली मंगळाई गडावरी ॥ बुडाले मेणे पालख्या चट अवघे जण घालिती पायांमधिं बूट, जागोजागीं बांधिले गेट, रस्त्यावरी। कायदे निघाले आणिक नानापरी ॥ झाली इंग्रजी चहूंकडे, वाड्यासमोर तंबूर झडे, अडुमाडु शिपाई फांकडे, रणीं रणशूर। खायाला मिळेना अन्नाहून बेजार ॥ अरे तूं० ॥ २ ॥

बापूसाहेब फलटणचे ग राजे, जैसे गोकुळांत कृष्ण साजे, राखिलें त्यानें पहा राज्य, मराठेशाही । नाहीं चालत कोणाचा जोरा अदूल बादशाही ॥ जैशी कृष्णाची द्वारका, रयतेवर लोभ सारखा, पावला राम हा सखा, सगुणाबाई । पाहण्यांत सुरत स्थळ असें दुसरें नाहीं ॥ पोषाख केला भरगच्चीचा, तुरा खोंविला शिरीं मोत्यांचा, चमकला मणि पाचेचा, गळ्यामध्यें हार । मोर्चेल उडती दोहीं बाजूंवर ॥ अरे तूं० ॥ ३ ॥

धनी पहा बसले अंबारींत, स्वारी चालली सखे डौलांत, हें शिंग वाजवी स्वारींत, अघाडीवरत । भालदार हुजरे मानकरी संगात ॥ पाहुन या स्वारीचा थाट, पुण्यामध्यें करी गव्हरनर अचाट, लिहून पत्र झटपट, विलायतेवरी । पाहून चेहरा राणी आश्चर्य करी ॥ मरी पिपाजी रंगेला, अवघ्याशीं हो आहे चांगला, गुणी आबा इमामाला, सारेजण चाहति । राहिले फड प्रसंगीं मलु मारुति ॥ गुणी दादाचें कवन खाशी, जैशा मोत्यांच्या राशी, हा धाक हरिदासांशीं, मनामधिं झुरती । चालुंद्या मजा अशी नित्य शेवटा वरती ॥ अरे तूं० ॥ ४ ॥

---

## कोल्हापुरकर छत्रपतींचे पोवाडे.

शिवाजीमहाराजांचे दोघे पुत्र; एक संभाजी व दुसरा राजाराम. संभाजीचा पुत्र शाहू दिल्लीहून परत आल्यावर सातारच्या गादीवर

बसला व राजारामानें कोल्हापुरास गादी नेली. राजारामाचे पुत्र दोन; दुसरा शिवाजी व दुसरा संभाजी. दुसऱ्या शिवाजीनें सन १७०० पासून सन १७१२ पर्यंत राज्य केलें. दुसऱ्या संभाजीनें सन १७१२ पासून सन १७६० पर्यंत राज्य केलें. पुढें दुसऱ्या संभाजीचा पुत्र तिसरा शिवाजी हा स. १७६० पासून स. १८१२ पर्यंत गादीवर होता. या शिवाजीस दोन पुत्र. पैकीं वडील शंभु ऊर्फ आबामहाराज आणि धाकटा शाहाजी ऊर्फ बावामहाराज. आबामहाराज स० १८१२ त गादीवर आले, पुढें स० १८२१ त त्यांचा अंत कोणत्या प्रकारें झाला, हें पुढील पोवाड्यांत वर्णिलें आहे.

## १३. आबामहाराज यांस सयाजी मोहित्यानें मारिलें, यावर पोवाडा.

हा पोवाडा पेमा माळी नांवाच्या कवीनें केला आहे. त्याच्या आह्मांस दोन प्रती मिळाल्या. एक विविधज्ञानविस्तार पु० ६ पृ० १६० येथें छापलेली व दुसरी एका जुन्या बाडांत लिहिलेली. विविधज्ञानविस्तारांतील प्रत फार अशुद्ध व अपुरी होती, ह्मणून बाडांतील प्रत यथाप्रत छापून वि० ज्ञा० वि० तील पाठभेद दिले आहेत.

**चाल**—"नरजन्मामधिं नरा करुनि घे नरनारायण गडी ॥" **रामजोशी.**

**[१]राजा मेला घात झाला रत्न हरपलें मे[२]हेरांत । केला मोहित्यांनीं अपघात ॥ ध्रुपद ॥**

---

१ "कोल्हापुरामधीं अवस्था कशी झाली मात । केला मोहित्यांनीं घात महाराज वधिले कविरांत ॥" वि० पाठ. २ शहरांत.

शिवाजी राजे नांव साजे धर्म एक होते भाग्यवंत। करूनि गेले नांवाची कीर्त ॥ त्याचे पोटीं जगजेठी दोघे-जण[1] पुत्र गुणवंत। राम लक्षुमण जोडी तिथ ॥ वाढों लागले थोर जहाले महाराज आले भरज्वानींत। तयाचा प्रकाश गगनांत ॥ शिरपेंच[2] साजे उंच मोत्यांचा तुरा वरती खोवित। कानीं चौकडा झोंक देत ॥ चांगुलपण सरस सोन उंच मोती हिरकणींत। रत्नावाणी ढाळ[3] देत ॥ एक मागें एक पुढें जरीचे पोषाक आंगावरत। गळ्यामधिं पदक लखलखीत ॥ बाळस्वारी घोड्यावरी सराईत भाले हातांत। लिंबू नारळ टोंचीत ॥ जोतीबाला डोंगराला दोघे बंधु जातात। मोर्चेल उडे दोघांवरत ॥ आह्मी भाऊ जगाला ठावुक नाव चहुंखंडांत। शिवाजी राजाचे पूत ॥ राजा मेला० ॥ १ ॥

तुळजापुर पंढरपुर मोठमोठे देव करित। बापामागें केली कीर्त ॥ नदीवर देऊळ थोर त्यांनीं बांधिलें अद्भूत। सांउट[4] दिसत धोंड्यांत ॥ सोमवारीं सोंवळें भारी दोघे नदीवर उभे आहेत। पित्याचें दर्शन घेत ॥ देवराया पडे पायां फिरूनि माघारें येतात। मातेला नमस्कार करित ॥ फिरंग्याला किल्ला दिला माल वळखिला बंदोबस्त। पित्याचें वचन गेलें होतें ॥ किल्ला देऊन शहर केला आणुनि

---

१ आबामहाराज व बाबामहाराज. २ "पोषाक करी झोंक मारी जरीबादल आंगांत" वि० पाठ. ३ प्रकाश. ४ छाया, प्रतिबिंब.

फिरंग्याची ताकीद । महार मांग करी सोंग टोपडें घालुनि डोईंत ॥ जाउनि फिरंग्याचे रोंका निपाणी चौभुत लष्करांत ।............॥ राजा मेला० ॥ २ ॥

सोमवारीं तिसरे प्रहरीं महाराज बाहेर आले होते । अंबाबाईच्या वाड्यांत ॥ मराठे मोहिते जात कपटी राजाचें मीठ खात होते । मस्ती चढली आंगांत[1] ॥ मोहिते आले जार केले धरला खाश्याचा हात । हटून रोजमुरा मागत ॥ दाईचा लेक होता एक भुजंगराव दादासंगत । त्याजवरि महाराजाची भिस्त ॥ भुजंगरावा क्रोध आला डोळे फाडिले मोहित्यावरते । डुरुनि बोले सोड साहेबाचा हात ॥ इतकें बोलतां पडली अहंता चाकर फुगले मनांत । सोडिली जीवाची आस्था ॥ भुजंगरावाला ठार केला मारला जमदाडी हात । मुर्दा पडे धरणीवरता ॥ आबा भोसले ठार केले गर्दी झाली सदरेंत । पिस्तुल मारिला गुपीत ॥ महाराजाला दगा घडला समया लावल्या चौभूत । बसले बाह्याला देउनि हात ॥ आंगावरला शेला घेतला खचूनि बांधलें त्या राजास । अशी चोराची हिकमत ॥ राजा मेला० ॥ ३ ॥

महाराजाला दगा घडला खबर मग कळली शहरांत[2]।

---

1 "बापलेक होऊनि एक मनामधिं केलें खलबत । महाराज मारा इतक्यांत ॥" वि० पाठ. २ यापुढें वि०त असा पाठ आहे:—" धन्याला कांहीं कळलें नव्हतें ॥ राजाचे लोक शिपाई बाके एकापुढें एक धांवत । ढाल फिरंग हातांत ॥ घरोघर गळा कापीत लेंकराबाळां संगात । ".

आतां बरीक महाराज मरतात ॥ आपासाहेब बुवासाहेब आले मग धांवत पळत । आंगा टाकिलें धरणीवरत ॥ रडो नका गोष्ट ऐका राजा बोले बुद्धीवंत । राज्य राखावें बंदोबस्त ॥ धाकले राजे बुवामहाराज आह्माला ठाऊक माहित । याला राखावें तुह्मीं समस्त ॥ मोहित्या हातीं आमच्या संचितीं असें देवानें लिहिलें होतें । आतां बरीक मरण आलें पुरतें ॥ राजा मेला० ॥ ४ ॥

खासे भालदार उपसतरवार आले ते मग धांवत पळत । मोहित्याला तोडूं ह्मणतात ॥ मारूं नका गोष्ट ऐका राजा बोले बुद्धीवंत । व्याघ्र सांपडलों मी जाळींत ॥ पैसा देउनि मोहिते घालवा हमेशा पडलों हातांत । व्याघ्र सांपडलों जाळींत ॥ गुरुराजे नांव साजे पैका मिळविला घटकेंत । घातला मोहित्याच्या पदरांत ॥ पैसा घेऊन चटकन उठला सोडला राजाचा हात । तिघेजण ब्राह्मण बगलेंत ॥ मोहिते गेले वेलगुडांत बापलेक जांवई होते । उतरले जाऊन गांवांत ॥ राजा मेला० ॥ ५ ॥

गांवाबाहेर मिळुन सारे खलबत केली मनांत । दीडशें आरब संगात ॥ बारा हजार घोडा तयार त्यांनीं पाठविला अवधूत । वेढा घातला वेलगुडांत ॥ मोहिते धरले ठार केले खडाखड गळे कापीत । त्यांनीं भरलीं पांटींत ॥ शिरें घेऊनि जलदी येऊनि त्यांनीं बांधलीं वेशींत । धन्याचे शिपाई यशवंत ॥ मोहित्याच्या बायका दिला डंका

हलालखोराच्या घरांत । दासी बटकीची फजीत ॥ मोहित्याचे वाडे ओसाड पडले खिंडारें दिसती गांवांत । मोहित्याला जनलोक थुंकतात ॥ राजा मेला० ॥ ६ ॥

आपासाहेब बुवासाहेब पित्याकडे पाहुनी रडतात। कीं आत्माराम नाहीं येत ॥ धोत्रें सोडिलीं वस्त्रें पाहिलीं जखमा पाहिल्या त्या पोटांत । आतां बरीक महाराज मरतात ॥ पाणी प्याले प्राण गेला सूर्य मावळला गगनांत । केला मोहित्यानें अपघात ॥ रायाच्या राण्या जशा गवळणी कुरळे केंस तोंडीत । आहेवपण गेलें ह्मणून रडतांत[2] ॥ दासी बटकी शहरच्या बाया आकांत वर्तला महालांत । हलालखोर झाले चिंताग्रस्त ॥ साळी माळी कोळी कोष्टी राघू झुरतो पिंजऱ्यांत । कोयाळ झुरती वनांत ॥ बारा[3] हजार घोडा तयार मढें बसविलें पालखींत। सोन्याचीं फुलें वर उधळीत ॥ अबीर गुलाली भडिमार पाउलें उमटती गुजरींत । शिपायी झाले रंगीत ॥ गांवाबाहेर मिळोन सारे सरण त्यांनीं रचलें इतक्यांत । चंदन बेल घालून आंत ॥ अग्नि दिली आरोळी झाली टाळी वाजविली सैन्यांत । सूर्य मावळला गगनांत पेमा माळी कवी-

---

१ "ह्मोइते मेले ठार झाले गेले शेणखाईत । जनलोक थुंकती तोंडांत ॥" वि० पाठ. २ यापुढें वि० पाठ असा आहे:—"बयाबाई पतिव्रता झुरती आपल्या मनांत । पोटीं येऊन झालों व्यर्थ ॥". ३ "महाराज गेले बाहिर काढले शेटे सावकार बघतात । आणिक बाबा ह्मणुनि रडतात ॥" वि० पाठ. ४ "महाराजाला आज्ञा झाली टाळी वाजवा हरिभक्त । गरीब खेमाजी नेणत गाण्याचा आखाडा तीथ ॥" वि० पाठ.

साळी पवाडा केला घटकेंत । दिपाजी बावाचा लेक ॥ राजा मेला० ॥ ७ ॥

---

## १४. सामानगडच्या गडकऱ्यांनीं बंड केलें, यावर पोवाडा.

कोल्हापुरकरांच्या जुलुमास कंटाळून हें बंड झालें. हा पोवाडा कृष्णा वाघ्या नांवाच्या कवीनें केला आहे. त्याची एक अपुर्ती प्रत आह्मांस एका गोंधळ्याकडून मिळाली. पुढें वि० ज्ञा० विस्तार पु. २२ पृ. ५९ येथें छापलेली प्रत पाहिली. ती पुरी असल्याकारणानें तीच येथें घेतली. मधूनमधून आमच्या प्रतीप्रमाणें फेरफार केला आहे.

चाल—" जाऊं नकारे विषयाटाविची वाट कठिण मोठी " रामजोशी.

करविर काशी पुण्यराशी तक्त महाराजांचें । शिंवाजी-[1] महाराज छत्रपति राजे पन्हाळ्याचे ॥ ध्रुपद ॥

त्यांचे वंशीं दोघे पुत्र काय नांव त्यांचें । आबामहा-[2] राज, बाबामहाराज[3] नांव धाकट्याचें ॥ भले भले मानकरी शिपाई होते हुजरातीचे । होणार जाणार काय ठावें लिखित ब्रह्मयाचें ॥ सामानगडीं[4] झाली लढाई कौतुक

---

१ हा कोल्हापूरचा तिसरा राजा स. १७६१ पासून स. १८१२ पर्यंत गादिवर होता. थोरले शिवाजी महाराज शककर्ते यांचा पुत्र राजाराम याचा हा नातु होय. २ याचें मूळचें नांव संभाजी. हा स. १८१३ पासून स. १८२१ पर्यंत गादीवर होता. ३ याचें मूळचें नांव शाहाजी. हा स. १८२२ पासून स. १८३७ पर्यंत गादीवर होता. ४ आंबोलीघांटाच्या दक्षिणंस सह्याद्रीच्या माथ्यापासून निघून ईशान्येकडे तीस मैलपर्यंत जी एक डोंगराची ओळ गेलेली आहे, तिचे टोंकाला हा लहानसा परंतु अति मजबूद किल्ला आहे.

देवाचें । बदलले गडकरी डागले गोळे तोफेचे ॥ सुभाना[1] निकम शिपाई धन्य धारिष्ट त्याचें । करूनियां मसलत योजी काम छाप्याचें ॥ छापा घातला इंग्रज लुटला नांव निकमाचें । शिवाजी० ॥ १ ॥

शुक्रवारचे दिवशीं त्यानें कशी मसलत केली । इंग्रज लोकांनीं लावली सल्लयाची बोली ॥ गडकरी ह्मणती इंग्रज भ्याली सल्लयाला आली । नका घालूं गोळी बंदी तोफेची केली ॥ रीविज[2] साहेब इंग्रज बहादूर बसून केली किल्ली । फितुरले गडकरी अग्न माचीला[3] दिली ॥ आग लागली घरें जळालीं धुराडी झाली । झाला चहुंकडून हल्ला गर्दी किल्लयाला चढली ॥ ह्मणे सुभाना निकम गडकरी त्यांशीं फितुरली । व्हायाचें तें झालें अक्कल शाहण्यांची गेली ॥ होणार जाणार काय कळे कशी वेळ आली । वाजला तंबूर द्वाही इंग्रजाची फिरली ॥ रहावें कशाला इथें निकमानें हो [4]बगल दिली । उतरत होता माची गांठ इंग्रजांची पडली ॥ धरलें कुणाला नांव कुणाचें सुभान निकमाचें । शिवाजी० ॥ २ ॥

सामानगडावरती धरलें सुभाना निकमाला । करुनियां कैद घेऊन आले डेऱ्याला ॥ रीविज साहेबानें नवा

---

१ हा शाहाजी ऊर्फ बाबासाहेब यांचा हुजऱ्या होता. स. १८४४ चे जुलै महिन्यांत गडकऱ्यांनीं जें बंड केलें होतें त्यांत हा होता. २ मि. रीव्हज् हा स. १८४४ त कोल्हापुरास कमिशनर होता. ३ डोंगराच्या माथ्यावरची सपाट जागा. ४ पळूं लागला, निसटला.

हुकूम बेडीचा केला । घालून बेडी पायांत पाहरा संत्रीचा[1] दीला ॥ रातचे रात राहुंद्या निकमाला मुकामाला । बडी फजर दिन निकलतां धाडूं बेळगांवाला ॥ सकाळपारीं दिवस उगवून दोन घडी आला । रीविज साहेब करी ताकीद अवघ्या लोकांला ॥ चार सोजीर[2] आठ संत्री बारा असामींला । बडा काफर अदमी सबने संभालना याला ॥ करून ताकीद शिबंदीला लावून रस्त्याला । हळु हळू चालतां मुकाम खरोशीचा केला ॥ दिवस मावळल्यावर दहशत पडली लोकांला । चार प्रहरही रात्र वैरी आली आह्मांला ॥ निकमाचे हो येतील कुमाइत नेतील निकमाला । रीविज साहेब जन्मठेप देईल आह्मांला ॥ भ्याली मनामधीं नांव शिबंदी घेती देवाचें । शिवाजी० ॥ ३ ॥

खरोशीहून करून मसलत निघाले तेथून । हळु हळु चालतां वाटेनें लागली तहान ॥ वाटमार्गे जातां सुभाना निकम काय ह्मणे । धांवचाल घेतली कशापायीं निकडीनें जाणें ॥ शिबंदी उलट बोलती सुभाना निकमाकारणें । दिवसाची रात्र करूं पण बेळगांवीं जाणें ॥ धांवचाल घेतली चालले कडोनिकडीनें । दहाघटका रात्रीं आले बेळगांवाकारणें ॥ जब्बर साहेबाजवळ रिपोर्ट दिला टाकून । नाहीं

---

१ हा 'सेंटिनल्' या इंग्रजी शब्दाचा अपभ्रंश होय. २ हा 'सोल्जर' या इंग्रजी शब्दाचा अपभ्रंश.

केला उशीर घातला तुरुंगांत नेऊन ॥ पानतंबाकुसुपारीचा नाहीं हुकुम दोन । चौकीप्रमाणें अटक सोशिली सुभाना निकमानें ॥ दहा दिवस पहाऱ्यांत राहिला फितुरले त्यानें । पहारेकऱ्यांना ह्मणे दादा हो द्यावें वचन ॥ कडींतोडे गांव तुम्हाला बक्षीस देईन । चिंमणाजी[1] महाराज दया त्याची आहे संपूर्ण ॥ जें मागाल तें देईल तुम्हाला नाहीं कांहीं उणें । पहारेकऱ्यांनीं दिलें वचन मग झाले प्रसन्न ॥ झालें इमानभाक ठरलें उद्यांचें जाणें । सकाळपारीं घटका दिवस आला उगवून ॥ परसाकडला तांब्या घेतला सुभाना निकमानें । चौघेजण पहारेकरी बरोबर आपण ॥ टेकाची हो वाट ओढा धरला चौघांन । धांवचाल घेतली चालले कडोनिकडीनें ॥ बारा घटका रात्रीं आले संकेश्वराकारणें । वेंकापा सराफ जातां जातां घेतला झोडपून ॥ वाटमार्गीं जातां खेडें होतें ऐराण । घडून तोडे चौघांजणांला घातले त्याणें ॥ पहारेकऱ्यांनीं पाहिलें होतें निकमाचें वचन । आज रात्रीं मिळाला आयरेकराला[2] जाऊन ॥ आयरेकर निकम मिळून घेती मुजरे त्यांचे । शिवाजी० ॥ ४ ॥

आयरेकर निकम मिळुनी केलि मसलत कैशी । जा-

---

१ स० १८३८ पासून स० १८६६ पर्यंत तिसरा शिवाजी ऊर्फ बाबासाहेब हा गादीवर होता. याचा धाकटा भाऊ शाहू यास चिमासाहेब किंवा चिमणाजीमहाराज ह्मणत असत. २ बाबाजी आयरेकर हा शिबंदीच्या बंडाचा मुख्य होता.

ऊन बोलूं चला आतां चिमणा महाराजाशीं ॥ बादशाही मुजरे करून जाऊन बसले बाजूशीं । शिकल कटार पांच हुकुम जर द्याल आह्मांसी ॥ इंग्रजावर लढाई घेऊं गुणगंभीर खाशी । महाराजांनीं दिला हुकूम प्रसन्न झाले त्यांसी ॥ पहिलें नमन जाऊन केलें साधु पीरासी । नाहीं केला उशीर त्यांनीं तोफ डागायासी ॥ घनतुरूप[1] सोजीर रीविज लागला पाठीसी । दाणे खिंडीनें निघून आले सातव्यापाशीं ॥ इंग्रजांचा लोक पाहिला उशीर नाहीं त्यासी । धूम धडाका तोफा डागल्या लढाई जाग्यासी ॥ इंग्रजाचा लोक पडला गणती नाहीं त्यासी । रीविज साहेबानें लिहून पत्र मग धाडलें मुंबईशीं ॥ गव्हरनर जनरलसाहेब त्यानें केलि मसलत कैशी । रेसिडेंट साहेब योजून लावून दीला त्यासी ॥ दूर मजलेला कुच करुनी चाले वाटेसी । पांचवे दिवशीं पोंचले पैन्हाळगडाशीं[2] ॥ त्याची बातमी ठावूक होती यमा रामोशाशीं । चहुंकडुन मिळाले लोक घेरा दिला साहेबासी ॥ रेसिडेंट साहेब[3] धरून नेला कैद केला त्यासी । आयरेकर बोले शिक्षा करो साहेबासी ॥ इतका जाब ऐकतां रेसिडेंट भ्याला

---

१ ' गनटूप्स् ' या इंग्रजी शब्दाचा हा अपभ्रंश होय. २ हा किल्ला कोल्हापुरापासून दहा मैलांवर असून याची उंची एक हजार फूट आहे. ३ हा कर्नल ओव्हॅन्स्. ह्याला सोडविण्याकरितां ता० २५ नोव्हेंबर सन १८४४ रोजीं जनरल डिलामोटी हा सैन्य घेऊन कमिशनर रीव्हज् व कर्नल ऊटराम यांच्यासह पन्हाळगडासमोर आला.

मनासी । जो बोले गा काम तुमारा सई करून देशी ॥ फितुरी लोक तुम तुह्मारा विश्वास कोणाशीं । काढून शिरची टोपी खुण दिली आयरेकराशीं ॥ तोडून बेडी सोडून दिलें रेसिडेंट साहेबासी । रीविज साहेब उलट बोलला रेसिडेंट साहेबासी ॥ तुह्मी बंदीवान लोक निकल जाना मुंबईसी । त्यानें फितुरलें होतें जाऊन आंत गडकऱ्यांसी ॥ पडका होता तट लावल्या तोफा तटासी । सहा घटकांमध्यें खिंडार केलें जागा जायासी ॥ घनतुरुप सोजीर जाऊन चढला माचीसी । राजा भोजाच्या[1] वेळची लूट माफ झाली त्यांसी ॥ गोरगरीब बहुत धरिले कैद केलें त्यांसी । आयरेकर निकम पळून गेले वरल्या वेशी ॥ रातोरात जाऊन पोंचले विशाळगडासी[2] । पंताला[3] हो ह्मणे जागा द्यावी राह्यासी ॥ पंत बोलला येवढी जागा राहूं द्या बोलायासी । रामघाटीं जाऊन मिळाले फोंडसावंतासी[4] ॥ इमान भाक झाली लढाई देऊं इंग्रजाशीं । हजार लोक दडून त्यांनीं ठेवला बाजूशीं ॥ झोरून फिरले मागून उठले मधीं गांठून त्यांसी । इंग्रजाचा लोक पडला गणती नाहीं

---

१ स० १०५० पासून स० ११२० पर्यंत कोल्हापुरीं शिलाहार राजांचा अंमल होता. त्या वंशांत दोन भोज नांवाचे राजे होते. त्यांपैकीं पहिला भोजराजा स० १०७५ पासून स० १११० पर्यंत होता. २ कोल्हापुरचे वायव्येस सुमारें ४० मैलांवर मलकापूर शहराजवळ हा किल्ला आहे. याची उंची ३३४८ फूट आहे. ३ हा एक कोल्हापूरच्या अष्टप्रधानांपैकीं होता. ४ सावंतवाडीचा देसाई.

त्यासी ॥ रीविज साहेब सरून राहिला जाऊन तीन कोशीं । सुभाना निकमानें कवाइती केली होती कैशी ॥ लालगिरी बावा आणला होता त्यानें जमातीशीं । करून बंडावा निघून गेले वजरचौंड्यासी ॥ मिरजकरांची [1]रसद मारली ठाऊक अवघ्यांसी । त्यांनीं लिहुन पत्र धाडलें आपा[2]साहेबासी ॥ [3]दादा लागू धाडून दिला त्याचे तपासासी । [4]दादा लागूनें मुकाम केला गव्हाणापाशीं ॥ दादा लागू आला खबर कळली बंडाशीं । दगडाधोंड्याला गांठ घातली घटका रातीशीं ॥ सेनेमधीं झाला कालवा घाबरल्या देशी । कैक दडले फडांत जागा नाहीं पळायासी ॥ घोडीं पीढीं घेऊन बंड लागलें वाटेसी । लालगिरी बावाची बातमी ठेवली होती कैशी ॥ लालगिरी बावा त्यांनीं धरला करवीरासी । सुभाना निकम धरला त्यांनीं सातार खोऱ्यासी ॥ दोघे दिले फांशीं कैंळो सरला त्यादिवशीं । कृष्णा वाघ्या ह्मणे आलें दोघांच्या दैवासी ॥ झालें तेवढें गाईलें असे विदित लोकांसी । असो परंतु किर्त केली नांव राह्याचें ॥ शिवाजी० ॥ ५ ॥

---

१ दाणावैरण घेऊन येणारी मंडळी. २ आपासाहेब पटवर्धन हे सांगलीकर चिंतामणराव आपा होत. ३ सन १८४५ त. ४ सांगलीचे कारभारी. हरिपूर येथले राहणारे. ५ कलह.

## १५. त्याच विषयावर दुसरा पोवाडा.

हा पोवाडा सुलतान नांवाच्या कवीनें केला असून आह्मांस एका गोंधळ्याकडून मिळाला.

चालः–शिपाई चाकरी गेले नागपुराला। तेली, वाणी उद्मी दाली बांधूं लागला॥

हुवा दखनमें नक्षा सवाई सामानगडकिल्ला। इंग्रज बहादर सोजीर लढता खुब टोपीवाला ॥ ध्रुपद ॥

दाजी[1] पंडीत ह्मणे करा पेट्यांची[2] तयारी। अटीकोट बलावले मराठे सारे मानकरी॥ हिम्मतबहादर गायकवाड खरडेकर रणबाहिरी। बाजी पाटणकर आले बागलकोटकरी॥ करुनियां मसलत वाजे चौघडा रणबाहिरी। बाबाजी आयरेकर केली कोलापुर मुकत्यारी॥ सामानगडवाल्यानें टाकिलें पत्र करा स्वारी। मुंजापा हवलदार ह्मणे लढूं किल्ला लौकरी॥ सुभाना निकम जंगी समशेर हातांत भाला। गेले मुंबईला टाक हुकूम बेळगांवधारवाडाला॥ १ ॥

मद्रासी पलटणा मंगाऊ जरनिलका कहिना। कलकत्ता बंगाला मुंबईत सोजीर क्या लहिना॥ दारुगोळा छकडा भरकर आया तोफखाना। नगरखोलापूरसे आया वनतुरूप लालबना॥ सामानगडसे भिडे गोरे सोजीर क्या

' १ दाजी कृष्ण पंडित हे धारवाड जिल्ह्याचे दप्तरदार. यांस स० १८४३ त कोल्हापुरचे कारभारी नेमिलें. २ पूर्वी कोल्हापूर इलाख्यांत २१ पेटे होते ते मोडून आणखी ६ पेटे दाजी पंडितांनीं नवीन केले.

लाहिना । छापे उपेर छापा डाले निकम लढे फुदना ॥ विनपैशेका शिपायी लढा किल्ला येक माहिना । चारतर-फसे लगे मोरचे लढ्या मुजे जाना ॥ दारुगोळा भरा इंग्रज बहादुर सामनेवाला । इंग्रज बहादूर० ॥ २ ॥

मुंजापा हवलदार ह्मणे आह्मीं लढावें कोठवर । नाहीं कोणी सामील कुमक येईना हातीं शिर ॥ मुदरगडावर दारुगोळा दाणा भरपूर । कोणि कुणाचें निरवण केलें आ-ज्ञांवर ॥ चोहोंकडून मुंग्यांची रवळ फिरंगी लढणार । बावासाहेब[1] महाराज गेले रणांत रणशूर ॥ दोघे बाळ[2] आहेत लहान केला शत्रुनें जोर । काय वांचून पुढें पहावें मरणाचें घर ॥ आदितवाराचे दिशीं लढाई मोरचे चढले वर । गोरे दोन पलटणा दिल्या बिचाऊन लोक गडावर ॥ सातशें गडकरी एकचित्त मनसुबा केला । मुलें बायका ह्मणति मरूं या ठायाला ॥ इंग्रज बहादूर० ॥ ३ ॥

शके सोळाशें सहासष्ट आश्विन वद्य दोन प्रहरा । गडवाले गफलती चढला सोजिरचा पाहरा ॥ मद्रासी पलटणा चोहोंकडून नाकबंद गहिरा । तोफेचा भडिमार वर्षती गोळेमध्यें ठारा ॥ लैनीसी भिडे लैन किल्ल्यानें मार दिला कैरा । साहेब गोरे दिले बिचाऊन चमकती

---

१ सन १८३७ त शाहाजी उर्फ बावासाहेबमहाराज तुळजापूरचे स्वारीस निघाले असतां वाटेंत तापानें मृत्यु पावले. २ शाहाजीस शिवाजी व शाहू असे दोन पुत्र होते.

तलवारा ॥ मुंजापा हवलदार झाला लालेलाल सारा । राज्याचें अल्प खाऊन केल्या खऱ्या तलवारा ॥ सुलतान बहुरुपि गातो पवाडा चोहों मुलखीं झाला । दक्षिणेंत केला नक्षा सवाई बहादर रणदुल्ला ॥ इंग्रज बहादर० ॥ ४ ॥

---

## १६. त्याच विषयावर तिसरा पोवाडा.

हा पोवाडा हुसेन व निठल यांनीं केला असून आम्हांस एका गोंधळ्याकडून मिळाला.

चालः—मंगलमूर्ति गजमुख विस्तारी सुखनिष्पत्ति करी हा मुरु विनंति मानी । हे वेडेवांकडे बोल पडोत आज कानीं ॥

सुन करविर कोलापुर, नाम है दूर, हयजी रणशूर, बाजे राजनका डंका । चौमुलकोंमें नाम हुवा सामानगडका ॥ ध्रुपद ॥

भोजराजनकी नगरी, जुनी पांढरी, सुनो तुम जरी, देवतापिंडाचे धनी । हय रंकालीकी दवलत निशाणी ॥ नयनोंसे देखे ताल, नाम रंकाल, जिवनी भुपाल, भरपुर भराहै निपानी । पदमाला नजिक नहीं उनकी शानी ॥ कुई नही देख्या तल, सुनेका देवल, मोती जल, मच्छीमगर जिवानी । नव आगळे काशी तिरथ महामुनी ॥ ( चाल ) ॥ करविर दरवाजा है जी दक्खनका । तीनसो साठ गड भोजराजनका । पन्हाळा पवन जगा लढनेका ।

226692

मनोहर मन संतुसगड बाका । दर्योंमें किल्ला पुंड माल-वनका ॥ ( चाल पहिली ) ॥ तोफनका बांधा कोट, पानेका लोट, सुका दिया होट, विलाज नहीं चलता दुसमनका ॥ चौमुलकोमें० ॥ १ ॥

इंग्रेज बहादूर आये, मुकाम किये लोक बैठाये, उतरे बनपुरीपर पंचगंगा । नदीके किनारे संगा ॥ लिये फौज, करता मौज, लहीनका बोज, आले गोल सरदार । लोट पठालम सरंजामे दलभार ॥ आघाडी घनतुरुप, पडे जरब, छन्नु दणे रणढोल बाजे तंबूर । तलवार बहादूर जंगीं समशेर ॥ (चाल) ॥ साहेब बोलता संभाजी राज-नकु । सामानगड दिखाव चलो हमकु । अरमन देखने खुशी किया सबकु । हिमत बहादूर सुने कान भरकु । दौलत तुमारी कोन अडाई तुमकु ॥ ( चाल पहिली ) ॥ किल्लेकु एकच बाट, अवघड घाट, झाडी है दाट, इलाज नहीं चलता दुसमनका ॥ चौमुलकोमें० ॥ २ ॥

आज निमे रातके रोजे, चढे इंग्रज, शहर गर्जे, नबाब टेकडीपर । कांचनी तोफ अवटका भडीमार ॥ कडक बिजली घरनाल, गोला लाल, देक्या बाल, चलता छोटा जंबुर । जो गेंद जैसे उडती है शीर ॥ तिनसो चट्टेकार, हो गये ठार, चलेना बार, सरदार । झुके बरोबर नहीं डरते मरनकु आगे सोजीर ॥ ( चाल ) ॥ मुंजापा नाइक लगा हसनेकु । भाऊसाहेब महाराज आयेते फौज लेकु ।

दरखत लगा के आंबखाकु। मोंगल बहादर गये शकरजाकु। सामानगड नही आया वैसनकु ॥ (चाल पहिली) ॥ बोलने लाग बढाई, देऊं गे लढाई, नामी शिपाई, निमक है हलाल राजनका ॥ चौमुलकोमें० ॥ ३ ॥

ए है राम चंद्रका दल, रणखुंदल, आगे पायदल, चले जाऊ लंके पर हल्ला। सातहजार मार दिया आऊटका गोला ॥ अर लिये भीमटेकडी, मार देवडी, हल्ला चढी, रणमे उडी, आवाडी झुक्या बालमवाला। दो हजार गिऱ्या टोपीवाला ॥ ( चाल ) ॥ फडनीस अन्ना फितुर किया। ............ । ............ । ............ । ........................॥ ( चाल पहिली ) ॥ आसने चारके दिन, भिडे लइन, गया अवसान, दम नही अंदर-वालेका ॥ चौमुलकोमें० ॥ ४ ॥

आज आदितवारके रोजे, किये के कुब, आपून साहेब, सदा बोला नाईककु। आज घातवार नही आते लढनेकु ॥ हुवा बहिरीशाम, लोक बेफाम, पावे आराम, निंद नही आखनकु। फडनीस बऊलाकर भेजे इंग्रजकु ॥ ले आब पट्टा लंब, क्याजी है दम, पडत समलम, चेला तयार हैकु। हणमंत दरवाजा घेर लिया जाकु ॥ ( चाल ) ॥ मुडदेपर मुडदा लगाजी गिरनेकु। मुंजापा नाईक खडाजी लढनेकु। सोटेसे मारे सोलाजनेकु। सात गोल्या लग्या पडा जमनेकु। गोल्या खाकर उठे

मारे सातजनकु ॥ ( चाल पहिली ) ॥ रणशूर शिपाई मर्द, उठाये गर्द, तोडो पर्द, दरवाजा खोलो बिचका ॥ चौमुलकोमें० ॥ ५ ॥

आइतवार सामानगड लिये, बावटा चढाये, तंबूर बजाये, रिविज साहेब बहादुर । गडकरी खासे भाग गये सारे ॥ भद्रगडकु मोर्चा लगाये, हल्ला चढाये, हुकूम बठाये, खर्डेकर काफीतुर । तीनघडीमे लिये दिन आइतवार ॥ पन्हाळा पावनगड, एक दिन लढ, आकर सब पडे, यम्या मांग फेर किया । किस वाशे आयरेकर निकल गया ॥ ( चाल ) ॥ नही आने दिया विशाळगडवाला । बावडा कारने बांधा मुकाबला । रांगणा भरतीखालीं नाहीं किल्ला । मनोहर मनसंतुस उडाऊ गोला । फोंड सांवत आंकर गांठ पडे धुला ॥ ( चाल पहिली ) ॥ चौफेर लगी है झाडी, हुये रेवडी, दिवस भुलपडी, खेतवा हुवाजी अलमका ॥ चौमुलकोमें० ॥ ६ ॥

बावाजी आयरेकर फाकडा, उडाये घोडा, मोहरा तोडा, नाम तो किया जी आपना । मदत मौला अली पुस्तपन्हा ॥ रामघाट लढकर गये, गुवेमे रहे, तै ठराये, फोंड सांवत किया सुन्ना । क्या फराशीस दें नही देत तुमना ॥ बैठे पुंड हो कर, मौजा करे, किसेना डरे, ये है दोदिनका सपना । एकदिन मर जाऊ दाराजिना ॥ ( चाल ) ॥ ह्यासे हाकिकत रही बोलनकु । लालगिर

गोसावी दियेजी फांसीकु । सुभान निकमकु दे डाले गजकु । यम्याकु भेजे काले पानेकु । धारवाड दिये मोर्चीहिऱ्याकु ॥ ( चाल पहिली ) ॥ चौमुलकोमें किया नाम, जनत रूम-शाम, लेवो सलाम, नामका बाजत ठोका ॥ चौमुल-कोमें० ॥ ७ ॥

सरकार कुंपनी साहेबी, रके खुबी, अल्ला नबी, मेहेर है परवरदिगारका । नहीं जुलुम नासती धरमराज उनका ॥ बोलेसे पैसा लेते, हुकुम चलाते, जुने रस्ते, जद है देवी महुरमका । दरखुप रखते विजल किताबका ॥ ठिकाणा मंगळवेढा, नाम है बडा, बनायां चौघडा, मकान पीरगैबीका । शेक हमीनसाहेब वस्ताद कवि बाका ॥ (चाल)॥ चौमुलकोमें नाम इंग्रजबहादरका । महमादेवीका चलावे सीका । हिंमत शिपाई रखता लढनेका । दारूगोळा जला तीन लाखका । क्या आयरे गयर खर्ची किया पैका ॥ (चाल पहिली) ॥ गावे हुसेन विठ्ठल, गर्दबादल, रणखुंदल, पवाडा किये जीं मर्दोका ॥ चौमुलकोमें० ॥ ८ ॥

---

# भाग दुसरा.

## पेशवे.

### १. मराठे व दुराणी यांमध्यें पानिपत येथें लढाई झाली, यावर पोवाडा.

शिवाजीमहाराजांचे नातु शाहूछत्रपति यांचे कारकीर्दींत पेशवे प्रथमतः उदयास आले. बाळाजी विश्वनाथ ह्यांस पेशवाईचीं वस्त्रें सन १७१४ त मिळालीं. पुढें त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचे पुत्र बाजीराव बल्लाळ हे पेशवे झाले. यांनीं स० १७२१ पासून स० १७४० पर्यंत पेशवाई चालविली. त्यांचे मागून त्यांचे पुत्र बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब हे स० १७४० पासून पेशवाईचें काम पाहूं लागले. हे पेशवे असतां स० १७६० त मराठे व दुराणी लोक यांचेमध्यें पानिपत येथें घोर संग्राम झाला, त्याचें कारण असें:— घरांतील वैमनस्यामुळें बाजीराव बल्लाळ यांचे धाकटे बंधु चिमणाजी आपा यांचे पुत्र सदाशिवराव भाऊ यांचे मनांत नानासाहेब पेशव्यांचे पुत्र युवराज विश्वासराव यांस दिल्लीचे तख्तावर बसवून आपण त्यांचा कारभार करावा आणि पुनः पुण्याकडे येऊं नये असें होतें. स० १७६० मध्यें अहमदशाहा अबदाली गिलच्यांचा मोठा भरणा घेऊन हिंदुस्थानांत आला आणि उत्तरेकडील मराठ्यांचीं ठाणीं घेऊं लागला. त्या गिलच्यांचें आणि उत्तरेकडील इतर शत्रूंचें पुरें पारिपत्य

करावें या हेतूनें अफाट सैन्य जमवून भाऊंची स्वारी पुण्याहून निघाली. आपला देश व आपलें राज्य सोडून परक्याचे राज्यांत किंवा हद्दींत शिरून लढाई देणें हें काम अत्यंत कठीण असूनही भाऊंनीं तें अंगावर घेतलें. भाऊ हे रावणासारखे मानी होते. अफगाण लोकांसारख्या कडव्या लोकांशीं लढून जीव बचावून येणें फारच अवघड असतांही भाऊंनीं त्यांस टक्कर दिली. या युद्धापासून मराठ्यांची अत्यंत नासाडी होऊन त्यांस पुनः वर डोकें काढणें अत्यंत मुष्किलीचें झालें. असें घोर रणकंदन मराठेशाहींत पूर्वीं कधींच झालें नव्हतें. पुढील तीन पोवाड्यांत या युद्धाचें वर्णन आहे.

पहिला पोवाडा सगनभाऊ यानें रचिलेला आहे. हा कवि शेवटच्या बाजीरावाच्या वेळीं विद्यमान होता. हा पुण्यांत राहणारा असतांही हा पोवाडा पुणेंप्रांतांत प्रसिद्ध नसून सातारा, फलटण, मिरज, सांगली इत्यादि ठिकाणीं दक्षिणेंत मात्र आढळतो. असा अप्रतिम पोवाडा इकडे उपलब्ध नाहीं यावरून असें वाटतें कीं, स्वराज्याबरोबरच तो येथून नष्ट होऊन तिकडे स्वराज्यांतच दडून राहिला. या पुस्तकांतील सर्व पोवाड्यांत हा उत्तम प्रतीचा आहे. स्वारस्याच्या संबंधानें तर याविषयीं लिहिणेंच नको. पुढें खड्यांचे लढाईचे पोवाड्यांत ‘ तलवार पुण्यावर धरून । मोंगल आला चढाई करून ॥ ’ हें जसें ध्रुपद साधलें आहे, तसेंच यांत “ भाऊ नाना तलवार धरून । गेले गिलच्यावर चढाई करून ॥ ” असें ध्रुपद आहे. ‘ गर्वाचें [ चढाईचें ] घर खालीं ’ असा उपदेश पोवाडे ऐकणारांस कवीचे मनांतून करावयाचा होता, असें या

दोनीही समसमान पोवाड्यांवरून दिसतें. हा पोवाडा उर्दुभाषेंतील ‘ फत्तेजंग ’ अथवा ‘ जंगबहार ’ पोवाड्यावरून रचिला असावा. हा फलटणांत घडशाचे तोंडून आह्मीं प्रथम ऐकिला. घडशाची म्हणणी अपूर्व होती. ती गवई चालीवर असून त्याचा आवाज खणखणीत होता, यामुळें पोवाडा ऐकतां ऐकतांच आमच्या प्राचीन वैभवाचें आणि शौर्याचें वारें अंगांत भरून मन थक्क होऊन गेलें ! आणि चार घटका सोनपत पानपतचे अफाट मैदानांत मराठे-दुराणी युद्धाचा अघोर परिणामच पहात आहों कीं काय असें वाटलें ! नंतर तोच पोवाडा मिरजकर गोंधळ्यांकडून पुनः ऐकून घेतला. या गोंधळ्यांची म्हणणी चांगली. वाणी शुद्ध आणि गोड होती. फलटणचे घडशाइतका खणखणीत आवाज नव्हता तरी त्याची

---

१ पेशव्यांच्या जंगबहारचा पोवाडा हा उर्दुभाषेंत असून तो सोनवडी ता० भिमथडी येथील पाटील यांस येतो. तो त्यांचे आजे कादरसाहेब पाटील यांनीं केला. मालेगांवकर जाधवराव हे पानपतांत गेले होते त्यांनीं तेथील लढाईची कच्ची हकीकत कादरसाहेब पाटील यांस सांगितली आणि तीवरून त्यांनीं पोवाडा तयार केला. याचे पस्तीस चौक आहेत. हा पोवाडा पेशव्यांनीं ऐकून पानपतचे साडेसातशें कैदी सोडले असें म्हणतात. हा पोवाडा आम्हांस उतरून देतेवेळीं सदर पाटिलांचे नातू नाना व इमाम वल्लद सगाजी पाटील यांनीं डोळ्यांस पाणी आणून सांगितलें कीं, ‘हा पोवाडा वंशांत एकासच येतो. तो आजपर्यंत कोणास लिहून दिला नाहीं, कीं शिकविला नाहीं. आतां हा सुस्थळीं जातो म्हणून आणि श्रीमंत बापूसाहेब निंबाळकर यांचे आज्ञेस्तव उतरून देतों.’ हा जंगबहार पोवाडा पाहून असें वाटतें कीं, आमचे लोकांत इतिहास लिहून ठेवण्याची चाल नव्हती असें जें म्हणतात तें खोटें असून मागील काळांत तर ही आवड अत्यंत होती असें दिसून येतें.

ती म्हणणी ऐकून ब्राह्मणी राज्याचा आम्हांस अभिमान वाटला. याचे अठरा चौक तुळजापूर आणि अक्कलकोट येथील गोंधळ्यांजवळ आहेत म्हणून ऐकितों. मिरजकर गोंधळ्यानें सांगितलें कीं, ' आमचे वडिलांस जितके पोवाडे येत असत तितके पोवाडे आम्हांस येत नाहींत, याचें कारण श्रीमंत धनी हे आमचे वडिलांकडून पोवाडे नेहमीं म्हणवून घेत असत, तसा प्रकार आतां नाहीं! वडिलांचे ऐकतां ऐकतां जे राहिले ते राहिले ! ' हें वाचून पोवाडे बुडाल्याबद्दलची दिलगिरी वाटते. आतां तें स्वराज्यच आहे म्हणून तेथें बरेच पोवाडे तगले आहेत. अजूनही पटवर्धन मंडळींतील एखाद्या राजबिंड्यास पोवाडे ऐकण्याचा छंद लागला तर पुष्कळ पोवाडे मिळतील आणि त्यापासून त्यांस चार घटका करमणूक होऊन त्यांचें रंजन होईल; इतकेंच नाहीं, तर आपल्या पूर्वजांचे पराक्रम ऐकल्यानें चित्ताचें औदासीन्य मोडून जाऊन विलक्षण प्रकारचा आल्हाद होईल. या छंदापासून इतर जनांस तर अद्भुत लाभ होतील. नुकतें लोपलेलें आमचें तेज आणि वैभव सर्वांस समजून या करमणुकीचे साधनापासून आमच्या देशाचा अत्यंत मोलवान् जो इतिहास तो जागृत होईल.

**चाल**–'तुझी काळजी मला राजसा जासूद पिटवा इथुन । '—**लावणी.**

**चाल दुसरी**—तलवार पुण्यावर धरून । मोगल आला चढाई करून ॥

**भाऊ नाना तलवार धरून । गेले गिलच्यावर चढाई करून ॥ ध्रुपद ॥**

**सवाई बाजीराव पेशवे पुण्यवान[1] प्रधान[2] । नाना भाऊ**

---

१ केलेलें आहे सुकृत ज्यांनीं. २ शाहूछत्रपतीचे प्रधान.

गादीवर शूर जन्मले जैसे अर्जुन[1]॥ शहर पुणें बसविलें मोहेरा[2] पुतळ्यांला नाहीं कांहीं उणें। चमके नंगी[3] तलवार सैन्य हें सारें लष्कर पाहून ॥ गॅर्व[4] कोंदला फार जैसा लंकापती रावण[5]। होणारासारिखें प्राक्तनीं[6] कैसें लिहिलें ब्रम्हयानें[7]॥(चाल)॥ बोलावून अवघे वजीर। सजवूनया सभा सदरें[8]॥ मग कैसा केला विचार। पत्रें लिहिलीं एंकच तार[9]॥ अष्टप्रधान[10] मानकरी[11] सारे। जरीपटका ऐंशीं हजार[12]॥ आले मल्हारराव होळकर ॥ फौजेमध्यें कुल[13] अकत्यार ॥ पलटणी[14] उभ्या तय्यार। शिंदेशाई[15] तोफेचा बहार ॥ बारा हजार बाणांची कर्तार[16]। चाळीस हजार भोंसले नागपुरकर ॥ वीस हजार अरब सुमार। तीस हजार हँपशी[17] बरोबर ॥ अठरापगड[18] लोक सारे। आपल्याला मिसलीवर[19] ॥ (चाल) ॥ चाळीस हजार पठाण नित्य तेंघे[20]

---

१ पांडवांत धर्मराज बंधु थोरले आणि अर्जुन धाकटे असून मोठे पराक्रमी असत; तसेंच येथें नानासाहेब धर्मापरी आणि भाऊसाहेब अर्जुनापरी समजावे. २ 'कदा पैशाशीं नाहीं उणें' पाठभेद. ३ नग्न. ४ 'गर्व दाटला फार' पा० ५ रावण जसा मानी होता, आणि श्रीरामचंद्राशीं वैर करूं नको असें रावणास पुष्कळांनीं सांगितलें तरी त्यानें ऐकिलें नाहीं, तसेंच भाऊसाहेबही मानी असून त्यांनीं पानपतांत कोणांची मसलत ऐकली नाहीं, असा भाव. ६ कपाळीं. ७ विधीनें. ८ सभेचे दिवाणखाने. ९ एक फर्म्याचीं पत्रें लिहिलीं. १० छत्रपतींचे अष्टप्रधान. ११ छत्रपतींचे मानकरी. १२ 'भाला ऐंशीं हजार होळकर' पा०. १३ सर्व. १४ 'पलटणी फरास तय्यार' पा०. १५ शिंदेशाई 'तोफेचा' भर पा०. १६ कैची. १७ हपसणांतील लोक. १८ अठराजातीचे. १९ तजाविजीवर. २० हत्यारें.

चमकती। [१]अर्बुज जात ही खंदी फिरे भोंवती॥ सिंध जाट रोहिला नाहीं त्याला गणती । घोरपडे [३]नाईक निंबाळकर नौबद वाजती ॥ घाटगे मोहिते माने पाटणकर [४]झुकती । ढालेशीं ढाल भिडे जरीपटक्याचा हत्ती ॥ चाळीस हजार [६]सडक करनाटक चमकती। हे मानकरी भाऊचे ऐसें दुर्नया बोलती ॥ एक एकाबरोबर ऐसे पतके किती । बाराभाई जमले नाहीं त्यांची गणती ॥ सांडणीस्वाराची डांक फिरे भोंवती । ................॥ अशी जमावंदी करून । भाऊ नाना० ॥ १ ॥

[१०]शाण्णव कुळींचे भूपाळ सारे मानकरी बरोबर । धायगुडे पायगुडे मोरे शेडगे पांढरे महाशूर ॥ खलाटे लोखंडे भिसे वाघमोडे आणिक [११]हटकर । शेळके बोळके काळे खचल खराडे नाहीं त्यांला सुमार ॥ शिरके महाडिक [१२]मिसाल पिसाळ बोथे बरगे आहेत बरोबर । जाधव धुळवपोळ चवाण डफळे भोंसले गुजर रणशूर ॥ लिंगडे कदम फडतारे घाडगे यादव थोरात भापकर । आंगळे निंगळे सेवाळे शितोळे रणदिवे बावळे

---

१ अडाणी. २ कडवी, कठीण. ३ फलटणचे निंबाळकर नाईक. ४ डौलानें चालती. ५ पेशव्यांचा जरीपटक्याचा हत्ती मोलाबक्ष नांवाचा बहुत दिवस होता. ६ तलवार. ७ लकाकतात. ८ सर्व लोक. ९ 'देणें शाहूचें भरपूरून' पा०. १० सूर्यवंश, सोमवंश, यदुवंश व शेषवंश हे चार वंश प्रसिद्ध असून मराठ्यांच्या शाण्णव कुळ्या आहेत, त्या दरोबस्त या चार वंशांतून निघाल्या आहेत. ११ हे धनगर होळकरांचे. १२ 'मोहिते' पा०.

खळदेकर[1] ॥ गाढवे रसाळे जगताप[2] जगदाळे काकडे काटकर । हे सारे सुभे भाऊचे उभे आपलाल्या बाजूवर ॥ ( चाल ) ॥ चाळीस हजार करवल[3] जमले । सोडिले शिरावर समले[4] ॥ रास्ते पटवर्धन गमले[5] । हमढेरे तळेकर तुमले ॥ आले पंत[6] जागा त्यांनीं आंखली । नाना फौज पाहतांना चकले ॥ दलबादल[7] डेरे दिले । नगारखाने झडूं[8] लागले ॥ गोसावी[9] त्यामधिं वायले । फक्कड ते सोटेवाले ॥ मग लमाणी[10] कितीक आले । बावन पागा फारच झाले ॥ ( चाल ) ॥ कोतवाल[11] घोडे सजविले श्यामकर्ण । भरगच्ची[12] हत्तीवर झुला घालीं हौसेनें ॥ हौदे[13] अंबारी आयन्याचें तारांगणें । आबाडीला चालली लगी[14] भडक निशाणें[15] ॥ सूत्रनाळी[16] जंबुरे[17] उंटावर रोखून । खांडा[18] पट्टा सुरे तिरें[19]-

---

१ 'खळटकर' पा०. २ 'सोनावणे जगताप' पा०. ३ करवल ह्मणून स्वारांत एक तऱ्हाविशेष आहे. ४ पागोट्याचे पदर सोडलेले असतात त्यांसच 'समले' ह्मणतात. ५ 'नाहीं दमले' पा०. ६ पंत प्रतिनिधि व सचीवपंत. ७ दलबादल डेरे फौजेंत असतात. ते फार मोठाले असून हजारों माणसांस बसण्याची त्यांत सोय असते. लढाईंत मोठाले जमाव एके ठिकाणीं जमवावयाचे असल्यास दलबादल डेऱ्यांत जमवीत. ८ रणवाद्यें वाजविण्याची लढाईंत चाल आहे. त्याप्रमाणें नगारखाने दुमदुमावयास लागले. ९ गोसाव्यांची पलटण पेशवाईंत होती हें सर्वांस विश्रुत आहे. १० चारणांची जात. ११ फौजेपुढें चालणारे गा... १२ 'भरगच्ची हत्तीवर झुला जशा अरुण' पा०. १३ 'हौदे अंबारी आयन्याचीं भडकें निशाणें' पा०. १४ झेंडा. १५ जरीचीं लखलखीत निशाणें. १६ लहान तोफा. १७ शस्त्रविशेष. १८ तलवार. १९ शस्त्रविशेष.

कमठा[1] कमान लावून ॥ ढाल फिरंगे[2] नवाज[3]खाणी निशंग गगन लकेरी खूण । पिस्तुल[4] बंदूक चकमक चमके[5] संगीन ॥ कडाबीन[6] बकमार याची खूण । राहिले एकदील खूण करून ॥ चाले फौज काय पाहतां दुरून । भाऊ नाना० ॥ २ ॥

आंगळे इंगळे शेवाळे शिताळे रणदिवे वाखाळे खळटकर । गाढवे रसाळे सोनवणे जगताप जगदाळे काकडे काटकर ॥ बोबडे ढुवल मोहिते सिंगाडे सांवत खिरसागर । गोडसे निकम कुधे फाळके धुमाळ गजरे वालकर तोरदळकर ॥ (चाल) ॥ कितुरकर देसाई हातीं भाले । हैदराबादकर मोंगल आले ॥ मंत्री चिटणीस नरगुंदवाले । कोकटकर महाराज खटाववाले ॥ कुडुकवाल्यांनीं खजिने पाठविले । गोंवेकर फरास पुढें गेले ॥ (चाल) ॥ जमराडे सरदार झांबरे शूर अतिरथी । लई धनगर शाण्णव कुळींचे मराठे होती ॥ हत्यार जमई जमदाड माडु घेऊन हातीं । बिचवा ह्मवांगीं गुरगुज सांग सोंटा बरची फेंकिती ॥ सुरसेप दारूचे केप धुंद लढयेती । फसत वालमपेंच खुबचार मार लई होती ॥ देणें महाराजांचें परिपूर्ण । भाऊ नाना० ॥३॥

नाना भाऊंनीं विचार केला फौजा पाहाव्या ह्मणून । स्वारी निघाली बाहेर पर्वती[7]च्या दर्शनाकारणें ॥ डंके झाले

---

१ कमानीसारखी धनुष्याची दोरी ओढून. २ शस्त्रविशेष. ३ तलवार. ४ लहान बंदुक. ५ तोड्याची बंदुक चकमकीनें उडते. ६ शस्त्रविशेष. ७ पुणेंशहराबाहेर टेंकडीवर पर्वतीदेवीचें स्थान आहे; तें पेशव्यांचें कुळदैवत होय.

चहूंकडून घोड्यावर ठेविलें जीन[1] । भले भले सरदार चाल-
ती आपआपल्या मिसिलीनें[2] ॥ पेंढार पुढें मागें तोफा चा-
लल्या दारू गोळा बार भरून । हत्तीवर सूत्रनाळ[3] उंटावर
बाण भरून ॥ बारा हजार उंट बाणांच्या कैच्या मागें
चाले दूंबा[4] धरून । कराबीन बकमार आरब सिंध रोहिले
गोलचे गोल भरून ॥ करबलवाले एकांडे[6] पन्नास हजार
रहदारी करून । बाँसडीवाले धनगर निवडक बाजूवर
ठरून ॥ ( चाल ) ॥ पुढें होळकर चालला । शिंदेशाई
नाहीं गणतीला ॥ साडेसातशें कोतवाल सजविला ।
त्यांला भरगच्ची झुला[9] ॥ सहा हजार तोफा बार भरला ।
पायदळ निशाण कडक पुढें उडाला ॥ चार हजार सोटे-
वाला । सात[10] हजार बल्लमवाला[11] ॥ गोलचा गोल नाईक
आला । मागें फौज करनाटकवाला ॥ बाराभाईचा घोडा
मग भरला । बावनपागा[12] बारगीर जमला ॥ माय मोर्तब
आले गणतीला । साठ मानकरी[13] मोरचलवाला ॥ ( चाल ) ॥
स्वारीचा थाट एकचित्तें झाला बरा । होणार टळेना
ब्रह्मयाच्या अक्षरां ॥ रंगविले हत्ती पाखरा भरजरी जरी[14] ।

---

१ खोगीर. २ मानापानानें. ३ लहान तोफा. ४ ‘ धीर धरून ’ पा०. ५ ‘ धरून ’ पा०. ६ एकांडे ह्मणजे एकेकटे. ७ होळकराचे लोक. ८ ‘ होळकर मागें चालला ’ पा०. ९ साडेसातशें कोतवालघोड्यांवर भरगच्ची जरीच्या झुला घातलया होत्या. १० ‘ सात हजार मागें ’ पा०. ११ ‘ बालम-वाला ’ पा०. १२ बावनपागा बारगीर, ही पेशव्यांची हुजुरात. १३ सरदार. १४ जरीच्या भरगच्ची.

अंबारी साडे सातशें मोती[1] झालरा ॥ नाना भाऊनीं करून पोषाग चंदेरी तऱ्हा । गळे कंठीं पाच शिरपेंच मोत्यांचा तुरा ॥ कपाळीं केशरी टिळा चंद्र दुसरा । हौद्यांत बसून शाहीचा[2] घेत मुजरा ॥ ( चाल ) ॥ तीस हजार अबदागिरी बरोबर चाले ढिगारा । संगे झडती[3] चौघडे शिंगें तुतारा ॥ पर्वतीचें दर्शन घेऊन येत माघारा । नऊ लाख सैन्य एकदिल[4] घोडा सारा । ............... ॥ शहर पुण्यास मुजरा करून । भाऊ नाना० ॥ ४ ॥

बाण वालम जिरीटोप[5] बकतारे[6] चाळीस हजार गणतीला । जामदारखाने फोडून पैसा साऱ्या सेनेशीं वांटिला ॥ कडीं तोडे पोषाग कंठ्या[7] दिल्या झाडून[8] फौजेला । शांत केली चित्तवृत्ति मग मनसुबा[9] काढला ॥ हत्ती[10] लढविले गिलचे पेशवे यश आलें शत्रूला[11] । राघोबादादा ह्मणे भाऊशीं प्रश्न पाहूं चांगला ॥ नाहीं ऐकिलें पुढें होणार [12]नें टळे कोणाला । दक्खनची सौभाग्य[13]गळसरी तुटली त्या

---

१ मोत्यांच्या झालरा. २ फौजेचा. ३ रणवाद्यें चौघडे शिंगे तुतारे वाजूं लागले. ४ एकसारखा किंवा एके मनाचा. ५ शिरस्त्राण. ६ चिलखत. ७ सिंहगड घेणाऱ्या फौजेस छत्रपतींनीं एकेक किंवा सव्वा रुपया दिला, आणि त्याच छत्रपतीच्या प्रधानांनी पानपतावर जाणारे फौजेस कडीं तोडे व कंठ्या दिल्या ! ८ सर्व. ९ मसलत. १० एक गिलचांचा हत्ती कल्पून व एक पेशव्यांचा हत्ती कल्पून ते लढविले. ११ गिलचांचा हत्ती जिंकला. १२ 'नाहीं टळले वचनाला' पा०. १३ अपशकुन झाला तीच दक्षिणेची सौभाग्यगळसरी तुटली, असें कवीनें मानलें.

समयाला ॥ समस्तांनीं अर्जीविलें[1] भाऊ ऐकेना सर्व मंडळीला । चाल केली गिलचावर डंके वाजवित चालला ॥ ( चाल ) ॥ धरिली दिल्लीची वाट । अजिंठ्याचा[2] उतरला घाट ॥ बंडावे[3] मोर्डले[4] वाट । सातपुड्याची झाडी दाट[5] ॥ नऊशें कोस[6] मारवाड नीट । त्यानें जाऊन घेतली भेट ॥ दिल्ली जमाबंदी चट । बादशाहानें आणविला जाट ॥ लखनोरचे[7] नबाब जबघाट । दीर्डलाख[8] फौजेचा थाट ॥ बादशाहांनीं आणिला जाट । सेना जमली अटोकाट ॥ ( चाल ) ॥ धारचे पवार जयपूर उदेपुरवाला । रातोरात पोंचली डाक सरंजामाला ॥ नाना भाऊंनीं जाऊन यमुनेवर[9] डेरा दिला । भिडविले मोर्चे लढती किल्लयाला[10] ॥ किल्लेदार बडा रणशूर मार लाविला । बारा[11] हजार तोफा सरबत्ती[12] दिली तोफेला ॥ मोर्चे गढती फौज लढती केली हल्ला । घेतला किल्ला जेरबस्त[13] बादशाहा केला ॥ भाऊची खराबी गणीत नाहीं जखमेला । भाऊ दिलगिर फार दिला हुकूम तोफेला ॥ दिल्लींत[14] माईना मुडदा गंज

१ प्रार्थिलें. २ अजिंठ्याचा घाट खानदेशांत आहे. ३ 'बंडाळी' पा॰. ४ 'मोडली' पा॰. ५ सातपुड्यांत पूर्वी इतकी दाट झाडी होती कीं एका दोघांस त्या रस्त्यानें जाणें कठिण असे. ६ नऊशें कोस मारवाड. हें बरोबर नाहीं. ७ लखनोरचा नबाब अबदलीस मिळाला होता हें प्रसिद्धच आहे. ८ 'तीनलक्ष' पा॰. ९ प्रयागाजवळ पेशव्यांची छावणी पडली. १० प्रयागाचा किल्ला यमुनेंत आहे त्याला. ११ प्रयागचे किल्ल्यावर बारा हजार तोफा लावून. १२ सरबत्ती दिली. १३ बादशाहा जरबेंत आला. १४ दिल्लींत सर्व रस्त्यांत मुडदे पाडले.

पडला । धिटाई करून हल्ला चढविला ॥ दिल्ली शहर घे-
तलें सर करून । भाऊ नाना० ॥ ५ ॥

अटोकाट जमले पठाण कुंजपुऱ्यास साठ हजार । दु-
हेरी तोफा लाविल्या पुढें कोसाचा मार ॥ कुंजपुरा[1] येई-
ना हातीं भाऊ जाहले मनीं दिलगिर । बोलावून पेंढारी
मग त्यांनीं काढला विचार ॥ दिल्ली सोडावी डावी उदे-
पूर वेढावें चहूंफेर । होळकराशीं केला हुकूम बाण मग
सोडी नागपूरकर ॥ आतां फेराशीस[2] पुढें गेले गरनाळा
भरगोळ्यांचा मार । पेंढाऱ्यांनीं वेठ[3] उठविला तोफ-
खान्यासमोर ॥ ( चाल ) ॥ जागोजागा छबिने भाऊचे ।
राऊत पायदळाचे ॥ तट पाडिले किल्ल्याचे । फार सैन्य
पडलें भाऊचें ॥ चढलें निशाण शिंद्यांचें । पाट[4] वाहती बहु
रक्ताचे ॥ एक लाख मनुष्य दिल्लीचे । घायाळ पडले जख-
माचे ॥ बारा[5] हजार पेंढार भाल्याचे । लूट[6] मुभा दिल्लीची ॥
( चाल ) ॥ फोडिलें तक्त दिल्लीचें खजिना[7] काढिला ।
कुमकेस घेतली फौज कुच मग केला ॥ आले नाना
भाऊ धासत हिंदुस्थानाला । लखनोरचा नवाब रातोरात
पळून गेला ॥ लुटलें[8] शहर सारें आग्र्याचावर ढाला दिल्या ।
राजा रणजीत जाट रणसिंग लाहोरवाला ॥ चवथाई

---

१ दिल्लीनजीकच कुंजपुरा आहे. २ फ्रेंच. ३ 'वेढा' पा०. ४ 'पूर वाहती बहु अशुद्धाचे' पा०. ५ 'वीस हजार पेंढार' पा०. ६ ज्याला जी लूट सांपडेल ती त्यानें घ्यावी अशी मुभा दिली. ७ 'खजिना भरियला' पा०. ८ 'लुटलें शहर सांबर' पा०.

दिल्ली भरतपुरवाला मिळाला । लिहून धाडिलें पत्र रुम[1]-शामाला ॥ चवदाशें कोस घोडा अटकेस पाणी पाजला । रातोरात डाक गेली गिलचाला ॥ आले वकील सलाम करून । भाऊ नाना० ॥ ६ ॥

वकील उभे हात जोडून बोलती नानाभाऊकारण । लॅंब[2] धाडली तुह्मा खर्च झाला पैसा देईन ॥ पुण्याप्रती[3] राज्य करावें दिल्ली अटकेपासून । क्रोध आला भाऊंशीं नऊकोर्टें[4] रुपये द्यावे धाडून ॥ चवदाशें कोस आलों पुढें[5] चवदाशें कोस जाईन । ईस्तंबूल[6] घ्या किल्ला मुलुख रुम-शामचा पाहीन ॥ दोनी हात बांधून शरण यावें तेव्हां परतून जाईन । गिलचा बोले कोणी अशा ठेविली आलें मरण ॥ फेर पत्र पाठविलें दातीं धरून यावें तृण । ............॥ (चाल) ॥ पत्र वाची त्या वेळेशीं । कळ-विलें अवघ्या फौजेशीं ॥ भाऊ बोले तेव्हां नानाशीं । तीन हजार फौज घ्या खाशी ॥ गोविंदराव बुंदेले बनशी ।

१ रुमशाम हल्लीं कॉन्स्टँटिनोपलला म्हणतात. २ सल्ला करण्यासाठीं बोलणी. ३ पुण्यास राज्य करावें, तें थेट अटकेपर्यंत करावें. ४ 'नव्वदकोट' पा०. ५ ही सदाशिवरावभाऊंची अत्यंत हाव दिसते. पेशवाईत काबूल ताब्यांत आणून इराणच्या शाहाशीं पेशव्यांनीं पत्रव्यवहार सुरू केलेला पुणें येथें एका गृहस्थापाशीं आहे पण तो छापण्यास मिळत नाहीं. ६ कॉन्स्टँटिनोपल घ्यावें ही नेपोलियन बोनापार्टसारखी भाऊंची महत्वाकांक्षा दिसते. ता० २३ डिसेंबर स० १७६० पर्यंत सल्ला होईल असें वाटत होतें; पण त्या दिवशीं अबदालीचा वजीर मशिदींत जात असतां त्यावर मराठ्यांचा हल्ला होऊन बळवंतराव मेहेंदळे पडला त्यामुळें बिघाड झाला.

दोन पतके बरोबर खासे ॥ केला रवाना त्या दिवशीं । दाणा वैरण आणावयाशीं ॥ ढाला दिल्या आग्र्यावर त्यादिवशीं । झाला हुकूम खजिना आणायाशीं ॥ खजिने भरले छकड्याशीं । रातोरात डाक गिलचाशीं ॥ आली चालून मुक्कामाशीं । दहा हजार कापिले फौजेशीं ॥ शिरें पाठविलीं भाऊशीं । भाऊ ह्मणे कोणेएकाशीं ॥ असे नऊ लाख माझेपाशीं । ............... ॥ (चाल) ॥ गिलचाची फौज आली चालून भाऊवर । [1]भाऊ हटेना लढणार तोही रणशूर ॥ झाला हातघाई दिवस पहिला सोमवार । आरबांनीं केली गर्दी गोळी अपार ॥ गिलचाचे पडले मुडदे पळतां बेजार । धाडिलें पत्र रुमाला [2]गैलीम शिरजोर ॥ बडा खंदा ब्राह्मण नऊलक्ष फौज रणशूर । [3]पानपतावर छावण्या खंदका बाहेर ॥ आह्मी तरी ना येऊं हातीं घेतलें शिर । धाडा सडी फौज खाशी करून तय्यार ॥ चारदस्ते घोडा पाठवा एकदिल सारे । ............ ॥ धाडा खर्ची खजिना भरून । भाऊ नाना० ॥ ७ ॥

बादशाहानें पत्र वाचतां झाले मनीं दिलगीर । आऊक्षदोरी तुटली आह्मांवर कोपला ईश्वर ॥ इस्तंबूल मागतां किल्ला चवथाई द्यावी कोठवर । मरून खरे होऊं परंतु

---

१ ' भाऊ आटपेना तोही लढणार रणशूर ' पा०. २ शत्रु. ३ 'सोनपतावर छावणी संदक चौफेर' पा०.

ना जाऊं ह्याचे हार ॥ सांडणीस्वार फेंकिला कंधार पंजाब पंचीन बहादूर । वजीर बोलावून विडे दिले गिल-चांस केलीं वस्त्रें ॥ फत्ते करा तलवार बक्षिसा देईन मुलुख महामूर । गादीचें नांव राखा सध्यां देईन पैसा मुबलक फार ॥ ( चाल )॥ घोडा चार दस्ते बोलाविला । दिला पोषाग पिंवळा शेला ॥ दुराण्या राऊत बोलाविला । बादशहानें शिरीं हात ठेविला ॥ भले भले शिपाई अघाडीला । शहराबाहेर डेरा दिला ॥ सैहा[1] हजार तोफ बार भरला । पुढें[2] चालतां कडक उसळला ॥ हिरवें निशाण हिरव्या ढाला । फौजेचा ढग जसा वळ-ला ॥ ह्यादिवशीं मुक्काम केला । बोलाविलें अस्तरीला[3] ॥ आह्मी जातों रणवराला । आतां आलें रांडपण तुजला ॥ ( चाल )॥ तोडून गरसुळी फोडून हातचीं कांकणें । झाली निरवानिरवी शिरीं बाशिंग बांधून ॥ पैजेचे विडे उचलिले यश घेऊन । चारदस्त पडतील त्यादिवशीं रूम सोडीन ॥ बादशहास बोलती कधीं ना येऊं परतून । शंभर कोट रुपये खर्ची देईन धाडून ॥ अथवा जाईन मरून । भाऊ नाना० ॥ ८ ॥

अकराजणांची कुंपीन अकराशांचें एक पलटण । अकरा पलटणांचा एक कंपु अकरा कंपूंचें एक दस्तन ॥ अशीं दोन दस्त ठेविलीं रुमाच्या गादीला राखण ।

---

१ ‘ तीन हजार तोफ ’ पा०. २ ‘ पुढें कडक उडाला ’ पा०. ३ स्त्रियेला.

चारदस्त सरंजाम नदी सत्रंजी आले उतरून ॥ पिवळे करून पोषाक नवरे तळहातांत शिर घेऊन । धाडिले वकील गिलचांनीं मसुदे बोलाया कारणें ॥ नाहीं ठरलें बोलणें भाऊसाहेबाशीं गर्व दारुण । वकील आले माघारे वृत्तांत कळविला जाऊन ॥ ( चाल ) ॥ गिलचांनीं कावा केला । तीन कोस सोडून भाऊला ॥ भंवता वेढा घातला । रस्ता चालूं देईना झाला ॥ वाणी उदमी बंद केला । गौळी माळी तो राहिला ॥ तेली तांबोळी हलवायाला । कोणी जाऊं देईना त्याला ॥ असा तीन महिने दम धरिला । पुढें धारण आली फौजेला ॥ अदपाव दाणे रुपयाला । खरा खोटा व्या दाखला ॥ तेल तूप मीठ मिरचीचा तोटा पडला । नीर देहीं अंतकाळ झाला ॥ ( चाल ) ॥ नाना भाऊ बसून डेऱ्यांत करिती विचार । अन्न दृष्टि पडेना झालें खोबरें ॥ पाण्याची किंमत नऊ रुपयांस झालें शेर । निमें अन्न निमी शाडू भक्षिती लोक सारे ॥ पोटाचे महादुःख सोसेना तिळभर । पोटावीण ओढून काचा बांधी कंबर ॥ ह्मणे भांग तमाखू अफीम राहिली दूर । भाऊशीं बोलती मिळून अवघे लष्कर ॥ नेऊन घाला गिलचांवर झालों निष्ठुर । हत्ती घोडे उंट मरती ठाणावर ॥ कां घेतां रांडपण घरीं बसून । भाऊ नाना० ॥ ९ ॥

गिलचांनीं हिकमत करून भाऊ वेढिला बहुत युक्तीनें। जठराग्नी चेतला खवळला व्याघ्र पंचानन ॥ झांगड नौबत वाजती दणादण भेर वाजे संगीन । डंके झाले पतकाच्या घोड्यावरतीं ठेविलें जीन ॥ फौजा झाल्या तयार निष्ठुर करवलाच्या मैदाना । चोर डाक ही होती गिलचांची नाहीं कळलें संधान ॥ गिलचा झाला घाबरा आणि वेढा उठविला जलदीनें । दोनी दळें झालीं तयार त्यावेळे करता नारायण ॥ आदितवारीं लढाई नेमली दस्ते आले जलदीनें । भाऊस बातमी कळली जरीपटका गेला चालून ॥ ( चाल ) ॥ गिलचांनीं रणखांब पुजिला । भाऊशीं वर्तमान कळला ॥ काय पाहतां गलीम सांपडला । एकदांच हर हर केला ॥ रोखिले आघाडी जेजाला । कडाबीन सुत्रनाला ॥ ऐशीं हजार होळकर भाला । शिंद्यांनीं मार खूप दिला ॥ बाण सुटती तीरकमानीला । अरब हपशी तो रोहिला ॥ गोसावी धुंदकत चालला । करवलानें घोडा चमकाविला ॥ बाराभाईच्या मंड्यावर ढाला । फौजेचा बंद मग तुटला ॥ भाऊसाहेब अंबारींत डुल्ला । दादू महातानें हत्ती पुढें नेला ॥ आंडु जडियले हत्तीला । तीरकमान हत्ती धरला ॥ पांडवदळीं बिभीषण आला । कीं पाहतां वीर खवळिला ॥ दिली सरबत्ती तोफेला । नऊ हजार गोळा उडाला ॥ ( चाल ) ॥ तासे मर्फे ते तंबूर किती वाजती । कर्णे कितीएक रणबहिरी कर्कती ॥ गिलचांच्या तोफा कुलपी गोळे गर्जती । धु-

कोट बाण जशी ढगांत वीज चमकती ॥ दणादण मेरू मंडळ धरणी कांपती । बारा हजार पालखी भाऊची झाली रीति ॥ तीन लाख घोडा गर्द जरीपटक्याचा हत्ती । ऐंशी हजार होळकर गर्दीं नाहीं दिसती ॥ पायदळाचे गोळे जागोजाग पडले किती । सोकला कंठ मग पाणी पाणी बोलती ॥ जखमांची नाहीं गणती कबंध नाचती । स्वर्गींचे देव पाहती वर्णिती अमरावती ॥ गगनीं झांकले सूर्य चंद्र भिऊन । भाऊ नाना० ॥ १० ॥

गगनीं झांकले सूर्य चंद्र मग पडला अंधकार । गलिमानें पुरविली पाठ भाऊ हटेना तो रणशूर ॥ सोनपतावर लढाई भाऊ अंबारींत कमान तीर । बाण बंदुकीचे फेर झडती तोफेचे गोळे पडे जसे गार ॥ गोळ्यासरसा[2] भाऊ उडाला दारू महात चकाचूर । बापलेक ओळखीना धरणीमाय जागा देईना अल्प जर ॥ नानासाहेबाशीं डांक आली ते गेले हामी सादर । झाले घोड्यावर स्वार बाईस कळलें धरला पदर ॥ बोले गोपिकाबाई पुण्याचें राज्य कोण करणार । भाऊसाहेब गेले आह्मी तरी काय[3] राहून करणार ॥ ब्राह्मणीराज्य पेशवाई बुडाली असें नाहीं होणार । ..................... ॥ ( चाल ) ॥ पैजेचा[4] विडा उचलला । सारी शाही पाहती नानाला ॥

---

१ हा व याचे पुढील हे दोन चौक कुशाबा बिन भिवा वणजारी, मिरज, याजकडून मिळाले. २ 'गुल्यासुद्धां उडाला भाऊ' पा०. ३ 'काय राहून बरें' पा०. ४ 'पानांचा विडा' पा०.

भाला कटार सूर्य दावला । दोन[1] लाख घोडा बरोबरीला ॥ रणामधें जाऊन शिरला । झाली चकमक[2] एकच हल्ला ॥ चाळीस हजार जिरेटोपवाला । नानापाशीं कत्तल झाला ॥ होळकरानें फितवा केला । हें ठाऊक नाहीं नानाला ॥ वैऱ्यांनीं वैर साधिला । मग जखमा चढल्या नानाला ॥ जसा भीष्म कर्ण युद्धाला । मुरदा माईना धरणीला ॥ अरब हपशीपत्रें रोहिला । तोबारी वाणी उडाला ॥ घोड्याहून खालीं आला । लढण्याचा हेत नाहीं पुरला ॥ नाना पडला धर मग सुटला । गिलचानें मार खूप केला ॥ (चाल) ॥ खंदकांत माईना लोक उंट घोडे सारे । गिलचांचा एक दस्त यश रणशूर ॥ नऊ लाखांतले सातशें उरले सारे । तोफा बंदुका पडल्या सुने दिसती डेरे ॥ मोहरा पुतळ्या रुपयांचे जागोजाग पडले ढिगारे । पडलेल्या फौजेचे मागें कोण घेणार ॥ हत्ती उंट मोकळे घोड्यांचें खिल्लार । कोणी लूट घेईना पळतां जीव बेजार ॥ गेले दाही दिशांवर पळून[3] । भाऊ नाना० ॥ ११ ॥

शके सोळाशें पांसष्ट फाल्गुन वद्य षष्ठी आदितवार । नऊ रात्र नऊ दिवस लढाई मग फिरले माघारे ॥ सातशांनीं धरली वाट पुण्याची निर्माल्य लष्कर । बेदड घालिती छापे वाट चालेना तिळभर ॥ पुढें बिकट बारी

---

१ 'दीडलाख' पा०. २ 'गर्दी' पा०. ३ नर्मदेचे कांठीं नानासाहेब उतरले होते. छावणीचा गांव बसला त्यास पुनाशा ह्मणतात.

कैसा तारील परमेश्वर । असे सांडाव देत आले अटक उतरून नऊ कोशांवर ॥ ( चाल ) ॥ तिथून अवघे फुटले पुण्याचे रस्ते भुलले । फारदिसा भुलीमधें गुंगले ॥ नऊखंड फिरतां चकले । अन्नाविण वाळून सुकले ॥ भक्षिती झाडांचे पाले । गोसावी कितीएक झाले ॥ तुंबे हातीं घेतले । किती रामेश्वराकडे झुकले ॥ काशीचे रस्ते धरले । या रितीनें सैन्य खपलें ॥ दैवाचे पुण्याशीं आले । लाखोटे सदरेवर पडले ॥ दुःखाचे सागर फुटले । ...... ......... ॥ ( चाल ) ॥ लाखोटे वाचितां झाले अवघे घाबरे । नानाभाऊ बुडाले पुण्यास आली खबर ॥ नानाभाऊ बुडाले परंतु लौकिक दुनयावर । नवलाख बांगडी फुटली असा हाहाकार ॥ दक्षिण बुडाली सती पडल्या महामूर । श्रीमंताच्या तक्तापाशीं भले भले मनसुबीदार ॥ स्थापिले गादीवर माधवराव नेणार । सोन्याची जळली भट्टी उरलें खापर ॥ शाहु छत्रपतीचें देणें सांब अवतार । गातो सगनभाऊ ठिकाणा शाहुनगर ॥ गातो फत्तेजंग पोवाडा करून । भाऊ नाना० ॥ १२ ॥

---

## २. त्याच विषयावर दुसरा पोवाडा.

हा दुसरा पोवाडा सन १८७७ चे जुलई महिन्याचे निबंधमालेंतून घेतला आहे. याचा कवि रामा सटवा नांवाचा होता. या

---

१ ' गाती सुलतान बाळा ठिकाणा शाहूनगर ' पा०.

पोवाड्यासंबंधानें निबंधमालाकार ह्मणतात:—“ शिवाजी महाराजांनीं ज्याचें आपल्या हातानें बीजारोपण केलें तो वृक्ष वाढतां वाढतां शंभर वर्षांनीं केवढा अवाढव्य विस्तार पावला व त्याच्या विस्तीर्ण छायेखालीं सगळें भरतखंड नुकतें विसांवा घ्यावयास लागलें न लागलें तों त्यावर एकाएकीं प्रचंड वज्राघात कोणता झाला हें सर्वांस माहीत आहेच. हा महाप्रसंग महाराष्ट्राच्या वैभवाचा मध्य मानला असतां चालेल. याच्यापर्यंत मराठ्यांस जिकडे तिकडे यशच येत गेलें व यापासून पुढें त्यांच्या सत्तेच्या र्‍हासास आरंभ झाला. हें महायुद्ध होऊन गेल्यास आज शंभरांहून अधिक वर्षें होऊन गेलीं, तरी अद्याप ह्या देशांत आबालवृद्धांस त्याचें स्मरण बुजालें नाहीं. असला महाप्रसंग इकडील शाइरांनीं कसा गाइला याविषयीं सर्व शोधक मनुष्यांस व विशेषत: देशाभिमानी पुरुषांस मोठी उत्कंटा झाल्याशिवाय राहणार नाहीं. हें जाणून पुढील पोवाडा आम्हीं उतरून घेऊन साद्यंत छापला आहे. याचे एकंदर अठरा चौक आहेत. भाऊसाहेबांची स्वारीवर नेमणूक होऊन ते दिल्लीवर गेल्यापासून तों शेवटचा मोड होऊन सगळी धुळधाण होईपर्यंत झालेला सर्व मजकूर यांत आणला आहे. या लढाईंत गाजलेले जे जनकोजी शिंदे, समशेर बहादर, गोविंदपंत बुंदेले, बळवंतराव मेहेंदळे वगैरे वीर, त्यांचें यांत पृथक् पृथक् वर्णन केलेलें आहे. हें महाराष्ट्रदेशीय भाटांच्या तोंडून कानीं पडून गेलीं शंभर वर्षें किती वीरांचे बाहु रणावेशानें स्फुरण पावले असतील !”

चाल—' वारी संकट हरि दामाजीचें । कौतुक देवाचें ॥ '—अमृतराय.
चाल दुसरी—' छळितां मिळून उगीच वसतें । करी सवतीचा संग सुकृत बहु व्यभिचारी वसते ॥ '

भाऊसारखा मोहरा । आह्मांवर कां रुसला पंचीप्या[1]-रा ॥ ध्रुपद ॥

बहुत दिवस झाले शाहूला । जावें निजभवनाला ॥ नाना राखावें तुह्मिं राज्याला । शिक्का दिधला त्याला ॥ अष्टप्रधान भाऊ बाजूला । हवालले राज्याला ॥ मुलूख मारुन केला चकचूरा । दुसमान कांपे थरथरा ॥ भाऊसारखा० ॥ १ ॥

बारा वर्षें झालीं राज्याशीं । कळून आलें त्याशीं ॥ धाड पडोरे त्या मुलखाशीं । कुणिकुन आली ईवशी[2] ॥ भाऊनें हकारलें राव सकळांशीं । कुळ दक्षिण[3] भाईशीं ॥ दिली नौबद गेला दिल्लीशीं । हालीवलें तक्ताशीं ॥ रण-खाब रोवुनि मारितो तलवारा । काशी[4] तीर्थ अवधारा ॥ भाऊसारखा० ॥ २ ॥

तखत फोडुनि केली धुळधाणी । असा नाहिं झाला कोणी ॥ राया प्रभुरायाची करणी । नांव गेलें राहुनि ॥ विश्वासराव बसविले नेऊनी । लिहिलें होतें कर्मीं ॥ घड-ले टांकसाळि रुपये आणि मोहोरा । दिला अवघ्यांशीं रोजमुरा ॥ भाऊसारखा० ॥ ३ ॥

पहिली लढाइ झालि कुंजपुऱ्यावर । सकळ घेउनि

---

१ पंचप्राणांसारखा प्रिय. २ पीडा, अवदशा. ३ दक्षिणच्या सरदारांस. ४ तें रणांगण काशीतीर्थच समजा.

दळभार॥ झोरें रोखले कमाणतीर । मार होती चौफेर ॥ कुतुबशहा मारुनि केला चकचूर । त्याचें कापिलें शिर ॥ आला दक्षिणचा राजा धुरंधर । भाऊसारखा वीर ॥ सुटला अबदालीशीं दरारा । ह्मणे आतां सल्ला करा ॥ भाऊसारखा० ॥ ४ ॥

सल्ला ऐकेना झाला विघोड । अवघा मुलुख सोड ॥ रुपये देत होता दोन क्रोड । धरिली भाऊंनीं आड ॥ तुजला मारिन मी करिन वेड । कंधार पाहिन पुढें ॥ रोवला रणखांब होती धडाधड । नदि जमुनेच्या कडे ॥ खेत्री हाणा म्हणती रणशूरा । कुळक्षेत्रीं धरिला थारा ॥ भाऊसारखा० ॥ ५ ॥

पहिली लढाइ झाली फार ठीक । केले मोर्चे तकीप ॥ भोवतीं खाणलासे खंदक । मधें भाऊचे लोक ॥ कुणिकुन आला लबांडिचा घातक । होती बातमी ठिक ॥ दोन वेळां फिरविला मावार । गिलचा केला घाबरा ॥ भाऊसारखा० ॥ ६ ॥

एक दिवस नेमला मरणाचा । वखत निर्वाणीचा ॥ भाऊनीं पैगम केला सकळांचा । धंवशा वाजे त्याचा ॥ ऐशी हजार खासा नांवाचा । धुरंधर भाऊचा ॥ एकाएकीं आला सामोरा । दिला कुचाचा नगारा ॥ भाऊसारखा० ॥ ७ ॥

---

१ समोर. २ विघाड. ३ काबूल, कंदाहार. ४ अफगाण. ५ डंका.

चाल–‘ वारी संकट हरि दामाजीचें । कौतुक देवाचें ॥ ’–अमृतराय.
चाल दुसरी—‘ छळितां भिऊन उगीच बसतें । करी सवतीचा संग सुकृत बहु व्यभिचारी वसते ॥ ’

भाऊसारखा मोहरा । आह्मांवर कां रुसला पंचीप्या[1]-
रा ॥ ध्रुपद ॥

बहुत दिवस झाले शाहूला । जावें निजभवनाला ॥ नाना राखावें तुह्मि राज्याला । शिक्का दिधला त्याला ॥ अष्ट प्रधान भाऊ बाजूला । हवालले राज्याला ॥ मुलूख मारुन केला चकचूरा । दुसमान कांपे थरथरा ॥ भाऊसारखा० ॥ १ ॥

बारा वर्षें झालीं राज्याशीं । कळून आलें त्याशीं ॥ धाड पडोरे त्या मुलखाशीं । कुणिकुन आली ईवशी[2] ॥ भाऊनें हकारलें राव सकळांशीं । कुळ दक्षिण[3] भाईशीं ॥ दिली नौबद गेला दिल्लीशीं । हालीवलें तक्ताशीं ॥ रण-खाब रोवुनि मारितो तलवारा । काशी[4] तीर्थ अवधारा ॥ भाऊसारखा० ॥ २ ॥

तखत फोडुनि केली धुळधाणी । असा नाहिं झाला कोणी ॥ राया प्रभुरायाची करणी । नांव गेलें राहुनि ॥ विश्वासराव बसविले नेऊनी । लिहिलें होतें कर्मीं ॥ घड-ले टांकसाळि रुपये आणि मोहोरा । दिला अवघ्यांशीं रोजमुरा ॥ भाऊसारखा० ॥ ३ ॥

पहिली लढाइ झालि कुंजपुऱ्यावर । सकळ घेउनि

१ पंचप्राणांसारखा प्रिय. २ पीडा, अवदशा. ३ दक्षिणच्या सरदारांस. ४ तें रणांगण काशीतीर्थच समजा.

दळभार॥ [1]झोरें रोखले कमाणतीर । मार होती चौफेर ॥ कुतुबशहा मारुनि केला चकचूर । त्याचें कापिलें शिर ॥ आला दक्षिणचा राजा धुरंधर । भाऊसारखा वीर ॥ सुटला अबदालीशीं दरारा । ह्मणे आतां सल्ला करा ॥ भाऊसारखा० ॥ ४ ॥

सल्ला ऐकेना झाला [2]विघोड । अवघा मुलुख सोड ॥ रुपये देत होता दोन क्रोड । धरिली भाऊनीं आड ॥ तुजला मारिन मी करिन वेड । [3]कंधार पाहिन पुढें ॥ रोवला रणखांब होती धडाधड । नदि जमुनेच्या कडे ॥ खेत्री हाणा म्हणती रणशूरा । कुळक्षेत्रीं धरिला थारा ॥ भाऊसारखा० ॥ ५ ॥

पहिली लढाइ झाली फार ठीक । केले मोर्चे तकीप ॥ भोवतीं खाणलासे खंदक । मधें भाऊचे लोक ॥ कुणिकुन आला लवंडिचा घातक । होती बातमी ठिक ॥ दोन वेळां फिरविला माघार । [4]गिलचा केला घाबरा ॥ भाऊसारखा० ॥ ६ ॥

एक दिवस नेमला मरणाचा । वखत निर्वाणीचा ॥ भाऊनीं पैगम केला सकळांचा । [5]धंवशा वाजे त्याचा ॥ ऐशी हजार खासा नांवाचा । धुरंधर भाऊचा ॥ एकाएकीं आला सामोरा । दिला कुचाचा नगारा ॥ भाऊसारखा० ॥ ७ ॥

---

१ समोर. २ विघाड. ३ काबूल, कंदाहार. ४ अफगाण. ५ डंका.

प्रथम पडला गोविंद्पंत बुंदेला । केला भाऊनीं हल्ला ॥ विसा हजारांशीं गिलचा आला । हुजरातीवर पडला ॥ मग साहिना बळवंत रायाला । ढिगांत जाउनि पडला ॥ भाऊ विनवितो बहाद्‌रा । रणीं राहिला बिचारा ॥ भाऊसारखा० ॥ ८ ॥

विश्वासराव शिपाई रणशूर । भले राजकुमार । मारितो फौजा हातीं तलवार । रणांत होउनि धीर ॥ भोंवती गोळ्या वर्षती अपार । मधें उभे सरदार ॥ गिलचा कापला बेसुमार । भाऊ म्हणे मागें फिर ॥ अवचित गोळि लागली धुरंधरा[1] । मुखीं बोलला हरिहरा ॥ भाऊसारखा० ।९।

जनकोजी शिंदे रणशूर रणगाजी । चढती तुरंग तेजी ॥ त्याला भाऊसाहेब होती राजी । औंदां[2] राखा बाजी[3] ॥ मग फुरारले राव जनकोजी । शिरीं छत्र भावजी ॥ नित्य नेम गिलचा कापते चरांचरां । शिर धाडितो नजरा ॥ भाऊसारखा० ॥ १० ॥

सोनजी भापकर मानजी पायगोडे । रणीं टाकिले घोडे ॥ तुकोजी शिंदे पडले पायांपुढें । जैसे अग्नीचे हुडे ॥ आणखी दमाजी गायकवाड । होळकर रणभिडे ॥ अवघ्या शाहीवर आली धाड । अवचित झाला मोड ॥ एकाएकीं आला सामोरा । दिला कुचाचा नगारा ॥ भाऊसारखा० ॥ ११ ॥

---

१ विश्वासरावाला. २ आज ( या प्रसंगीं ). ३ बाजू.

समशेर बहादर रणशूर रणगाडा। रणीं वाजे चौघडा॥ हटकुन गिलचे हाणितो धडाधडा । ढाल तरवार जंमदडा[1] ॥ ज्यानें रणीं अडविला तीस घोडा । सन्मुख दावी मुखडा ॥ जसा बाजीचा[2] पुत्र हिरा। येती जखमाच्या लहरा ॥ भाऊसारखा० ॥ १२ ॥

चेतली जणुं खुप झालि लढाई । मार होती सवाई ॥ त्याचा रंग बारगिर बिलाई । गिलचा करितो घाई ॥ झाला मोड पळती कुळशाही[3] । पालखिस गणती नाहीं ॥ एक एक पळुन आला माघारा । रणीं राहिला बिचारा॥ भाऊसारखा० ॥ १३ ॥

कशि गत झालि गड्यांनो भाऊला । जनकोजी शिंद्याला ॥ लोक पुसती एकुनेरांला[4] । आह्मीं नाहिं पाहीला ॥ भाऊसारखा मोहरा हरपला । काय सांगावें नानाला ॥ भाऊला नाहीं कोणाचा आसरा । वेढा घातला चौफेरा ॥ भाऊसारखा० ॥ १४ ॥

ज्याला पडली भाऊची भ्रांत । ते राहिले रणांत ॥ फितुरी पळुनि आले दखणांत । वांचविली दौलत[5] ॥ त्यांचा ईश्वर करिल सत्यनाश । यश दिलें गिलचांस ॥ भाऊची भ्रांत पडालि नारिनरां । सकळ जनां लहान थोरां ॥ भाऊसारखा० ॥ १५ ॥

---

१ आयुधविशेष. २ थोरला बाजीराव. ३ शाहींतले सरदार. ४ एकमेकांला. ५ आपापला सरंजाम.

कागद आला रावनानाला । होते उजन्या[1] नगराला ॥ कागद वाचितां आंग टाकि धरणीला । मोठा अतिशोक केला ॥ आह्मांवर श्रीहरि देव कोपला । विक्षोप आणिला राज्याला ॥ दाटला गंहिवर गोपिकाबाईला । अति कहर वर्षला ॥ नाना फिरुनि चालले माघारां । दिला कुचाचा नगारा ॥ भाऊसारखा० ॥ १६ ॥

भाऊसाठीं झुरतीं जनावरें । जंगलचीं पांखरें ॥ राघू मैना आणि खबुतरें । टाहो करिती फार ॥ कुणिकडे गेला आमचा मनोहर । सपन झालें खरें ॥ पैसा मिळेना म्हणती सारे । बंद झाले सावकार ॥ फुटला पर्वतीशीं घाम दर-दरां । वाडा गजबजला सारा ॥ भाऊसारखा० ॥ १७ ॥

आह्मीं पद बांधिलें वैताग । जिवास केला त्याग ॥ कोणीकडे गेले भाऊ श्रीरंग । नानाचे जिवलग ॥ कधीं भेट देइल आह्मां संग । जिवा होइल खुषिरंग ॥ एथुन झाला पदाचा अभंग । ह्मणे महादु कविरंग ॥ रामा सटवा ह्मणे दातारा । वाट पाहतो खरोखरा ॥ भाऊ-सारखा० ॥ १८ ॥

---

## ३. त्याच विषयावर तिसरा पोवाडा.

हा तिसरा पोवाडा सटवा राम नांवाच्या कवीनें केला आहे. तो आह्मांस एका जुन्या वाडांत मिळाला.

---

१ उज्जयिनीं.



श्री. बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे.

चाल—‘ दोदिवसांची तनु हे साची सुरतरसाची करुनि मजा । ’

—रामजोशी.

भाऊ नानाचें दुःख ऐकतां हृदय फुटलें कडाकडी । मुक्त पावले साहेब नाना कशा केल्या देवा तडातोडी ॥ ध्रुपद ॥

भाऊसाहेबाची अचळ[१] बुद्ध प्रसन्न त्याला भगवंत । अबदुल्याची[२] खबर ऐकतां मनांत झाले दुश्चित्त[३] ॥ बारा सरदार बारा उमराव बसोनि करिती खलबत[४] । घटका तिथी भट सांगतां बरवा आहे मुहूर्त ॥ बाईसाहेबाची आज्ञा घेतली जावें हिंदुस्थानांत । ओट्यांत[५] घातले विश्वासराव[६] केला हवाला ह्मणवीत ॥ अष्ट[७] उमराव भाऊसाहेब घेऊनि गेले पानपतावरत । .................... ॥ केला हंकारा[८] दिला नगारा स्फुरण आलें त्याच घडी । बुद्धीचे सागर सदोबा घालुनि गेले कशी उडी ॥ भाऊ नानाचें० ॥ १ ॥

हत्ती घोडे लावलष्कर ते एक एक होता हंबीर[९] । त्यांचीं नांवें तुह्मां सांगतों ऐकून घ्या जरा सत्वर ॥ धाकले नाना कुळाक्षरि त्याच्या मोहरलें फुलशहर । महिपतराव[१०] तेहि पानसे तोफखान्याचे सरदार ॥ गोविंदराव[११] बुंदेले अग्नीचा

१ न चळणारी. २ अहमदशाहा अबदल्ली. ३ उदासीन. ४ मसलत. ५ पदरांत. ६ नानासाहेबांचे वडील पुत्र. ७ अष्टप्रधान. ८ हांकले. ९ रणशूर हंबीरासारखे. १० पानसे तोफखान्यावर मुख्य पेशवाई अखेरपर्यंत होते. ११ झांशीवाले.

पुढा गेला होता रस्त्यावर । बळवंतराव[1] रणशूर खासा पडला नजरेसमोर ॥ विठ्ठल[2] शिवदेव मर्द जातीचा क्षणभर नाहीं धरला धीर । त्याच्या मागें पळोन गेले अंताजी[3] माणकेश्वर ॥ बाजी भिवराव अष्ट उमराव रणामधिं झाले चूर । दिल्लीमधिं तक्त स्थापलें ठेवले नारो[4] शंकर ॥ असे एक एक ब्राह्मण कित्येक लढाऊ लाज वाटती मज थोडी । अशुद्धाचे महापुर वाहती शिरें उडालीं झडाझडी ॥ भाऊ नानाचें० ॥ २ ॥

पांडव दलचा जसा क्षत्रिय वीर तारक अर्जुनाचा । इभ्रामखान[5] व्याघ्र जातीचा सोबती झाला मरणाचा ॥ ज्यानें सूड घेतला हेतु पुरविला गिलचांचा । असला दुसरा चाकर होईना निमकहलाल[6] भाऊसाहेबाचा ॥ वनीं[7] राहिले विश्वासराव जीव गोपिका नानाचा । तिथें भाऊची शुद्ध हरपली सागर होता बुद्धीचा ॥ अवघ्या लोकांनीं हिंमत टाकिली खांब[8] बुडाला दौलतीचा । सज्जन ह्मणती भाऊ बुडाले मोठा घात झाला आमुचा ॥ दुर्जन ह्मणती बरें झालें कांच मिटला जगाचा । जे गिलचा संगें मळोन राहिले हरी[9] ठाव पुसेल त्यांचा ॥ भाऊसंगें

---

१ मेहेंदळे. २ विंचूरकर. ३ टेंभुरणीकर. ४ राजेबहादर. ५ गार्दी लोकांवरचा मुख्य. याचे लोक कवाईत शिकलेले होते. जातीचा मुसलमान असून ज्याचें निमक खाल्लें होतें त्याची बाजु पुरी संभाळली. पानपतचे लढाईंत हा मात्र इमानानें लढला. ६ निमक खाल्लें तें स्मरणारा=कृतज्ञ. ७ वनीं=रणांत. ८ दौलतीचा खांब बुडाला=युवराज पटला. ९ देव.

ब्राह्मण मेले नाहीं लागत अर्धघडी । काय तयाची कीर्त सांगावी साहेब नाम धडाधडी ॥ भाऊ नानाचें० ॥ ३ ॥

होळकर भले झुंजार[1] पळ काढिला लौकरी । जेव्हां गिलचाचा मार सुटला ठाव देईना त्याला धरत्री ॥ सोनजी आपकर मनाजी पायगुडे रणांत राहिल्या रणे[2]-भेरी । मोठमोठे सरदार जवळ पडला जनकोजी[3] शिंदा यशवंतराव[4] धारकर ॥ राव दमाजी[5] निघून चालले असे गळाले क्षत्री । समशेर[6] बहादूर रणीं थकले कर्त्यांची गत आहे न्यारी ॥ भाऊ नानाचें० ॥ ४ ॥

आह्मीं गाइलें पद साजना जिवा लागल्या झुरणी । भाऊसाहेबाचें दुःख ऐकतां थरथर कांपे मेदिनी[7] ॥ रामचंद्रांनीं सीता टाकिली जशी येऊंदे[8] भवानी । रडे गोपिकाबाई एकटी छत्र[9] दिसेना नयनीं ॥ विश्वासराव भाऊ बुडाले[10] पानपताचे मैदानीं[11] । भाऊवांचून आह्माला कोण नेईल पैलतिरीं[12] ॥ श्रीमंत महाराज ह्याला प्रसन्न गौरीसुरे[13] पाणी । विश्वासराव भाऊ बुडाले पानपताचे मैदानीं ॥ सटवा राम नित्य हमेशा चरणीं वाजतो चौघडा । हाच

१ लढणारे. २ रणनौबती. ३ हा शिंद्यांतील मुख्य पडला हा फार अनर्थ झाला; कारण पानपतचे लढाईत यानें खूप युद्धकौशल्य दाखविलें. ४ पवार. ५ गायकवाड. ६ थोरले बाजीरावसाहेबांस मस्तानीपासून झालेला पुत्र. ७ पृथ्वी. ८ लोकापवाद येऊं नये ह्मणून रामानें जानकी सतीचा त्याग केला. ९ क्षियांत छत्रपती. १० पडले, मृत झाले. ११ रणसंग्रामीं. १२ भवसमुद्रांतून पलीकडे. १३ गौरी ( हर ) शूलपाणी ?

पोवाडा ऐक शाहिरा नित्य होती घडामोडा ॥ माऊ नानाचें० ॥ ५ ॥

---

## ४. नानासाहेब पेशवे यांचा मृत्यु, यावर पोवाडा.

पानपतच्या लढाईंत पराजय झालेला ऐकून बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब यांचें हृदय फुटून त्यांचा सन १७६१ च्या जून महिन्यांत मृत्यु झाला. पुढील पोवाड्यांत या पुरुषाचें गुणदोष-वर्णन केलें आहे. हा पोवाडा पिंपळगांवकर शिवराम नांवाच्या कवींनें केलेला असून आह्मांस एका जुन्या बाडांत मिळाला.

चाल–श्री० पेशवे प्रधान बहुप्रीतीचे । अष्टप्रधानांत उतरले मर्जीत महाराजांचे ॥

धन्य भगवाना नेलास मोतीदाणा । दक्खनचा बाद-शाह साहेब नाना ॥ ध्रुपद ॥

दिवाणखाना खुष रंगमहाल जोरें मौज । तऱ्हेतऱ्हेचे पक्षी नानाची रिज ॥ काय गेंडिया सांबर आणिक सा-वज । भलेभले पटाइत वाघ गर्जे ॥ खंडेरायाची जोडी विरळागत काज । नाना पेशवे नांव तयाला साज ॥ उघड्या ताटीं मुलुख करितो राज्य । गरिबाची करीत होता बुज ॥ ................ । दुर्बळ ब्राह्मणावर फार त्याची रिज ॥ पूल पालख्या तमाम केल्या फन्ना । ह्यांनीं पुल बांधिले नावा केल्या मना ॥ धन्य० ॥ १ ॥

---

१ कवन ह्मणणारा.

अघटित बुध त्याचे पत्रवाडे । खास हौसीचे राखिले घोडे ॥ तुरंगी टाकिले पायांत तोडे । ............ ....... ॥ टाकिले ऐसे तोडे जरदाईत । घोडा काळा निळा बोर नळनळीत ॥ अबलक पंचकल्याणी कुमाइत । बारा हजार घोडा पुण्यांत कडकडीत ॥ ह्याशिवाय झमकती पागा नाहीं गणित । भाऊसाहेबासारखी बाजू अशी झाली मुक्त ॥ दादासाहेब मनांत चिंताग्रस्त । .......... ....... ॥ विश्वासराव नानाचा पुत्र नगिना । तो माधवराव बाळ बत्तीसलक्षणा ॥ धन्य० ॥ २ ॥

नाना होते धुरंधर नाहीं लक्ष्मीला पार । शितल छाया एक दयावंत पृथ्वीवर ॥ मोठे मोठे महंत तरले होत । त्याची अशी कीर्त साधुसंत ॥ श्रावणमासीं दक्षणा पुण्यांत । मिळाले ब्राह्मण नाहीं गणित ॥ बुंदेलखंड माळवा काशी प्रांत । कर्नाटक तेलंगण आणिक गुजरात ॥ हे अवघे तळ कोंकण सदोदित मिळालेत । ब्राह्मण पर्वतीस तेलंगी ब्राह्मण डोकीं देतात ॥ ओंग्राळं ओंग्राळं रुपये नाहीं घेतात । शिव्या श्रीमंताला देतात ॥ रमण्यामधिं शिलबन चतुर शहाणा । काय अगाध करणी गोपिकाबाई सुलक्षणा ॥ धन्य० ॥ ३ ॥

नाना होते केवळ अवतार गोपिकाबाईचें छत्र कळस ढळला । पण नाहीं करुणा आली त्या देवाला ॥ काय द्वारका सोडुन कृष्ण निघाला । नळानें टाकिलें दम-

यंतीला ॥ भोळाशंकर होता पार्वतीला । रामचंद्रानें मोकलिलें सिताबाईला ॥ .................. । हरिश्चंद्र होता तारामतीला ॥ जंगलशिचा रमणा सोडिला रमणा । कैक हजार आणिक बुंधेलखाना ॥ धन्य० ॥ ४ ॥

हत्तीघोड्याचे केले रथ। आणिक जिनखाना नाहिं गणित ॥ नाना सारखा समर्थ गेला पुतळा । सावलीच्या सुख गोधनें गोळा ॥ त्या पिकल्या वृक्षाखालीं पक्ष्यांचा मेळा। त्याच्या गुणवती केशरी नाटकशाळा ॥ काय कातलें भगवंता वेळोवेळा । त्याच्या अठरा कारखान्याच्या गेल्या कळा ॥ शिरींचे शिरपेंच मोत्यांच्या माळा । राजपद गेलें परमेश्वरा सगळें ॥ शिवराम गातो पिंपळगांव ठिकाणा । आह्मी वेडें बागडें गातों मनाशीं आणा ॥ धन्य० ॥५॥

---

## ५. पेशवाईच्या आरंभापासून नानासाहेबांच्या मृत्यू-पर्यंतच्या हकीकतीवर पोवाडा.

हा पोवाडा प्रभाकर कवीकृत असून आह्मांस एका जुन्या बाडांत सांपडला. प्रभाकर जनार्दन दातार हा कोंकणांतील हर्णई मुरूड येथचा राहणारा. याचा जन्म स० १७६९ त होऊन तो स० १८४३ त मृत्यु पावला. त्याची कविता गोड असून प्रसिद्ध आहे.

चाल—‘ श्रीरंग गोपिकोत्संग ’—रामजोशी.

श्रीमंत ईश्वरी अंश, धन्य तो वंश, परम पुरुषार्थी ।
बरोबरी तयांची कोण करील पाहातार्थी ॥ ध्रुपद ॥

राजाधिराज महाराज, गरीब नवाज, धनी श्रीमंत। भासती सदैव देव आमचे हेच भगवंत ॥ पाषाण धातुच्या मूर्ती, धरत्री वरती, आहेत अनंत। त्या पूज्य परंतु नाहींत प्रगट जीवंत ॥ तसे नव्हेत हे तर देव, कलिमध्यें भूदेव, ब्राह्मण संत। त्या वंशीं पेशवे झाले सबळ बळिवंत ॥ (चाल) ॥ योग्यतेस आणिले पंत, होऊनियां कृपावंत, त्या राजांनीं। ह्या मुळेंच चढती कमान, धरुनी अभिमान ............। मग बहिरोपंत सोडवून, बिडी तोडवून, प्रभुच्या पणज्यांनीं ॥ (चाल पहिली) ॥ पुढें प्रधानपद मिळवून, वैरी पळवून, मारिल्या शर्थी ॥ श्रीमंत० ॥ १ ॥

राव बाजी पुण्यामध्यें येऊन, हातावर घेऊन, निघाले शीर। प्रारंभीं पाहिलें जनस्थान रघुवीर ॥ नेमाड माळवा मुलूख, करून सरसलूख, मोडिले वीर। मेवाडचे राजे न धरती धीर ॥ गढमंडळ बुंदेलखंड, डंघईत अखंड, राहून थंड, सही केलें। प्रतापें करून या जगांत नांव मिळविलें ॥ (चाल) ॥ बुडवूनि या बहाद्दरास, आणली घरास, माशुक मस्तानी। दरवर्षी धौशा घालून, जावें चालून, अघाडीस मस्तानी ॥ शह दिला नगर थेटपास, खु ............। ................ ॥ (चाल पहिली) ॥ उपरांत नर्मदा कांठीं, सार्थकासाठीं, मोक्षकार्यार्थी। देह समर्पिला त्या स्थानीं याच भावार्थी ॥ श्रीमंत० ॥ २ ॥

तेची दुनियेमाजी धन्य, न मानी अन्य, वंदिती स्वामी। जीव खर्च कराया सिद्ध धन्याच्या कामीं ॥ तीन वर्षें राज्य वसवून, मोर्चे बसवून, सभोंवते धमामी। सुरुंगांनीं पाडिला अलगत बुरुज बदामी ॥ हल्ल्यांत उडाले लोक, करिती किती शोक, पडून संग्रामीं। नऊ लक्ष बांगडी फुटली वसई मुक्कामीं ॥ (चाल) ॥ बक्षीस दिले कडींतोडे, पालख्या घोडे, वाजे चौघडे, जमीदाऱ्या। ठायीं ठायीं दिमती भरभरून, आंख ठरवून, सजीवल्या सरदाऱ्या। परशत्रू होईना खाक, वांटूनी परख, तशाच हवालदाऱ्या॥ ( चाल पहिली ) ॥ खूब केली तुह्मीं तलवार, नांवनिशी-वार, म्हणून किती प्रार्थी। यशस्वी होतां तो संवत्सर सिद्धार्थी ॥ श्रीमंत० ॥ ३ ॥

बाळाजी बाजीराव प्रधान, केवळ निधान, होते प्राणी। आणिलें पुण्यांत जपानी नळाचें पाणी ॥ युद्धांत जिंकुन नबाब, बसविली बाब, करून धूळदाणी। त्या सालींच बंगाल्यांत घातलीं ठाणीं ॥ (चाल) ॥ लागलेंच केलें कूच, स्वारी दरकूच, परतली सगळ्यांची। लष्करांत केवढा गजर, होई नित्य नजर, मोतीं मणि पोंवळ्यांची। वांटून खिचडी रमण्यांत, आनंदें पुण्यांत, मोहरा पुतळ्यांची ॥ ( चाल पहिली ) ॥ खुष गेले शास्त्री पंडीत, विद्या-मंडित, विप्र विद्यार्थी। गेले कीर्त गात ते ब्राह्मण तीर्थोतीर्थी ॥ श्रीमंत० ॥ ४ ॥

शत्रूस न जाती शरण, आल्या जरी मरण, न देती पाठ। दादाही गणावा त्यांत, बाण भात्यांत, भाताचें ताट॥ भलत्याच ठिकाणीं घाली रिपुशीं गांठ। तिन्ही काळ निरंतर साधी, जातीनें बांधी, हत्यारें आठ ॥ ( चाल )॥ फेडून नवस माहोरास, केले लाहोरास, जिंकीत शेंडे। अरे जपानी सहज अटकेंत, पाव घटकेंत, लाविले झेंडे। सरदार पदरचे कसे, कोणी सिंह जसे, कोणी शार्दुल गेंडे ॥ ( चाल पहिली )॥ पुढें चाले वीरांचा भार, घेती करभार, स्वामीकार्यार्थी। हे पुरुष ह्मणावे श्रेष्ठ बंधुचे स्वार्थी ॥ श्रीमंत० ॥ ५ ॥

भाऊसाहेब योद्धा थोर, अंगामध्यें जोर, पुरा धैर्याचा। विश्वासरावही तो तसाच शौर्याचा ॥ दोहों बाजूस भाला दाट, पलिटेना वाट, अशा पर्याचा। किंचित पडेना प्रकाश वर सूर्याचा ॥ दृष्टांत किती कवि भरील, काय स्तव करील, ऐश्वर्याचा। शेवटीं बिघडला बेत सकळ कार्याचा ॥ ( चाल )॥ कितीकांचीं बसलीं घरेंच, हें तर खरेंच, ईश्वरी कृत्य। शोकार्णवीं नाना पडून, नित्य रडरडून, पावले मृत्य। कवि गंगु हैबती दीन, पदांबुजीं लीन, कृपेंतील भृत्य ॥ ( चाल पहिली )॥ महादेव प्रभाकर ध्यायी, सदा गुण गाई, यथासाह्यार्थी। श्रीमंत प्रभूची कीर्त जशी भागीरथी ॥ श्रीमंत० ॥ ६ ॥

---

## ६. थोरले माधवरावांची पत्नी रमाबाई सती गेली, यावर पोवाडा.

नानासाहेब पशवे वारल्यावर त्यांचे ज्येष्ठ पुत्र माधवराव बल्लाळ हे पेशवाईच्या गादीवर आले. त्यांची पुण्यशील व पतिव्रता बायको रमाबाईही कोणास माहीत नसेल असें नाहीं. थोरले माधवराव-साहेब पेशवे यांची चांगली कारकीर्द तर अझूनपर्यंत पुष्कळांचें तोंडून ऐकतों. त्यांच्यासारखी न्यायपद्धति व रयतेची कळकळ कोणत्याच पेशव्याचे ठिकाणीं नव्हती असें ह्मणतात. याच नीतिमान् पुरुषाची धर्म पत्नी रमाबाई, ही भ्रतार मरण पावल्यावर या लोकच्या क्षणभंगुर सुखास लाथ मारून परलोकीं चालती झाली! थोरले माधवरावसाहेबांस कफक्षयाची विकृति होऊन थेऊर मुक्कामीं त्यांचा स० १७७२ त अंत झाला, त्या वेळीं रमा-बाई सहगमन करती झाली. या स्त्रीपुरुषांची प्रीति अत्यंत असे. रमाबाई उदार बुद्धीची, धर्मशील आणि सुस्वभावाची होती, अशी ख्याति आहे.

या पुस्तकांतील बहुतेक इतिहासप्रसिद्ध पुरुषांचे पोवाडे मिळा-लेले पाहून आह्मांस या बाईच्या पोवाड्याविषयीं भारी आस्था वाटूं लागली; परंतु तो बहुतेक गोंधळ्यांकडे मुळींच नसल्याचें समजलें, यावरून आह्मास फार दिलगिरी वाटली. परंतु वाचकांच्या भाग्यानें ह्मणा, किंवा आमची ही सेवा त्या महासाध्वी सतीस घ्यावयाची होती ह्मणून ह्मणा, एका वृद्ध सचोटीच्या गोंधळ्याकडून हा पुढील पोवाडा मिळाला. पण त्यांतही



श्री. थोरले माधवराव पेशवे.

कमताई राहिलीच आहे, ती अशी कीं, यांतील मधला एक चौक आणि शेवटचा एक चौक असे दोन चौक त्या गोंधळ्याच्या विस्मृतीमुळें अजीबाद राहिले. गोंधळ्यानें असें सांगितलें कीं, ' हा पोवाडा पूर्वी मला सर्व ह्मणजे सात चौक येत होता, परंतु अलीकडे पोवाडे ऐकण्याची विशेष भक्ति कोणाचीच नसल्यामुळें तें पाठांतर अर्थातच मलीन झालें. स्मरण करतां करतां आज पांच चौकांची मात्र चांगली आठवण होते, बाकी राहिलेल्या दोन चौकांची चूकभूल होते. याकरितां ते अजीबाद गाळावे हें चांगलें. ' गोंधळ्याच्या सांगण्यावरून अशी एक गोष्ट कळली कीं, पन्नास वर्षांपूर्वी शूर लोकांचे व नांवाजलेल्या पुरुषांचे पोवाडे ऐकण्याची अभिरुचि महाराष्ट्रजनांत विशेष होती; दुसरें असेंही दिसून येतें कीं, आतांप्रमाणें त्या वेळीं इतिहासादि ग्रंथांचा मागमूस नसतां, या असल्या पोवाड्यांतील विश्वसनीय माहितीवरूनच आपल्या पूर्वजांचा इतिहास समजून घेण्याचा हव्यास पूर्वींचे लोकांस विशेषच होता. आणि म्हणूनच राजद्वारीं किंवा सरदार लोकांचे घरीं, गोंधळी व तसेच जे कोणी पोवाडे ह्मणणारे असतील त्यांची चहा होत असे.

**चाल**–'राया अंजनीच्यासुता । तुह्मी वज्रशरीरी होतां । माहित सर्वथा ॥ '

—सगनभाऊ.

**सांग रमाबाई सत्वधीर । रावसाहेब ईश्वरअवतार ॥ ध्रुपद ॥**

**नाना साहेब होते पुण्यपावन । उदरीं जन्मलें एक रत्न ॥**

विश्वास[1]राव, राव[2], नारायण[3] । जसे बंधु राम लक्षुमण ॥ हिऱ्यारत्नांची जोडी विटूसलि[4] कोण । ज्याची कळा तोच जाणे ॥ (चाल) ॥ वाजे खणखण । धवशा दिला बसवून ॥ नाहीं गेले पुणें सोडून । केलें काबीज झुंजल्याविण[5] ॥ वसई सुरतेचें ठाणें । कुलाबा फिरंगाण ॥ आंग्रे आणिले धरून । ते बंदीशाळेंत अझून ॥ सोडवील कोण द्वाही त्याची फीर ॥ सांग० ॥ १ ॥

बुद्धीचे सागर रावसाहेब होते । कर्मीं त्यांचे अघटीत ॥ त्यांचे बुद्धीचा नकळे अंत । हत्ती घोड्याचे मोठे परीक्षवंत ॥ ........................ । स्वारी निघाली त्वरीत ॥ (चाल) ॥ संगें सडी स्वारी । संगें चौघड्यांच्या भेरी ॥ कालू वाजती नानापरी । बारगिरांची गत काय न्यारी ॥ पुढें धांवती विटेकरी ॥ आयन्यांची खासी अंबारी ॥ गज सजवून तयामाझारी ॥ ........................ । वर्णिती राव किंकर ॥ सांग० ॥ २ ॥

स्वारी पुण्याहून गेली थेऊरा[6]ला । त्या गणपतीच्या सेवेला ॥ रमाबाई विनवी त्या गणपतीला । चुडेदान देयीं तूं मजला ॥ एवढें वरीस राख साहेबांला । अवघा सोन्यानें मढवीन तुजला ॥ मंदिल मुंडासा शिरिपेंच वाहि-

---

१ हे थोरले पुत्र पानपतचे युद्धांत पडले. २ माधवराव. ३ नारायणराव हे धाकटे. यांस राघोबादादानें मारविलें. ४ नाहींशी केली. ५ यद्धावांचून. ६ दर चतुर्थीस रावसाहेब थेऊरास देवदर्शनास जात असत.

ला । हिरे जोडीन तुझ्या मुकुटाला ॥ सोन्याचा कळस लावीन तुझ्या शिखराला । पांचा लक्षांचा नवस केला ॥ (चाल) ॥ बाई विनविती । मज प्रसन्न व्हावें गणपती ॥ कशी हीन झाली तुझी मति । मंगळवाराच्या रातीं ॥ साह्यट आले गणपती । उभे ठाले ग बाई पाहती ॥ कर जोडून बोले गणपती । काय आहे ग माझे हातीं ॥ कर जोडूनि सांगे गणपती । कर्ता हर्ता तो श्रीपती ॥ मी मोदकाचा बहु पती । ऐकून बाई हांसली चित्तीं ॥ पुढें उगवला दिवस बुधवार ॥ सांग० ॥ ३ ॥

दिवस उगवला बुधवार बुद्धिवंत । दिशा धुंदकारल्या समस्त ॥ गेले निजधामा रावसाहेब श्रीमंत । देवाज्ञा झाली त्वरित ॥ रमाबाई होती दुसऱ्या डेऱ्यांत । कळली बातमी आली धांवत ॥ पदर टाकिला खांद्यावर त्वरित । धांवत आली देवळांत ॥ जातों आह्मी नाहीं राहत । ......... ......॥ ( चाल )॥ करा बोलावणें[1] । आह्मा निजधामाशीं जाणें ॥ तुळशी मंजुळी तोडून । त्या माळा गळ्यांत घालून ॥ सर्व शृंगार उतरून । हें निर्वाणीचें लेणें ॥ गोपिकाबाई ह्मणे । जवळ बोलून नारायण ॥ राघोबादादा येऊन ॥ हात वाटींत घालून ॥ राव निरविले नारायण ॥ ............ ॥ वर्णिती राव किंकर ॥ सांग० ॥ ४ ॥

बाई चालली थेऊरांतून । कुंडी[2] साहेबाची घेऊन ॥

---

१ बोळवण. २ शव.

अबीर गुलाल गेली गर्दी होऊन । मुच्छदी उधळती पानें ॥ आणिक चवघडे वाजती खणखण । पुढें हुजराती घेऊन । मुळेच्यातिरीं उभी राहिली जाऊन । काशीचें पाणी आल्या कावडी भरून ॥ बाईनें केलें जलपूजन ॥ (चाल) ॥ रमाबाई पाषाण हिय्या केला । प्राणज्योतिशीं मिळविला ॥ उभी धर्मशिळे[1] ठाकली । हातची टाळी पिटली ॥ ढवराळ जळूं लागली । हाक इंद्रसभेला गेली ॥ विमानें धाडून दिलीं । दोघें विमानीं बसविलीं ॥ सती शोभली जशी सुलोचना नार ॥ सांग० ५ ॥

---

## ७. नारायणराव पेशवे यांचा मृत्यु,

### यावर पोवाडा.

थोरले माधवराव मरण पावल्यावर त्यांच्या सांगण्याप्रमाणें नारायणरावास गादीवर बसविलें. माधवरावांनीं मरतेसमयीं रघुनाथरावाचे ओटींत नारायणरावास घातलें. पुढें आनंदीबाईचे मसलतीनें रघुनाथरावानें सुमेरशिंग गारद्याकडून नारायणरावास मारण्याचा बेत केला. ज्या दिवशीं दुपारीं सुमेरशिंग आपल्या लोकांसहवर्तमान वाड्यांत नारायणरावाचा वध करण्याकरितां आला, त्या वेळीं नारायणराव शाल्योदन भोजन करून गाढ निद्रेंत निमग्न

१ सती धर्मशिळेवर पाय ठेवून अग्निप्रवेश करिते. ही धर्मशिळा स्वर्गाची पायरी समजतात. २ सुमेरशिंगास रघुनाथरावानें जें पत्र पाठविलें होतें त्यांत ' धरावें ' असें लिहिलें होतें, पण त्या ' ध ' चा ' मा ' आनंदीबाईनें केला असें ह्मणतात.

झाले होते. बाहेरचा गलबला कानीं पडून ते जागे होईपर्यंत, त्यांस कोणीं उठविलें नाहीं व त्यांस ही वार्ता कळविली नाहीं. जागे झाल्यावर नारायणराव घाबरे होऊन आपला मृत्यु चुकविण्यासाठीं इकडे तिकडे पळूं लागले, परंतु दुष्ट सुमेरसिंगानें पाठीं लागून वार करून त्यांस सन १७७३ त ठार मारिलें ! त्यांनीं आठ महिने राज्यकारभार पाहिला. या गोष्टीचें या पोवाड्यांत वर्णन आहे.

हा पोवाडा लहिरी मुकुंदा नांवाच्या कवीनें केलेला आहे. याच्या आह्मांस चार प्रती मिळाल्या. एक वि० ज्ञा० वि० पु० ३ पृ. १४३ येथें छापलेली; दुसरी एका गोंधळ्याकडून घेतलेली; तिसरी एका जुन्या बाडांत सांपडलेली; व चवथी कोल्हापुराहून रा. रा. पाठक यांनीं पाठविलेली. या चारही प्रती ताडून हा पोवाडा छापला आहे.

**चाल**—पुरेपुरे रे वारंवार छळणा माझी ।

—**सगनभाऊ.**

**चाल दुसरी**—दिल्या छावण्या बाई कोण्या ठिकाणीं शिंदा ।
खरोखरी सांगा बातमी जासुदा दादा ॥

**दक्खनचा[1] दिवा मालवला हिरा हरपला । काय गुपीत घाला केला नारायणरावाला ॥ ध्रुपद ॥**

---

१ ' कशी करुणा नव्हती आली राघोबाला । अपघात करून नारायणरावाला ॥ ' पा०.

एकछत्र करुनि गेले राव माधवराव । थरथरां कांपत होते अष्ट उमराव ॥ वसविलें हस्तनापुर राज्य पाच्छाव । दादासि मोकळें केलें राज्य करावें ॥ तुटली आयुष्याचि दोरी नाहीं उपाव । त्यांनीं मरते समयीं बोलविले नारायणराव ॥ (चाल) ॥ दादांसि मिळोन असावें । रयतेला दुःख न द्यावें ॥ द्वैत केवळ न करावें । प्रीतीनें राज्य करावें ॥ पुणें गादी सांभाळुनि राहावें । माझ्या मोक्षपदचें वचन संभाळावें ॥ (चाल) ॥ आनंदीबाईला जवळ बोलाविलें । बया आह्मी जातों मोक्षपदाला तुह्मा कळविलें ॥ ओट्यांत नारायणराव तुमच्या घातला । बहु प्रकारें विनविलें आनंदीबाईला ॥ मग माधवरायानें प्राण सोडिला । कशी करुणा नव्हती भगवाना तुला॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ १ ॥

श्रीमंती राज्यामधिं पुण्याची महिमा कशी होती । जागजागीं अनुष्ठानें ब्राह्मणभोजनें होती ॥ तुपपोळी खायाला नव्हती ब्राह्मणांस निवंती[1] । कशा नालख्या पालख्या घरोघर फिरती ॥ स्वारी श्रीमंतांची नित्य पर्वतीला जाती । काय आरसेमहाल मजा दिसे वाड्याची ॥ सोन्याचा गणपती पूजा श्रीमंताची । बुधवारचा वाडा मसलत पंचाइतीची ॥ कारंजेवाडा सदर नाना भाऊची ॥ (चाल)॥ काय बैठक रावसाहेबाची । पानविडे मजा

---

१ न्यूनता.

खायाची ॥ लोक येतात मुजऱ्याशी । कारंजे लाविलीं बाड्यांत पाण्याचीं ॥ जुना वाडा बांधला बुरुज लढायाशी ॥ (चाल) ॥ नळाला काम लाविलें, हुकूम झाला । पुढें कोट बांधणार होते शहर पुण्याला ॥ पण करुणा नाहीं आली भगवाना तुला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ २ ॥

माधवराव मोक्षपदाशी गेला । चिंता पडली नाना-फडनविसाला ॥ नारायण महाराज नेले साताऱ्याशी । शाहूरायाच्या तक्तापाशी ॥ शिक्के कट्यार वस्त्रें दिलीं नारायणाशी । पुण्याची गादी मिळाली नारायणाशी ॥ आला वाजवीत चौघडा शहर पुण्याशी । कूच करुनि लौकर नेलें नाशकाशी ॥ दुसऱ्याची बुद्ध ऐकत निमित्याशी । मग येउनि जप्ती केली नारायणाशी ॥ (चाल) ॥ फार झाले बंदोबस्ती । घोड्याची गस्त हिंडती ॥ चौक्याची बंदोबस्ती । नारायण धरायासाठीं ॥ आनंदीबाईनें मांडिली हिकमती ॥ माझ्या राज्यपदाची माळ गंगाबाईला दिली कशी ॥ (चाल) ॥ पुढलें होणार जाणार ठाऊक कोणाला । होयाचें होऊन जाईल शब्द देवाला ॥ नारायणराव मुकले बाई प्राणाला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ ३ ॥

भाद्रपद तेरशी दिवस सोमवार त्या दिवशीं, दिवस चढला दोन प्रहर । सुमेरशिंग गारदी होऊन तयार ॥

त्या आनंदीबाईनें बोलाविला कचेरीवर ॥ आनंदीबाई बोले सुमेरसिंगाला । तुला भाऊ ह्मणोन माझा मीं मानिला ॥ जर खरें सांगशील मला आनंदीबाईला । हें पुणें शहर अर्धें देईन तुला ॥ बेल भंडार तुळशीपत्र इमान तुला न मला । दोघांची क्रिया झाली बेलबागाला ॥ राजपद कोणाला दिलें सांग आम्हांला । मग सुमेरशिंग गारदी बोले बाईला ॥ राजपद दिलें आई दादांनीं नारायणाला ॥ (चाल) ॥ आंग टाकिती धरणीला ॥ तोडी कुरळ्या केंसाला ॥ राज्याचा नाश माझ्या केला ॥ शिव्या देती राघोबादादाला ॥ (चाल) ॥ माझा हुकूम जाउनि सांग माझ्या नवऱ्याला । नारायण धरुनि आण माझ्या कचेरीला ॥ नाहीं तर कुंकू पुशितें मी आपल्या सदरेला ॥ अपवात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दृक्ख० ॥ ४ ॥

सुमेरशिंग गारदी होउनि तयार । मला हजरी दे आनंदीबाई म्हणुनि लावी कट्यार ॥ मग शिरला आरसेमहालांत उपसुनी तलवार । हजार गारदी शिपायी बरोबर ॥ हातीं नागव्या तलवारी हातांमधिं भाले । त्यांनीं आरसेमहाल वेढीला चौफेर ॥ केसरी भात जेवले होते नारायण । ह्या राजवाड्यामधिं झालें निद्राशयन ॥ (चाल) ॥ झाली गर्दी एकच हल्ला । पर्वती आई गेली स्वमाला ॥ उठ नारायण आतां तुझा घात आला । राव स्वमीं जागा झाला ॥ उठोनि उभा राहिला । राजपुत्र

थरथरां कांपला ॥ पाणी आलें त्याच्या नेत्रांला । राजपद भोंवलें मला ॥ नऊ महिने नाहीं भोगलें पुरतें राज्याला । डोळाभर नाहीं पाहिलें अस्तूरीला ॥ आनंदीबाईनें आतांच घात मांडिला । आईबाप नाहीं जवळ सोडवायाला ॥ नानाफडनवीस नाहीं पुण्याचे सदरेला । नारायण पळों लागला, आसरा नाहीं लपायाला ॥ गाय होती देवपूजेला । गाईच्या आड लपला मिठी गाईच्या गळ्याला ॥ गाईबाई प्राण वांचव आपुला । गाय हंबरती खाशाला ॥ पाणी गाईच्या डोळ्याला । सुमेरशिंग उभा राहिला तोडायाला ॥ गाईला वार लागला आसरा गायीचा सोडिवला । नारायण पळों लागला ॥ हिंडोन सारा वाडा भयाभीत झाला । थरथरांच कांपत राघोबादादापाशीं गेला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ ५ ॥

जिथून पळाले राव सुमेरशिंग मागें । बरोबर घेऊनि गारदी केला लाग ॥ शोध करित पुढें चालले लावला थांग । ह्मणे इथून पळाले राव, आनंदीबाई सुमेरशिंगाला सांगे ॥ मग गेले दादापाशीं सोडा राग । मला द्यावें जीवदान टाकावें मागें ॥ (चाल) ॥ डोकी घातली पोटांत ॥ मिठी मारितो गळ्यांत ॥ राजपद नको मला इथें ॥ माझ्या प्राणाचा होइल घात ॥ आनंदीबाईचें चुलतीचें ऐकूं नको ॥ भट ब्राह्मण मला ह्मणतात ॥ मी

कोरेंण[1] भिक्षा मागत जातों काशी तीर्थांत ॥ माझी गंगा- तिरीं अस्तुरी द्या माझ्या संगत ॥ दादासाहेब पुरवा माझा मनोरथ ॥ आली माया हृदयांत ॥ दादासाहेब बोले सुमेरशिंगास नको करूं मुलाचा घात ॥ (चाल) ॥ माझ्या वडील भावाचा लेक ॥ राज्याला एकुलता एक ॥ शिर ठेविलें रायाचे हातीं वांचवा याला ॥ पुढें सुमेरशिंग गारदी दादासाहेबास बोलता झाला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ ६ ॥

अन्न पाणी लागेना गोड चैन पडेना आनंदीबाईला ॥ बारावर एक वाजला बाई घंटा झाला ॥ कां अजून सु- मेरशिंग येइना सांगायाला ॥ मग सुमेरशिंग गारदी ज- वळ बोलविला ॥ काय हुकूम दिला दादांनीं सांग मेल्या मला ॥ मग सुमेरशिंग गारदी बोले बाईला ॥ दादासाहेब हुकूम देईनात मला नारायण धरायाला ॥ किती शिकवूं ह्या मेल्याला बाई शिपुड्यांला ॥ (चाल) ॥ तीरुपयाच्या चाकराला । काय पुढलें होणार ठाऊक नाहीं ह्याला ॥ राजपद दिलें दादांनीं नारायणाला ॥ सर्पाच्या पाठीवर मेल्या तूं पाय दिला ॥ पुढें घात तुझ्या जीवाला ॥ तुझीं लेकरेंबाळें पुढें विकील ढाणकाला ॥ (चाल) ॥ होयाचें होऊं दे जीवें मार दोघांला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ ७ ॥

---

१ कोरान्न.

सुमेरशिंग गारदी बोले दादाशीं ॥ यामुळें आपला प्राण तुह्मी त्यजितां ॥ पुढें आमचीं मनुष्यें कशीं घाण्यामधें गाळवितां ॥ दादांनीं हात काढिला मग झाला परता ॥ तुळाराम परदेशी नारायणाला झाला ओढिता ॥ वैऱ्यानें हात टाकिला खांद्यावरता ॥ (चाल) ॥ झाली मुक्त एकच घाई ॥ रक्त वस्त्रें भिजली बाही ॥ रक्ताचे पुर वाही ॥ एक शकल झालं दुठायीं ॥ मधें जानव्याचे हाल झाले कांहीं ॥ कढी भात पडला ठायीं ॥ चकचकती सगळी शाही हाणून घेती उरावरी ॥ नारोबा नाईक पुरा झाला ॥ जखमा लागल्या विश्वराम ढेऱ्याला ॥ पर करुणा नाहीं आली भगवाना तुला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ ८ ॥

नारायण महाराज मोक्षपदाशीं गेला ॥ काय अंधार पडला पुणेंशहराला ॥ वाणीणी ब्राह्मणी शिंपिणी सोनारणी एकच कहर झाला ॥ काय राजपुत्र बाई गेला आईबाप नव्हते त्याला ॥ विधवापण आलं गंगाबाईला ॥ ब्राह्मण करिती हाय हाय, मोकली धाय, काय पंढरीराया विष्णुभक्त नेला ॥ मग आनंद आनंदीबाईला झाला ॥ सखा पुतण्या तिनें मारिला ॥ नानाफडनवीस नव्हते त्या वक्तीं पुण्याचे सदरेला ॥ ते गेले मेणवलीला आपुले गांवाला ॥ आबासाहेब पुरंदरकिल्लेवाला ॥ नित्य मेजवानी करी नानासाहेबाला ॥ तुह्मीं यावें सास्वडाला

राव भोजनाला ॥ पटवर्धनमहाराज सांगलीवाला ॥ श्री- मंताचा सोयरा भला काय वाजू श्रीमंताला ॥ मानकरी लोक जमले सास्वडीं भोजनाला ॥ सोन्याचीं केळीपत्रें आणिलीं भोजनाला ॥ बहु नाजुक स्वैपाक ब्राह्मणी वि- चार झाला ॥ रांगोळ्या टाका आतां बसा भोजनाला ॥ सोन्याचीं पात्रें मांडलीं भोजनाला ॥ पांच शाखा वा- ढल्या आतां तुपपोळीचा वखत आला ॥ जसा पिंगळा गिजबिजला नाना शब्द बोले लोकांला ॥ तुह्मीं मेज- वानी केली आह्माला ॥ पर करमत नाहीं आमच्या दि- लाला ॥ हुरहुर वारा सुटला नानाफडनविसाला ॥ कांहीं तरी दगा असेल पुण्यांत श्रीमंतांला ॥ तीन शब्द बो- लला नाना उगीच बसला ॥ पुण्याचें पत्र आलें सास्व- डाला ॥ सोंवळे ब्राह्मण उठा नाना भोजनाला ॥ नाना- फडनवीस बोले सर्व ब्राह्मणांला ॥ श्रीमंतांचें पत्र आलें आपुल्याला ॥ लाखोटा वाचूं मग बसूं भोजनाला ॥ लाखोटा फुटला पाणी आलें डोळ्यांला ॥ हिरा कंकण माणीक मोतीं नारायण गेला ॥ आनंदीबाईनें मोठा घात केला ॥ विनाशबुद्धी आली मला नानाला ॥ मी गेलों मेण- वलीला आपुले गांवाला ॥ ह्मणूनिं नारायण मोक्षपदाला गेला ॥ जिथलीं पात्रें तिथल्या ठिकाणाला ॥ सोंवळे ब्रा- ह्मण ओवळें मिळालें त्यांला ॥ दोरोजांचा उपवास नाना- फडनवीसाला ॥ नाहीं मिळालं फराळाला शूर मर्दाला ॥

अबलक पंचकल्याणी घोडा नानाला बसायाला ॥ घोडचवडीखालीं नाना पुण्याला आला ॥ तुह्मी उघडा दरवाजे पाहूंद्या राजश्रीला ॥ दोन शकलें दोन बाजुला विश्वराम ढेरे पडले उजव्या बाजूला ॥ येथें उपाय चालेना आपला ॥ राजा मोक्षपदाला गेला ॥ आनंदीबाईनें बरा घात केला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ ९ ॥

पटवर्धन महाराज बोले नानाफडनवीसाला ॥ होयाचें होऊन गेलें शब्द देवाला ॥ याची नाशवंत काया येईना कामाला ॥ धनी जाऊंद्या मोक्षपदाला ओंकारेश्वराला ॥ नानाफडनवीस बोले पटवर्धनराजाला ॥ कसें जाळूं मी एकल्या नारायणाला ॥ वाघाचे संगतीनें कसें मारावें परदेशाला ॥ पटवर्धनमहाराज बोले नानाफडनवीसाला ॥ ठक कोल्हा परदेशी येईना आपुल्या हाताला ॥ वाघनख ह्याच्या बोटाला पांच हत्यारें डाभाला ॥ हजार माणूस जिमतीला ॥ सात माणसें मारलीं खून चढला परदेशाला ॥ तो अधिक जखमी करील कईकांला ॥ अफीणीचा खाणेवाला ॥ जरा ब्राह्मणी कावा हिकमत करतों मी ह्याला ॥ नानाफडनवीस जाऊन बसले तिसऱ्या मजल्याला ॥ मग कचेरी शोभे पटवर्धन राजाला ॥ त्यानें सुमेरशिंग परदेशी जवळ बोलाविला ॥ त्याचे शिरीं हात ठेविला ॥ भलें मारलें नारायणाला ॥ राजपद मिळतें तुला ॥ दोघे मिळून चल जाऊं आनंदीचे भेटीला ॥ वाघनख ठेव धरणीला ॥ हत्यारें लाव

जा आपुल्या ढेलजाला ॥ माझा अबलक घोडा तुला बसायाला ॥ दोघे मिळून चालले आनंदीचे भेटीला ॥ पटवर्धन महाराज उजव्या बाजूला ॥ नानाफडनवीस होते तिसऱ्या मजल्याला ॥ त्यांनीं शेल्याचा पदर हलविला ॥ त्यानें हुकूम केला सरदार लोकांला ॥ काय पहातां दादाहो तुमचा बाप चालिला ॥ एक ह्मणतां हजार गर्दी त्याला ॥ नानाफडनवीस बोले सरदार लोकांला ॥ एके घायें मारूं नका परदेशाला ॥ हातापाया पलिते लावा जरा जाळा त्याला ॥ एक ह्मणतां हजार गर्दी त्याला ॥ बोटीं बोटीं पाडले तुकडे परदेशी नाहीं आला वांट्याला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ १० ॥

पटवर्धनमहाराज बोले नानाफडनवीसाला ॥ तीन रोज मुर्दा राहिला अझुनि कांहीं हेतु नाहीं पुरला ॥ नाना-फडनवीस बोले राघोबा दादाला ॥ आनंदीबाईनें राज्या-चा नाश केला ॥ सख्या पुतण्याचा वध केला ॥ किल्ल्या-वर चढवा आनंदीबाईला ॥ तिन वर्षांची जुन्या नाच-णीची भाकर हिला खायाला ॥ पावशेर मीठ पीठ दळा-याला ॥ पावशेर पाणी द्यावें तोलून प्यायाला ॥ अनवाणी पायीं धाडावी गडकिल्ल्याला ॥ सुकुमार बाईची काया फोड पायाला ॥ त्या अर्ध्या किल्ल्याच्या वाटेनें बाईचा प्राण गेला ॥ घारी गिधडाला सुकाळ झाला ॥ नाहीं

मोक्षपद मिळालें आनंदीबाईला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ ११ ॥

नानासाहेब बोले सर्वत्र लोकांला ॥ हुकूम मागा गंगाबाईला ॥ धनी येऊंद्या मोक्षपदाला आंघोळीला ॥ गंगाबाई करी रोदन हरपलें रत्न ॥ गाईनें वत्स गिळलं देवा धन्य ॥ टाकोनि हत्ती घोडे गोधन ॥ नाहीं हौस पुरली गेले नारायण ॥ (चाल) ॥ मनीं हौस होती फार ॥ पुणें शहर करीन गुलजार ॥ वाणी उदमी दुकानदार ॥ नारायणपेठ तयार ॥ कोठें ऐकत होता ईश्वर ॥ काय राजवाड्यामधिं पडला अंधार ॥ आंग धरणीला टाकीती ॥ कुरळे केंसाला तोडिती तुमचे संग निघतें सती ॥ दोघे मिळोन चला जाऊं ओंकारेश्वरापाशीं ॥ आया मावल्या समजावती गंगुबाईशीं ॥ नको रडूं बाई दुःख आहे सर्वत्रांशीं ॥ नानाफडनवीस बोले गंगाबाईशीं ॥ सती निघायाचा हुकूम मिळेना बाई तुशीं ॥ तुझ्या देहाची झडती दे मला नानाशीं ॥ गंगाबाई बोले आयाबायाशीं ॥ कशी मी निघों बाई सती पांचा महिन्यांची मी गर्भवती ॥ नानाफडनवीस समजावितो गंगूबाईशीं ॥ नको रडूं बाई धोका बसेल तुझ्या गर्भाशीं ॥ कन्या का पुत्र होईल बाई तुशीं ॥ मी गुप्तराज्य चालवीन अक्कल आहे मज नानाशीं ॥ अशी समजाविली बहुत नानापरी ॥ पन्नास बायका दिल्या संग गर्व्हारीणी ॥ कांहीं वाणिणी ब्राह्मणी शिंपिणी

सोनारणी ॥ ( चाल ) ॥ तुह्मीं राहावें पुरंदराला ॥ बाईचा गर्भ वाढवायाला ॥ सगळ्यामधिं एकच दाई त्यांना ॥ गंगाबाई ह्मणे नानाला ॥ धनी जाऊंद्या मोक्षपदाला ॥ मग जाईन मी पुरंदराला वनवासाला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ १२ ॥

नानाफडनवीसानें हुकूम केला धनी माडींतला काढिला ॥ माणीकचौकांत आंबोळीला आटोकाट ब्राह्मण तिथें जमा झाला ॥ ते आले होते पर्वतीच्या दक्षिणेला ॥ मग मिळाले ब्राह्मण गणित नाहीं त्याला ॥ नानाफडनवीस बोले उपाध्ये भटाला ॥ दोन शकलें दोन बाजूंला ॥ तुह्मी काढा सोवळं बांधा राजश्रीला ॥ पाणी ठेवलं आंबोळीला ॥ सगळा अलंकार चढविला ॥ मोत्याचा तुरा लाविला ॥ दोन हुजरे दोन बाजूंला ॥ खासा मिरवायाला लागला ॥ मग गंगाबाई हांक मारी राजश्रीला ॥ काय द्वारका सोडुनी कृष्ण निघाला ॥ नळानें टाकिलं दमयंतीला ॥ भोळा शंकर होता पार्वतीला ॥ हरिश्चंद्र होता तारामतीला ॥ रामचंद्रानें मोकलिलें सिताबाईला ॥ असा वनवास श्रीभगवंतानें आमच्या शिरीं दिला ॥ मग पुकार कळली पुणेंशहराला ॥ गर्भार बाया चालल्या पाहायाला ॥ लेंकुरवाळ्या बाळें घेतलीं कडेला ॥ जागा मिळेना उभें राहायाला ॥ महाराज ओंकारेश्वरावर

नेला ॥ (चाल) ॥ राव काढले मध्यान्हरात्रीं दिधला अग्न ॥ खंडीभर लांकडें आठ मण चंदन ॥ सरण दिलं चेतवून ॥ चार वेढे हिंडली गाय पांचव्या वेढ्यानें गाईनें प्राण दिला सरणावर ॥ आले तुळाजी खिजमतगार ॥ चापाजी टिळेकर ॥ त्यांचे हुजरे मंडळी चाकर ॥ चालूनि आले सरणावर ॥ आह्मी सरकारचे चाकर ॥ याचें निमक खाल्लें फार ॥ पुढें वांचूं नये विचार ॥ उड्या टाकिती सरणावर ॥ जळून गेले चौघेजण ॥ गाय गेली जळून खाशावर ॥ हीं ऋणानुबंधाचीं कामें ॥ चौघें गेलीं वैकुंठीं चालून ॥ तेथून त्याचा न्याय केला कोणी ॥ येथूनि वर्तमान सर्व झालें ॥ लहिरी मुकुंदाकवी बोले ॥ झाला दादाचा बोल मला नारायण मोक्षपदाला गेला ॥ अपघात करुनि मारला सख्या पुतण्याला ॥ दक्खनचा० ॥ १३ ॥

---

## ८. सवाई माधवरावाचें जन्म,

### यावर पोवाडा.

नारायणरावांस मारल्यावर त्यांची पत्नी गंगाबाई ही गरोदर होती, ह्मणून तिला मुत्सद्दी मंडळींनीं पुरंदर किल्ल्यावर ठेविलें. तेथें ती ता. १६ एप्रिल १७७४ रोजीं प्रसूत होऊन मुलगा झाला. तोच सवाई माधवराव. याचे जन्माचें व बाळपणाचें वर्णन या पोवाड्यांत आहे.

हा खंडू संतू नांवाच्या कवीनें केला असून आह्मांस एका गोंध-ळ्याकडून मिळाला.

चाल—भरजरी पैठणचें पातळ लफा घे टाचांची खबर ।

—अनंतफंदी.

सवाई माधवराव पेशवे सवाई चढती राज्याला । परशु-राम अवतार पुरंदरीं ज्यांचा जन्म झाला ॥ ध्रुपद ॥

सप्तद्वीप नवखंड पृथ्वी दहावा खंड ऐका काशी । भरतखंडामधिं एक जंबूद्वीप आहे दक्षिणदेशीं ॥ साडेसहा सुभे राज्य दक्षणचें आहे शाहुमहाराजाशीं । देशोदे-शिंच्या खंडण्या धाडुन देती पुंडमवासी ॥ केवढा दर्प थर-थर कांपे मोठी धासत वैऱ्याला । देशोदेशिंचे वकिल ह-मेशा पडले शहरपुण्याला ॥ सवाई० ॥ १ ॥

मध्यान्हीं इंदुवार[1] सप्तमी सोळाच घटका समयाला ॥ देशोदेशीं साखरा वांटिल्या आनंद झाला सृष्टीला ॥ सु-टति तोफा एक कडाका गणीत नाहीं वाद्यांला । सडे घालती उत्तम आंगणीं सर्व मिळुनि त्या समयाला ॥ सवाई० ॥ २ ॥

मौंजीबंधन[2] लग्न[3] रायाचें खूप रायाचें झालें घणघोर ।

---

१ शके १६९६ अधिक वैशाख शुद्ध ७ ह्मणजे ता. १८ एप्रिल १७७४ रोजीं जन्म झाला. २ सन १७७९ त सवाई माधवरावांचा व्रतबंध झाला. ३ सन १७८२ त लग्न झालें. या दोनही प्रसंगांचें वर्णन पेशव्यांचे बखरींत उत्तम केलें आहे.

आरशाचे मंडप रेखिले चित्रशाळा अपार ॥ जरी बादले खांब चांदवे सोगा झाला चौफेर । तक्त रायाचें पुढें चालतें रथ हत्तीचा बिनीवर ॥ दोही रस्त्यानें चिरकदानी इंद्रसभेचा दाखला । चतुराई नानाची कुठवर उपमा द्यावी तयाला ॥ सवाई० ॥ ३ ॥

आणले भोंसले मोंगल महाराज छत्रपती । शाण्णव कुळींचे भूप मिळाले सांगाया झाल्या कृती ॥ महादेव बोलला सवाई शास्त्र चढले वेदाला । खंडू संतू ह्मणे पुण्यामधिं पोवाडा हा त्यानें केला ॥ सवाई० ॥ ४ ॥

---

## ९. पेशव्यांनीं बदामी किल्ल्यावर मोहिम केली, यावर पोवाडा.

सन १७८६ त टिपू सुलतानाबरोबर पेशव्यांचा विघाड होऊन ही मोहिम झाली. तींत नानाफडनवीस व हरिपंत फडके स्वतः गेले होते. एक वर्षानें किल्ला सर केला. नंतर बदामी, कित्तूर, नरगुंद वगैरे प्रांत व शिवाय ४० लक्ष रुपये टिपूकडून घेऊन पेशव्यांनें सैन्य परतलें. याचें वर्णन या पोवाड्यांत आहे.

या पोवाड्याचा कर्ता राघु नांवाचा मंगळवेढ्यास राहाणारा कवि होता. हा पोवाडा आह्मांस एका गोंधळ्यानें दिला.

चाल—अहो सख्या जिवलगा काय अंतर पडलें सांगा ।
मी दासी तुमची मजला मागा ॥

शिपाई थाट रोहिले जाट गांठ न पडलि हैदऱ्याची । खबर ऐका बदामीची ॥ ध्रुपद ॥

नाना फडनवीस म्हणती भाऊला तुह्मी मोर्चाला खबरदार । गोळे सुटती तुटती तार ॥ रणमंडळ तोफेचे बळ कडक बिजली करिती मार । घाबरें होतें लष्कर ॥ किल्ल्यांत फिरंगी रोहिला जंगी मारितो रंग रेकल्याचा । तळ्याकडे मोर्चा भोंसल्याचा ॥ आंत कानडा लोक फाकडा शिपाई सडे तलवार । नेमिले चार हजार ॥ तळ्याच्या तिरीं भोंसला शिरी श्रीमंत बिनीवर । मोंगलाचें लष्कर ॥ बसूनियां हंबीर करिती विचार हल्ला करा एकदाची । खबर ऐका बदामीची ॥ १ ॥

किल्ल्याचें आंग भिडानि फिरंग भार हा पळतो कानड्याचा । मुजरा पाहती किल्ल्याचा ॥ पाटणकर दंग वाजे मृदंग मांडला रंग गोळा सुटला तोफेचा । ठाय उडविला नायकिणीचा ॥ किल्ल्यांत फिरंगी रोहिला जंगी मारितो रंग रेकल्याचा । तळ्याकडे मोर्चा भोंसल्याचा ॥ किल्ला भेसूर शिंदे होळकर लष्कर दूर फौज त्यांची । तीन हजार सुटतो जंबूर आग ना वरस किल्ल्याची । खबर ऐका बदामीची ॥ २ ॥

पहांटेच्या प्रहरीं दीन शनिवारीं करुनि तयारी नानानें हल्ला नेमिला । खबर परशुरामभाऊला पाठविली ॥ भाऊचे घोडे सड बेधड गारदी पुढें बिनी धरली । हरिपंताची फौज उठली ॥ धोशा मोगल मुधोजी भोंसले

---

१ परशुरामपंतभाऊ पटवर्धन.

चिमण रायाची शाही हलली । धाडग्यानें कोर धरली ॥ तीन हजार सुटतो जंबूर आगना वर्स किल्ल्याची । जाट रोहिले नीट तोफेची गाठ गाठ न पडली हैद्र्याची । खबर ऐका बदामीची ॥ ३ ॥

सडक सरदार भडकती वीर भूमि भूमिकार गर्जिले । हस्ती तोंडावर दीधले ॥ भाऊसहित दरवाज्यांत दारूचे बुधले चेतले । सातशें शिपाई उडाले ॥ लोक भाऊचे परशुरामाचे मोठे नेमाचे झेंडे हालले । झोर जरीपटका चाले ॥ भोंसला भारी करुनि तयारी निशाण आलें अवचित । जरी पटक्यानें केली मात ॥ रण तुंबळ घुमतें घायाळ गणतीं नाहीं मुड्याची । खबर ऐका बदामीची ॥ ४ ॥

शिपाई धडाधड झाले ठार लढले दोन प्रहर हल्ला शिरला वाड्यांत । भाऊसहित हरीपंत ॥ करा तलवार कापावें शहर मुलांमाणसांसहित । सातशें मुडदा गणित ॥ धरलें शहर रोहिले नेऊनि घातले बंदांत । बातमी कळली किल्ल्यांत ॥ किल्ल्याचा धनी प्याला हिरकणी आली बातमी गोष्ट ही तिसरे प्रहराची ॥ खबर ऐका बदामीची ॥ ५ ॥

सवाईमाधवराव धन्याचें नांव बावीस उमराव तीन लाख लष्कर । घेतलें बदामी शहर ॥ गणित प्रहराचें सवा प्रहराचें रंजक झडली ती प्रहराची । लूट पैक्याची आ-

णिक दिंडाची ॥ सरस बासन वजनदार पाहुणे मेले बहुत फार । रणतुंबळ घुमतें घायाळ तुडवणी झाली परगण्याची । खबर ऐका बदामीची ॥ ६ ॥

गेले किल्ल्यांत झाले यशवंत वर जरीपटका लाविला । कागद पुण्याला गेला ॥ धनी श्रीमंत बसुनी एकांत धन्यानीं कागद वाचिला । जखमा चौहजाराला ॥ नऊशें स्वार झाले ठार ठाणें द्यावें [1]रास्त्याला । आवाज तोफेचा केला ॥ राघुकवि दया असूं द्यावी पोवाडा थोडासा केला । आमचें राहणें मुंगवड्याला ॥ आह्मी ह्मेमान पेठचे राहणार । आमची मिरास वाईची ॥ खबर ऐका बदामीची ॥ ७ ॥

---

## १०. सवाई माधवराव पेशवे रंग खेळले, यावर पोवाडा.

पूर्वी पेशवाईंत शिमग्याचे रंगपंचमीस श्रीमंतांनीं आपल्या प्रजेबरोबर रंग खेळावा अशी चाल असे. हा रंग खेळण्यास रंगपंचमीस मोठी सरकारस्वारी निघत असे. त्याप्रमाणें ता. ११ मार्च स. १७९३ रोजीं खेळलेल्या रंगसमारंभाचें वर्णन या पोवाड्यांत आहे.

हा पोवाडा प्रभाकर कविकृत आहे.

---

१ हा किल्ला घेतल्यावर ह्याची व्यवस्था पाहण्याचें काम पेशव्यांनीं रास्त्यांकडे सोंपविलें होतें, व त्यांच्या देखरेखीखालीं त्या प्रदेशांतील शेतकरी सुखी व सपन्न झाले.

चाल—जय शिवलिंगा मस्तकीं गंगा पार्वतीला चोरून ठेविलें ।
ज्या गंगेनें जग उद्धरलें त्रैलोक्यामधिं नाणवलें ॥

—सगनभाऊ,

चाल दुसरी—भरजरी पैठणचें पातळ लफा घे टार्चांची खबर ।—अनंतफंदी.

जसा रंग श्रीरंग खेळले वृंदावनिं द्वापारांत । तसा रंग श्रीमंत खेळले कलियुगांत अति आदरांत ॥ ध्रु० ॥ धन्य धन्य धनि सवाई माधवराव प्रतापी अवतरले । कीर्ति दिगंतरीं करुनि कुळामधिं सर्व पुरुष पहा उद्धरले ॥ एकाहुनि एक मंत्रि धुरंधर बुद्धिबळें शहाणे ठरले । दौलतिचा उत्कर्ष दिसंदिस नाहीं दरिद्री कुणी उरले ॥ शालिवाहन शक नर्मदेपावत जाऊनि जळीं घोडे विरले । देति[1] मग कारभार श्रीमंतांशीं शरण आले नृप पृथिवीवरले ॥ ( चाल ) ॥ महावीर महादजी बावा हुजरातीचे । [2]करुनि मराठी पोषाक खुप जरतारीचे । नित्य नवे महोत्साह होती खुप गजरातीचे ॥ ( चाल पहिली ) ॥ तऱ्हेतऱ्हेचे ख्याल तमाशे नित्य होती दरबारांत । श्रीमंतांचा संकल्प असा कीं रंग करावा शहरांत ॥ जसा० ॥ १ ॥

कल पाहुन मर्जीचा बरोबर रुकार पडला साऱ्यांचा । सिद्ध झाले संपूर्ण पुण्यामधिं बेत अधिक कारभाऱ्यांचा ॥ पुढें मुख्य अंबारि झळाळे मागें थाट अंबाऱ्यांचा । चंद्रबिंब श्रीमंत सभोंता प्रकाश पडला ताऱ्यांचा ॥ हौदापुढें

---

१ " श्रीमंतांस करभार देउन आले शरण रिपु पृथिवीवरले " पा०. २ " आणुनि मरातब बाच्छाई वजिरातीचे " पा०.

आणि पायदळांतरीं पाउस पडे पिचकाऱ्यांचा। धुमाधार अनिवार मार भर बंबांच्या फटकाऱ्यांचा ॥ ( चाल ) ॥ नरवीर जसे कांहिं केवळ कृष्ण अर्जुन। बोलति भाट यश कीर्ति सकल वर्णुन। चालली स्वारी शनवारपेठ वर्जुन ॥ ( चाल पहिली ) ॥ नारि घरोघर झुरझुरक्यांतुन सजुन उभ्या शृंगारांत। गुलाल जरदा पल्ले दुतर्फा रंग रिचविति बहरांत ॥ जसा० ॥ २ ॥

सलाम मुजरे सर्व राहिले राव रंगाच्या छंदांत। हास्य-वदन मन सदय शोभलें शूर शिपाई वृंदांत ॥ दोहोंदोहों हातीं मुठी भरी गुलाल दिलें छत दिसे लाल खुप बुंदांत। तक्त रावे झिल पेंच नाचती सगुणनार आनंदांत ॥ सु-दिन दिवस तो प्रथम दिवसाहुन शके सत्राशें चवदांत। परिधावी संवत्सरांत फाल्गुन वद्य चैतुर्दशी धारांत ॥ (चाल) ॥ बाळाजि जनार्दन रंगामधिं रंगले। रंगाचे पाट रस्त्यांनिं वाहूं लागले। कितिएक भराविले गुलालानें चौक बंगले ॥ (चाल पहिली) ॥ सगुण गुणी जन्मले कुळदीपक महादजी बावा हुजऱ्यांत। तलवार बहादुर शूर शिपाई मुकुटमणी सरदारांत ॥ जसा० ॥ ३ ॥

गोंडे भरुनि रंगाचे सजुनि सर्व निघाले स्वारींत। गुलाल गोटे शिवाय ठेविले निरनिराळे अंबारींत ॥ आप्पा

---

१ म्हणजे ता० ११ मार्च सन १७९३ इ. २ "पराक्रमी तर आली बहा-दर" पा०. ३ 'मोत गोण रणगाडे गुलालें भरुन चालली स्वारींत' पा०.

चळवंतराव मेहेंदळे चौरि वारीत भिजाशींत । लाल कु-सुंबी रुमाल उडती घडोघडी मेहेरपगारींत ॥ कोतरा नद् कोतवाल वाटला मग ते मस्तकीं लकारींत । बालम बाण बोथाटया हटे लगी वाद्य घोष डमदारींत ॥ (चाल) ॥ भले भले घोडे खंदामधें घालिती । बारगीर बिनीवर ध्वज रक्षित चालती । संपूर्ण भिजाविले जन रंगाखालतीं ॥ (चाल पहिली) ॥ वेत्रपाणि वारिती तरी झालि गर्दी बहू बुधवारांत । झुकत झुकत समुदाय चालती स्वारि आली रविवारांत ॥ जसा० ॥ ४ ॥

आधिंच पुणें गुलजार तशामधिं अपूर्व वसला आदि-तवार । त्यांत कृष्ण श्रीमंत अवतार [1]यादव मिळाले दळ-भार ॥ हरिपंत तात्यानें उडविला रंग केशरी अनि-वार । [2]हास्यवदन राजेंद्र मुखावरि शेला लाविती वारं-वार ॥ पाटील बोवानें शिबिरा नेउनि रंग केला जोरा-वर । वस्त्र आणि किनखाप वांटिती ठाण कुणाला गज वार ॥ (चाल) ॥ उलटली स्वारी मग मेहताबा लाउनी । [3]नजराणे येति मग वाड्यामधें घेउनी । दाखवी पवाडा गंगु हैबती गाउनी ॥ (चाल) ॥ महादेव गुणिराज फेंकितो तनन तान दरबारांत । प्रभाकराचें कवन फांकलें सहज समोंवती शहरांत ॥ जसा० ॥ ५ ॥

---

१ ‘ समस्त यादवपरिवार ’ पा०. २ ‘ हर्ष होउनि राजेंद्र झांकिती + + + वारंवार ’ पा०.३ ‘ सुरनिशा करिति जन वाड्यामधिं जाउनी ’ पा०.४ ‘ छंदी करितो वाड्यांत ’ पा०. ५ ‘ पसरलें सहज शतावधि शहरांत ’ पा०.

## ११. मोंगलांची व पेशव्यांची खर्डें मुक्कामीं लढाई झाली,

### यावर पोवाडा.

ही लढाई स० १७९५ मध्यें झाली. हिचें कारण असें कीं, चौथाई व सरदेशमुखी या हक्कांबद्दल निजामाकडेस मराठे सरकाराची बाकी फार तुंबली होती, ती पेशवे सरकारचा हैदराबादेंतील वकील निजामाजवळ मागूं लागला. तेव्हां त्याचा दिवाण मशीर उल्मुल्क यानें त्यास बराबर जबाब न देतां, पेशवे व नानाफडनवीस यांविषयीं कांहीं निंदास्पद व अप्रयोजक भाषण केलें. त्यावरून उभयपक्षीं चीड जाऊन लढाईची तयारी होऊं लागली. नानाफडनवीस स्वतः सवाई माधवरावांस बरोबर घेऊन या स्वारींत गेले होते. परशुरामभाऊ पटवर्धन यांस या लढाइमध्यें मुख्य सेनापति नेमिलें होतें, आणि दौलतराव शिंदे यांजकडेस फौजेच्या बिनीचें काम होतें. रघोजी भोंसले, दौलतराव शिंदे, तुकोजी होळकर, गोविंदराव गायकवाड, दक्षिणेंतील सरदार, तसेंच निंबाळकर, घाटगे, डफळे, पवार, थोरात, पाटणकर, आदिकरून जुने मानकरी, हे सर्व हुकूम जातांच मोठ्या उल्हासानें फौजा घेऊन या लढाईस आले. सर्व मराठे सरदार आणि लोक हे आपण एक राष्ट्र असें समजून या प्रसंगीं जसे एक झाले होते तसे ते पूर्वी व नंतर कधींच झाले नाहींत. ही लढाई पेशव्यांच्या आणि निजामाच्या सरहद्दीनजीक खर्डे मुक्कामीं होऊन त्यांत निजामाचा पराभव झाला. तेव्हां मराठ्यांस पुष्कळ पैसा व मुलूख देऊन आणि आपला दिवाण मशीर–उल्मुल्क, ज्यानें पेशव्यांची निंदा केली होती त्यास, त्यांच्या

स्वाधीन करून तह करणें त्यास प्राप्त झालें. या गोष्टीचें वर्णन या पोवाड्यांत केलें आहे.

हा पहिला पोवाडा प्रभाकर कविकृत आहे, तो आम्हीं वि० ज्ञा० वि० चे पु० १० पृ० ८४ वरून घेतला.

चाल—'वसंतीं बघुनि मेनकेला। गाधिज मुनिनें निजसुकृतावरि'—किर्लोस्कर.

**दैन्यदिवस आज सरले । सवाई माधवराव प्रतापी कलियुगांत अवतरले ॥ ध्रुपद ॥**

**भूभार सर्व हराया । युगायुगीं अवतार धरी हरी दानव संहाराया । कलियुगीं धर्म तराया । ब्राह्मणवंशीं जन्म घेतला रिपु निर्मूळ कराया ॥ सुकीर्ति मागें उराया । सौख्य दिलें सर्वांस अहारे सवाई माधवराया ॥ (चाल) ॥ धन्य धन्य नानाचें शहाणपण । बृहस्पति ते बनले आपण । गर्भीं प्रभुचें पाहुनि रोपण । तेव्हांच केला दुर्घट हा पण । आरंभिलें मग रक्षण शिंपण । सरदारांचें घालुनि कुंपण । आपल्या आंगीं ठेऊन निरूपण । हरिपंतांना करुनि रवाना ॥ (चाल) ॥ दादासाहेब मागें वळविले । लगट करुनि फौजांनीं मिळविले । आपुल्या राज्यापार पळविले । कांहीं दिवस दुःखांत आळविले । इतर कारणीं भले लोळविले । लोहोलंगर पायांत खिळविले । ठेऊन गडावर चणे दळविले । बंदिवान तेथेंच खपविले ॥ (चाल) ॥ बंड तोतया सहज मोडिला । एक एक त्याचा मंत्री फोडिला । जमाव ठायिंचे ठायिं तोडिला । अडचणजागीं मुख्य**

कोंडिला । शहराबाहेर नेउन झोडिला । जो नानांनीं पैसा जोडिला । तोच प्रसंगीं हुजुर ओढिला । लागेल तितकें द्रव्य पुरविलें ॥ ( चाल ) ॥ तळे[1]गांवावर इंग्रज हरला । इष्टुर[2]साहेब रणींच विरला । उरला इंग्रज घांट उतरला । सरमजाम गलबतांत भरला । रातोरात मुंबईंत शिरला । सर्वेच गॉडर[3] पुढेंच सरला । शिकस्त[4] खाउन तोही फिरला । फिरून पुण्याकडे कधीं पाहीना ॥ (चाल) ॥ अशी रिपूची मस्ती जिरविली । शुद्ध बुद्ध पहा त्याची हरली । कारभाऱ्यांनीं पाठ पुरविली । पुण्यामधें आमदानी करविली । पुरंदराहुन स्वारी फिरविली । पर्वतीस मग मुंजें ठरविली । गजराची भिक्षावळ मिरविली । [6]कौतूकर्णे वाजंत्री वाजती ॥ ( चाल ) ॥ लग्न[7]चिठ्या देशावर लिहिल्या । ब्राह्मणांस पालख्याश्व वहिल्या । पाठविल्या बोलाऊं पहिल्या । पठाण मोंगल साहित सहिल्या । छत्रपति रोहिले रोहिल्या । भोंसल्याच्या मौजा

---

१ सन १७७९ चे जानेवारीचे ६ वे तारखेस इंग्लिश लोकांची व पेशव्यांचे फौजेची येथें चकमक झडली. इंग्लिशांचा पराभव होऊन त्यांस वडगांव येथें तह करणें भाग पडलें. हें सैन्य मुंबई सरकारनें राघोबादादाचा पक्ष धरून पाठविलें होतें. २ कॅप्टन् स्टुअर्ट हा मुंबईचे सैन्याबरोबर होता. हा कारली या गांवीं तोफेचा गोळा लागून सन १७७९ चे जानेवारीचे ४ थे तारखेस मेला. ३ जनरल् गॉडार्ड् यास राघोबादादाचे मदतीस बंगाल्याहून पाठविलें होतें. त्यास सन १७८१ त मुंबईकडे पिछेहाट करावी लागली. ४ पराभव. ५ सवाई माधवरावांची मुंज शके १७०१ म्हणजे सन १७७९ सालीं झाली. ६ सनई व चौघडा. ७ माधवरावाचें प्रथम लग्न शके १७०४ म्हणजे सन १७८२ त झालें.

पाहिल्या । आणिक किती नांवनिशा राहिल्या । कवीश्वराची नजर पुरेना ॥ ( चाल ) ॥ आरशाचे मंडप सजविले । चित्रें काढून चौक उजविले । थयथयात जन सर्व रिझविले । गुलाब आणि अत्तरें भिजविले । शिष्टशिष्ट शेवटीं पुजविले । रुपये होन मोहरांनीं बुजविले । श्रीमंतकार्यार्थ देह झिजविले । यशस्वी झाली सकळ मंडळी ॥ ( चाल ) ॥ सत्राशें[1] सातांत बदामी । हल्लयाखालीं केलि रिकामी । एक एक मोहोरे नामी नामी । फार उडाले रणसंग्रामीं । बाजीपंत अण्णा ते कामीं । हरीपंत तात्याचे लगामीं । परशुरामपंत त्या मुक्कामीं । स्वामीसेवक बहुत जपले ॥ ( चाल ) ॥ गलीमास कांहीं नव्हते भेऊन । पराक्रमानें किल्ला घेऊन । अलिबक्षावर[2] निशाण ठेऊन । पुण्यास नानासहीत येऊन । श्रीमंतांनीं वाड्यामधें नेऊन । पंचामृतीं आनंदें जेऊन । बहुमानाचीं वस्त्रें देऊन । बोळविले तयांला ॥ (चाल) ॥ सत्राशें तेरावें वरीस । अवघड गेलें पहिल्यापरीस । करनाटकच्या[3] पहा स्वारीस । टोपीकर[4] मोंगल[5] पडले भरीस । तरी तो

१ सन १७८६ चे मे महिन्यांत. २ जरीपटक्याचे हत्तीचें नांव. ३ कर्नाटकावर स्वारी सन १७९० त झाली. तिकडे निकाल होण्यास दोन वर्षे लागलीं. ४ इंग्रजलोक. या स्वारींत हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल लॉर्ड कॉर्नवॉलिस यानें सैनाधिपत्य घेतलें होतें. ५ हैद्राबादवाले निजाम अल्लीचा दुसरा मुलगा शिकंदरशहा हा या स्वारींत होता.

टिपू येइना हारीस । त्यावरं तात्या[1] गेले परीस । आणुन टिपू खुब जेरीस । साधुनि मतलब हरिपंतांनीं ॥ ( चाल पहिली ) ॥ नंतर मार्गे फिरले । दरकुच येउन पुण्यास प्रभुचे चरण मस्तकीं धरिले ॥ दैन्य० ॥ १ ॥

केवढें भाग्य रायाचें । चहूंकडे सेवक यशस्वी होती हें पुण्य त्या पायांचें ॥ करितां स्मरण जयाचें । कांहीं तरि व्हावा लाभ असें बलवत्तर नाम जयाचें ॥ प्रधानपद मूळ याचें । सत्राशें चवदांत मिळालें वजीरपद[2] बाच्छायाचें ॥

---

१ प्रथमतः पेशवे यांजकडून परशुरामभाऊ पटवर्धन सैन्यावर मुखत्यार होते. बरेच दिवस झाले. तरी टिपू हटेना म्हणून हरीपंततात्या फडके यांस तिकडे रवाना केलें. ते ३०,००० लोक बरोबर घेऊन सन १७९१ चे प्रथम दिवशींच पुण्याहून निघाले. पुढें पेशवे, मोंगल व इंग्रज यांचे सैन्याशीं टिपूच्या दोन तीन लढाया झाल्या. त्यांत टिपूचा पराभव होऊन त्यास सन १७९२ त तह करावा लागला. नंतर हरिपंत पुण्यास आले.

२ दिल्लीचा बादशहा दुसरा शहा अलम यानें पेशव्यास " वकील ए मुतालिक " हा किताब सन १७८४ त दिला. तो तीन निरनिराळ्या वेळीं बहाल होऊन सन १७९३ त सवाई माधवराव यानें पुणें मुक्कामीं घेतला. यासंबधानें जी सनद पेशवे यांस आली ती फार्शी भाषेंत लिहिली आहे; ती व तिचें भाषांतर हीं इतिहासांतून नाहींत म्हणून देतों. " अमाइत बे अयालत मर्तबात हषमत बे षौकत मंजिलत जुबदय विफके षान दौलत खाह उमदय खेर अंदषाने बिला इषूतिबाह वसीरुल इक्तिदार अकिदत दिसार सईफे मसलुले मैदान षुजात रुमदे मसकुले मिजमार जलादत मदार असनाफे अवताफ मोहब्बत अन्वाये अलताफ मवरदे इनायत जिळे मषमूल अवातिफे जमिलू वकीले मुल्क अमिरुल उमरा मुखताळ्ळ मुमालिक मदारुल मोहम सलतनत उमदय आराकिने खिलाफत

( चाल कटाव ) ॥ मुगुटमणी ते पाटिलबावा । कोठवर त्याचा प्रताप गावा । दर्शनमात्रें तापच जावा । नवस नवासितां फळास यावा । हरहमेशा शत्रुसिं दावा । माहित सगळा मराठी कावा । हुशार फौजा लढाई लावा । जिंकून हिंदुस्थान परतले ॥ (चाल) ॥ चवदा वर्षें बहुत भागले । ह्मणून शिरस्ते पाहुन मागले । तरतुदीस कारभारी लागले । उंच उंच पोषाग चांगले । देउन फार मर्जीनें वाग-

---

यार वफादार सिद्द्ह शिलार सआदतमंद बजान् पयवंद फरद्ंदे खासुलखास मेळाजदेह महाराजाधिराज पंडित परधान सवाई माधवराव नारायण बहादूर फिद्विये शहाआलम पादषाहे गाजी. " याचें भाषांतर—" मानकरीपणा व संपत्ति यांचे अधिकारी, सेना व संपत्ति यांचें स्थान, मित्रतेचे चिन्हानें चिन्हितांतील केवळ सार, राज्याभीष्टचिंतक, निःसंशयपणें कल्याण इच्छकांतील अत्युत्तम, विश्वासवृद्धिकारक, भरंवशाचें चिन्ह आहे ज्यांस, रणभूमीवर केवळ नग्न तलवार, रणकंदनांतील महाशूरत्वाचे केवळ तीक्ष्ण धारेचा भालाच, महाश्रेष्ठ, परमविश्वासू, स्नेहभावाचे सुलक्षणाचा आसमंतात् भाग, नानाप्रकारचें कृपापात्र, सर्व कृपा उतरण्याचें स्थान, कृपेचे छायेनें वेष्टित, अति सर्वोत्तम, देशसंबंधीं स्वतंत्रपणें काम चालविणार, सर्व अमीरांचे अमीर, सर्व देशाचा स्वसत्तात्मकपणें कारभार चालविणारे, दौलतीचे सर्व कामाचा भरंवसा आहे ज्यांवर, राज्याधाराचे केवळ स्तंभच अशा सर्व कारभारीमंडळांतील अति सर्वोत्तम, स्नेहभाव सिद्धीस नेणारा सुमित्र, सेनापति, सुदैववान्, केवळ जिवलग, सरकारचे केवळ सुनिश्चित पुत्र, उपायसूचक, असे जे महाराजाधिराज सवाई-माधवराव नारायणराव पंडित प्रधान महापराक्रमी हे शहा अलम पादशाहा महायोद्धा याचे सेवक. "

१ महादजी शिंदे हे आपली लीनता दाखविण्याकरितां आपणास 'पाटिल' ह्मणवून घेत असत.

ले । भेटीसमयीं जंबुर[1] डागले । मग तोफांचे वार शिलगले । सूर्यबिंब अगदींच झांकलें ॥ (चाल) ॥ राव जेव्हां नालकींत[2] बसले । कृष्ण तेव्हां ते जनांस दिसले । अर्जुन पाटिलबावा भासले । पायपोस पदरानें पुसले[3] । चरणीं मिठी माराया घुसले । कर प्रभुनीं बगलेंत खुपसले । इमानी चाकर नाहींत असले । धन्य धनी आणि धन्य दास ते ॥ ( चाल ) ॥ दोन्हीं दळें या सुखांत दंग । त्यावर झाला अमोल रंगे[4] । गुलाल आणि अनिवार पतंग । पळसफुलाचा नाहीं प्रसंग । मस्त चालती पुढें मातंग । कोतवाल घोडे करिती ढंग । राज्य प्रभुचें असो अभंग । अहर्निशीं कल्याण चिंतिती ॥ ( चाल ) ॥ गुलाम सोदे बुडवुन पाजी । पंतप्रधान राखुन राजी । लष्कर दुनया करून ताजी । शके सत्राशें पंधरामाजीं । माघमासीं भली मारून बाजी । पाटिलबावा सुरमर्द गाजी । अगोदर गेले विष्णुपदाजी । शरीर वानवडीस ठेउनी ॥ (चाल) ॥ सवाचार महिन्यांचें अंतर । हरिपंततात्या गेले नंतर । तेथें न चले तंतरमंतर । वर्तमान हें एक अधिकोत्तर । कांहीं न करिती नाना

१ हत्ती किंवा सांडणी यांजवर नेतां येतील अशा लहान तोफा. २ बादशहाकडून किताबाबरोबर जे नग व पोषाख आले त्यांपैकीं एक 'नालकी' होती. ३ महादजी शिंदे यांनीं आपली लीनता दाखविण्याकरितां ही युक्ति केली. ही प्रसिद्ध आख्यायिका मध्यहिंदुस्थानचे इतिहासांत लिहिली आहे. तीच गोष्ट येथें गौरवून लिहिली आहे. ४ पादशहाकडून किताब मिळाला त्याबद्दलचे आनंदप्रदर्शनार्थ हा रंग झाला.

उत्तर । दिलगिर मर्जी सुकलें अंतर । हिरे हरपले राहिले फत्तर । तरी तो पुरुष बहुत धिराचा ॥ ( चाल ) ॥ दौलतीचे आज खांबच खचले । लाल होते ते कोठेंच पचले । शिपायांचे काय चुडेच पिचले । परंतु नाना नाहीं कचले । कडोविकडीचे विचार सुचले । कलम ज्यारीचे घटाव मचले । मोंगलावर मोर्चे रचले । जिकडेतिकडे झाली तयारी ॥ ( चाल ) ॥ पुकार पडला पृथ्वीवरती । सैन्य समुद्रा आली भरती । आगाऊ खर्ची मोहरा सुर्ती । रात्रदिवस श्रम नाना करिती । कशी ही मोहिम होईल पुरती । राव निघाले सुदिनमुहूर्तीं । लिंबलोण उतरितात गरती । इडापिडा काढून टाकिती ॥ ( चाल ) ॥ गारापिराच्या मग रोखांना । तमाम रिघला फरास[1]खाना । उजव्या बाजूस जा[2]मदारखाना । डावेकडे तो [3]जवेरखाना । देवढीबराबर [4]सैराफखाना । चकचकीत खुब सिलेखानों[5] । मधें रायाचा तालिमखाना । खळ खळ खळ लेजिमा वाजती ॥ ( चाल ) ॥ वाड्याबाहेर जिन्नसखाना । पदार्थ भरपुर मोदीखाना । मागें उतरला उ[6]ष्टरखाना । डेऱ्यासन्निध नगारखाना । तऱ्हेतऱ्हेचा शिकारखाना । बाजाराच्या पुढें पिलखानाँ[7] । दिला बिनीवर

---

१ तंबू, बिछाईत वगैरे ठेवण्याची जागा. शिबिरशाला. २ पोषाख वगैरे ठेवण्याची जागा. ३ डागडागिने ठेवण्याची जागा. रत्नशाला. ४ तांबूलशाला. ५ चिलखतें व वस्त्रें ठेवण्याची जागा. ६ उंट बांधण्याची जागा. ७ हत्ती बांधण्याची जागा. गजशाला.

तोफखाना । मोठ्या मोठ्या पल्ल्याच्या जरवा ॥ ( चाल पहिली ) ॥ चोहोंकडे लोक पसरले । नित्य नवे गणतीस लागती एकांडे देशावरले ॥ दैन्य० ॥ २ ॥

बहुत शिंदे जमले । शिलेपोसं[1] पलटणें लाविती पठाण जरीचे समले[2] ॥ रणपंडित ते गमले । भले भले पंजाबी ज्वान दक्षणेंत येउन रमले ॥ ज्यांपुढें शत्रु दमले । त्यांणीं शतावधि कोस स्वामिकार्यास्तव लौकर क्रमले ॥ (चाल) ॥ आधींच दौलतराव[3] निवाले । काय दैवाचे शिकंदर ताले । फौज समोंवतीं जमून चाले । खांद्यावरतीं घेऊन भाले । सर्व लढावया तयार झाले । जिवबादादा[4] गर्जत आले । हासनमाई उज्जनीवाले । महाराजांचे केवळ कलिजे ॥ (चाल) ॥ बाळोबास[5] तर काळिज नाहीं । धीट रणामधें उभाच राही । धोंडिबास जगदंबा साहीं । जय करण्याची चिंता वाही । सदाशीव मल्हार कांहीं । मागें पुढें तिळमात्र न पाही । देवजी गवळी रिपूस बाही । रणांगणाचा समय साधिती ॥

१ चिलखतें. २ पटके. बंगाली लोक जो एक पटका बांधतात त्यास 'शमला' ह्मणतात. ३ महादजी शिंदे वानवडींत वारल्याचें वर आलेंच आहे. त्यांचेवरून त्यांचा धाकटा पुतण्या आनंदराव ह्मणून होता, त्याचा मुलगा दौलतराव गादीवर आला. त्या वेळीं त्याचें वय सुमारें १५ वर्षांचें होतें. याची सर्व कर्तबगारी व शौर्य, हीं शेवटले बाजीराव यांचे कारकीर्दींत दृष्टोत्पत्तीस आलीं. ४ जिवबादादा बक्षी हा शूर पुरुष शिंद्यांचा सेनापति होता. हा सन १७९६ चे अखेरीस मेला. ५ बाळोबा तात्या हाही शिंद्याचे कारभाऱ्यांपैकीं होता. या पुरुषाचा बाजीरावास गादीवर बसविण्याचे खटपटींत बराच संबंध होता.

॥ ( चाल ) ॥ निसंग नारायणराव बक्षी । हटकुन मारी उडता पक्षी । बंदुकीला कटपट्यास नक्षी । फते होई तों गोड न भक्षी । रायाजी[1] पाटिल महत्व रक्षी । नित्य कलुयाण धन्याचें लक्षी । पिढीजाद शिंद्याचे पक्षी । केवळ अंतर रंगजिवाचें ॥ ( चाल ) ॥ मेरुसाहेब[2] कठीण फिरंगी । कळाकुशलता ज्याचे अंगीं । सामायन किळकाटा जंगी । मुकीरसाहेब भले बहुरंगी । हपिसर पदरीं चंगी भंगी । जीनसाहेबाची[3] समशेर नंगी । दुर्जन साहेब झटे प्रसंगीं । झर झर झर झर बुरुज बांधुनी ॥ (चाल) ॥ शहामतखा सरदार किराणी । बाच्छायजादे थेट इराणी । किती काबूलखंदार दुराणी । मुजफरखाची टोळी खोराणी । कडकडीत सिंगरूपची राणी । तारिफ करिती गोष्ट पुराणीं । इतरांची ठेविना शिराणी । पंचविशीमध्यें ज्वान पलटणी ॥ (चाल) ॥ एथुन सरली शिंदेशाई । होळकराची आली आवाई । तुकोजीबोवांना[4] गुरमाई । आधींच बळ स्वारशिपाई । वारगळ[5] बरोबर फणशे जा-

---

१ रायाजी पाटील यांचें आडनांव शिंदे. महादजी शिंदे यांचे सात्तीस उतरलेल्या सरदारांपैकीं हा होता. यानें रजपुतांचा पराभव करून जय मिळविला. आग्रा हस्तगत करून घेण्याकरितां यास शिंद्यानें पाठविलें होतें, त्याप्रमाणें तें शहर घेऊन तेथील कांहीं दिवस यानें सुभेदारी केली. २ हा फ्रेंच जातीचा शिंद्यांचा सुभेदार होता. याचें नांव पेरन. ३ हाही शिंद्यांचे पदरचा फ्रेंच सरदार; याचें नांव जीन ब्याप्टिस्ट. ४ अहिल्याबाईचा दत्तपुत्र. ५ अहिल्याबाईची मुलगी मुक्ताबाई या घराण्यांत दिली होती, ह्मणून 'जांवई' हें नातें.

वाई । लांब हात बुळे वाघ सवाई । वाघमारे कुळ धनगर भाई । खेरीज ब्राह्मण नागो जिवाजी ॥ ( चाल ) ॥ शिवाय होळकर खासे खासे । काशीबाजी[1] तर हुंगुन फांसे । लढाईचे आणुन नकाशे । स्वस्थपणें करतात तमाशे । बापुसाहेबांना येती उमासे । मल्हारजींनीं देउन दिलासे । जा जा म्हणती लोक बगासे । जहांमर्द तलवारकराचे ॥ ( चाल ) ॥ हरजी विठूजी आनंदराव । स्वतां धनी यशवंतराव । संताजीचें प्रसिद्ध नांव । अंबाजीचा तिखट स्वभाव । दूर नेला साधितात डाव । विचारी मतकर माधवराव । भागवतांनीं सोडुन गांव । तावडतोब निघाले ॥ ( चाल ) ॥ महाशूर पटवर्धन सारे । ठाईं ठाईं त्यांचे पसारे । चिंतामणराव[2] शूर कसारे । केवळ एकांगी वीर जसारे । परशुराम[3] रामचंद्र असारे । चहुंकडे ज्याचा पूर्ण ठसारे । आपासाहेब[4] तोही तसारे । थरथर ज्याला शूर कांपती ॥ ( चाल ) ॥ रास्ते आनंदराव दादा । पानशांची

---

१ होळकराचे कारभारी. २ चिंतामणराव पटवर्धन सांगली संस्थानचे मालक. हा पुरुष फार शूर होता. धोंडिबा वाघाचा पाठलाग करण्यामध्यें हे होते. हे, सवाईमाधवराव व शेवटले बाजीराव असे तिघे एका वर्षीं, एका दिवशीं व एका वेळेस जन्मले असें जुन्या लोकांचे तोंडून ऐकिलें आहे. ३ परशुरामभाऊ तासगांव संस्थानचे मालक. हा शूर पुरुष पेशवे यांचा सेनापति होता. याच्या शूरत्वाच्या कृत्यांनीं इतिहास भरला आहे. ४ आपासाहेब हा परशुरामपंताचा मुलगा. हा वडिलांप्रमाणेंच शूर होता. सवाईमाधवरावाचे वेळीं टिपूवर ज्या स्वाऱ्या झाल्या त्यांत हा होता. पुढें हा बाजीरावाचे वेळीं पेशव्यांच्या कामीं पडला.

बहु मर्यादा । विंचुरकरांमधिं गांडु एखादा । राजा बहादर पुरुष जवादा । चौपट खर्च दुप्पट आदा । पुरंधऱ्यांची कदीम इरादा । तत्पर पेठे मोगल वादा । ओढेकरही येऊन भेटले ॥ ( चाल पहिली ) ॥ वामोरकर सांवरले । आंबेकर आणि बारामतीकर प्रसंगास अनुसरले ॥ दैन्य० ॥ ३ ॥

खास पतक नानाचे । निवडक माणुस त्यांत पुरातन सूचक संधानाचें ॥ पद देउनि मानाचें । खुष करून [1]बाबास काम मग सांगुन सुलतानाचें ॥ बळ विशेष यवनांचें । हें ऐकुनि लोकांनीं सोडिलें पाणी शरीरसदनाचें ॥ (चाल) ॥ आपा[2] बळवंतराव सुबुद्ध । बिनीवाले पुरुषार्थी प्रबुद्ध । पवारांत मर्दानें शुद्ध । वाढविती भापकर विरुद्ध । केवळ्यांना शुष्कवत युद्ध । काढिती हांडे रणीं अशुद्ध । धायगुडे निर्वाणी कुबुद्ध । शेखमिरा फौजेंत मिसळले ॥ (चाल) ॥ पराक्रमी हिमतीचे दरेकर । तसेच जाधव बुरुजवाडीकर । अमीरसिंग जाधव माळेगांवकर । सुजाण गोपाळराव तळेगांवकर । जानराव नाइक नठ निंबाळकर । शेकर सोयरे बाळो वडाळकर । करारी डफळे अनंतपुरकर । आढोळ्याचे लोक इमानी ॥

१ बाबा फडके यांसच बाबूराव फडके, असें ह्मणतात. हा हरिपंततात्यांचा मुलगा. या लढाईत हा हुजरातीवर मुख्य होता. जरीपटकाही ह्याचेच स्वाधीन होता. २ आपा बळवंत मेहेंदळे हा बळवंतराव मेहेंदळे जे पानिपत येथील लढाईत पडले त्यांचा मुलगा. थोरले माधवरावाचे वेळीं यास बरोबर सैन्य देऊन हैदरावर त्रिंबकरावमामा गेले होते, त्यांचे मदतीस पाठविलें होतें.

( चाल ) ॥ कामरगांवकर मग बोलवले । प्रतिनिधीला
किती गौरविले । हर्ष वाहले पुढें सरसावले । रणनवरे दूर-
कुच धांवले । समाधान राउत पावले । बन्या बापु जसे
नवरे मिरवले । शहर पुणें रक्षणार्थ ठेविले । माधवराव
रामचंद्र रानडे ॥ ( चाल ) ॥ सरमजामी सरदार संपले ।
शिलेदार मार्गे नाहीं लपले । धाराशिवकर लेले खपले ।
जमेतसुद्धां ते आपआपले । गोट गणतिला तमाम जपले
सानपदोर्गे निगडे टपले । खुळे वाघ आणि बाबर सुपले ।
भगत बडे डोबाले दिपले । जाधव काळे माळशिकारे ॥
(चाल) ॥ बाजीराव गोविंद बर्वे । लाड शिरोळे धायबर
सुर्वे । दाभाड्याचा हात न धरवे । भगवंतसिंग बैसे बेपर्वे ।
बक्षरकराचा लौकिक मिरवे । खंडाळ्याचे पोषाग हिरवे ।
नलगे मोयते सुंदर सर्व । सखाराम हरी बाबुराव ते ॥
( चाल ) ॥ कडकडीत हुजुरात हुजुरची । वीस सहस्र
जूट पदरची । राउत घोडा बंदुक बरची । केवळ आगच
उतरे वरची । एक एक पागा अमोल घरची । दाद न
देती देशांतरची । काय कथा त्या भागानगरची । रणां-
गणीं काळास जिंकिती ॥ (चाल) ॥ दिवे फडतरे बाबर-
काठे । तळापीर मानसिंग खलाटे । मारिती पुढें समोर
सपाटे । निलाम कवडे जाले खपाटे । देवकात्याचे फार
हाकाटे । मुळेगांवढे करिती गल्हाटे । जगतापाचे महतर
मोपटे । मले मुर्तुजा महात थड्याचे ॥ (चाल) ॥ गणेश

गंगाधर थोरात । नीळकंठ रामचंद्र भरात । आयतुळे मान्य सकळ शूरांत । बेहरे मांजरे योग्य वीरांत । राघो बापुजी रणघोरांत । येसोजी हरी सैन्यपुरांत । दारकोजीबाबा निंबाळकरांत । वीरश्रींत तो धुंद सग्याबा ॥ ( चाल ) ॥ कृष्णसिंग हैबतासिंग तारे । तसेच लक्ष्मणसिंग बारे । दावलबावा महात सारे । मिळाले भापकर ते परभारे । मैराळजी पायघुडे विचारे । इंदापुरकर नव्हत बिचारे । गणेश विठ्ठल बावमारे । बिडकर खुर्देकर आटीचे ॥ (चाल) ॥ गिरजोजी बर्गे फार दमाचे । बहादूर बारगिर ते कदमाचे । आठवले तर बहुकामाचे । दुर्जनसिंग राठोड श्रमाचे । टिळे कपाळीं रामनामाचे । बिनीबरोबर ते नेमाचे । श्रीमंतस्मरणें काळ क्रमाचे । जसे दूत सांबाचे प्रतापी ॥ ( चाल पहिली ) ॥ प्रपंच वैद्य विसरले । चिलखत बदतर शिलेटोप मल्हारराव पांघरले ॥ दैन्य० ॥ ४ ॥

लष्कर सगळें गुर्के । जरीपटक्याभोंताले घालिती गरर मानकरी गर्के । सुंदर गोरे भुर्के । घोरपडे पाटणकर महाडिक खानवीलकर शिर्के ॥ मुंगी मधें ना फिर्के । चव्हाण मोहिते गुजर घाडगे निंबाळकर दे चर्के ॥ ( चाल ) ॥ पुढें पसरले रिसालदार । मुसासुत्रीम नामदार । सय्यद अहमद जमादार । अमीर आबास नव्हे नादार । शहामीरखां ते डौलदार । इतक्यांवर ते हुकूमदार । राघोपंत ते दौलतदार ।

तसे काशिबा बल्लाळ रानडे ॥ ( चाल ) ॥ गोरा मुसावास अमोल । मुसानारद तो समतोल । विनायकपंताचा गलोले । आबा काळे गुणीच डोल । टोपकराचे बोलति बोल । पायदळाचा बांधुनि गोल । तंबुर तासे वाजति ढोल । उठावल्या वोरखा निशाणें ॥ ( चाल ) ॥ संस्थानी याविरहित राजे । सेनासाहेब किताब साजे । राघोजी-बावा नांव विराजे । बाणांचा भडिमार माजे । सरखेलांचा लौकिक गाजे । समशेर बहादूर गरीब नवाजे । अकल-कोटी लोक ताजे । दुर्जनसिंग रजपूत हडोदी ॥ ( चाल ) ॥ दक्षण उत्तर पश्चिम भागीं । पसरून तोफा जागोजागीं । तमाम गारदी त्याचे मागीं । स्वार सैन्य त्यामागें झगागी । जरीपटका तो दुरून धगागी । कोणीच नव्हता त्यांत अ-भागी । त्वरित बक्षिस पावे बिदागी । जासुद सांडणीस्वार धांवती ॥ ( चाल ) ॥ काय पलटणच्या फैरा झडती । पर्जन्यापरी गोळ्या पडती । शिरकमळें कंदुकवत् उडती । छिन्नभिन्न किती होऊन रडती । कितीक पाण्याविण तडफडती । कितीक प्रेतामधेंच दडती । वीर विरांशीं निसंग भिडती । सतीसारिखे विडे उचलती ॥ ( चाल ) ॥ पाउल पाउल पुढें सरकती । घाव चुकाउन शूर थडकती ।

१ दगड ज्यानें फेंकतां येईल असें धनुष्य. २ हा किताब आंग्रे यांस होता. यांचा पूर्ण किताब ' सेना सरखेल ' असा होता. पेशवाईत गायकवाड यांचा किताब ' सेना खासखेल ' व नागपूरकर भोंसल्यांचा ' सेनासाहेब सुभा ' असा होता.

सपुत वाघापरी गुरकती । हत्यार लाउन मागें मुरकती । खुणेनें शत्रुवर्म तरकती । मोंगलबच्चे मागें खरकती । जिवबादादा मनीं चरकती । अररररर शाबास बापांनो ॥ (चाल) ॥ सुटती तोफा धुंद दणादण । गुंगत गोळे येती छणाछण । सों सों करिती बाण सणासण । खालेल घोडे उडती टणाटण । टपा हाणिती दुरुन ठणाठण । वाजति पट्टे[1] खांडे खणाखण । नौबती झांजा झडती झणाझण । एकच गर्दी झाली धुराची ॥ ( चाल ) ॥ थोर मांडली रणधुमाळी । अगदींच बसली मग कांठाळी । फौज पसरली रानोमाळीं । लाखोलाख तलवार झळाळी । होळकराची फिरती पाळी । जिवबाची मर्दुमकी[2] निराळी । मोंगलाची केली टवाळी । सबळ पुण्य श्रीमंत प्रभूचें ॥ ( चाल )॥ अठरा घटका लाही फुटली । तोफ हजारों हजार सुटली । मिरजकरांची मंडळी झटली । भाऊबरो-

---

१ रुंदपाती, दोधारी शेवटीं वाटोळी व सरळ अशी तलवार. २ या लढाईत परशुरामभाऊंस वार लागून ते व्याकुळ झाले. त्यानंतर त्यांजवर वार करणाऱ्या पठाणाचें शिर भाऊंचे वडील पुत्र हरिपंत यांनीं उडविलें. पुढें पठाण लोकांनीं हल्ला करण्याचें चालविलें. तेव्हां पेशवे यांचें सैन्य पळावयास लागलें. जरीपटक्याचे अधिकारी बाबा फडके यांनींही मागें पाय काढण्याचा विचार केला. हें पाहून जिवबादादा पुढें सरले व बाबा फडके यांस ' नामर्द आहां, ' अशा आशयाचें पुष्कळ बोलून त्यांस सांगितलें कीं ' तुह्मास भय वाटत असेल तर शिंद्यांचे लष्कराचे पाठीं पडा. ' पुढें त पठाणांवर चाल करून गेले व त्यांचा त्यांनीं पराभव केला. या गोष्टीला अनुलक्षून वरची उक्ति असावी.

बर निसंग तुटली । मोंगलसेना मागें हटली । त्यासमयीं कैकांची उपटली । पेंढाऱ्यांनीं दौलत लुटली । गबर झाले एका दिसांत ॥ (चाल) ॥ शके सत्राशें सोळा भरतां । आनंद संवत्सरही सरतां । दहा दिवस शिमग्याचे उरतां । वद्य पंचमी सुवेळ ठरतां । तीन प्रहरांचा अंमल फिरतां । मोंगलाशीं प्रसंग करतां । पळाले मोंगल धीर न धरतां । चंद्रउदयीं खर्ड्यांत कोंडिले ॥ (चाल पहिली) ॥ गढींत खासे शिरले । मराठे मोंगल पठाण पुर्भे इतर घरोघर भरले ॥ दैन्य० ॥ ५ ॥

बहुत खराबी जहाली । मोहोऱ्यावरची फौज सैनिकांसहित रस्ते नाहाली ॥ त्यांत उन्हाची काहाली । रुपयाचें दिडशेर पाणी अशी कठीण वेळा वाहाली ॥ ती सर्व जनांनीं पाहिली । जिवबादादा परशुरामपंताची दिसंदिस वहाली ॥ ( चाल ) ॥ निजाम अलीखान नव्हे सामान्य । बाच्छाई सुलतानांत मान्य । जुनाट पुरुषांत राजमान्य । अपार पदरीं मण धनधान्य । कोण बरोबरी करील अन्य । दैव धन्याचें मुळीं प्राधान्य । तशांत झालें अनुकुळ दैन्य । नाहीं तर घेते खबर पुण्याची ॥ (चाल) ॥ जेव्हां मारती यवन मुसंडी । तेव्हांच होई ती फौज दुखंडी । साठ सहस्र पठाण बुंडी । तिनशें तोफा थोर अखंडी । पंचरशी आणि बिडी लोखंडी । तयार दारू तिनशें खंडी । असें असुनियां दबली लंडी । धरून

मश्रुल्मुलूखं[1] आणिला ॥ ( चाल ) ॥ संकटीं मोंगल अति पडियेला । देश होता जो तोडीस नेला । तो तेहतीस लक्षांचा गेला । तीन कोटींचा करार केला । पण

---

१ मशीर उल्मुल्क याचें नांव गुलाम सय्यदखान. हा सन १७३४ त एलिचपूर येथें जन्मला. निजाम उल्मुल्क यांजबरोबर जे कांहीं उत्तरेंतून लोक आले त्यांपैकीं याचा आजा होता. निजामाचे पदरीं प्रथमतः पन्नास रुपये दरमहाचे चाकरीवर हा राहिला. पुढें सलाबतजंगाचा धाकटा भाऊ निजामअल्ली याचा पक्ष यानें स्वीकारला. हैदराबादचे दरबारांत फ्रेंच लोकांचें वजन फार होतें. तें निजामअल्लीस रुचत नव्हतें. त्यांचा पाय त्या दरबारांतून ज्या उपायानें निघेल तो उपाय करण्यास तो टपत असे. त्यानें फ्रेंच सरदार बुसी याचा वकील हैदरजंग यास मारिलें. त्यांत मशीर उल्मुल्क सामील होता. यामुळें निजामअल्लीची याचेवर विशेष मेहेरबानी झाली. हें त्या दरबारांतील कांहीं मुत्सद्यांस खपलें नाहीं. त्यांनीं यास कांहीं दिवस हैदराबादचे हद्दीपार केलें होतें. पुढें सन १७८३ त हा प्रधानमंडळांत प्रविष्ट झाला. सन १७९१ सालीं टिपूवर मराठे व इंग्रज यांनीं स्वारी केली तेव्हां शिकंदरशहाबरोबर हाही गेला होता. पुढें ज्या लढाईविषयीं हा पोवाडा आहे तिचे अखेरीस तह झाला, त्यांत मशीर उल्मुल्क यास ओलीस ह्मणून पेशवे यांनीं मागून घेतलें. यासच घेण्याचें कारण हा पेशव्यांचा वकील गोविंदराव काळे यांजवळ नानाफडनविसाचा उपमर्द होईल अशा तऱ्हेनें बोलला होता. पुढें पुणें मुक्कामीं असतां ह्यानें बाजीरावास गादीवर बसविण्याचे खटपटींत पडून आपली मुक्तता करून घेतली व निजामअल्लीची तहाचे बिकट कचाटींतून सोडवणूक करून घेतली. हा हैदराबादेस सन १७९४ चे जून महिन्यांत परत गेला. नंतर हा पुनः दिवाणाचें काम पाहूं लागला. हा सन १८०४ त मृत्यु पावला. यानें इंग्लिशांचा पक्ष धरून त्यांचें फार साहाय्य केलें. त्या दरबारांतून फ्रेंच लोकांचें समूळ उच्चाटन करविण्यास हाच कारण झाला. या व इतर कामगिरीबद्दल यास वर्षाचें लाख रुपयांचें पेन्शन लॉर्ड वेल्स्ली यानें सन १८०० त करून दिलें. यास मशीर–उल्मुल्क, अतफ जहा व अझीम–उल्–उमराव असे तीन किताब होते.

नानांनीं सिद्धिस नेला । फिरला मोंगलांचा ढपेला । नक्षत्रापरी आला तजेला । त्यामध्यें माधव चंद्र उदेला ॥ ( चाल ) ॥ स्वारी नव्हे हें स्वयंवर झालें । श्रीमंतांस ऐश्वर्य मिळालें । अपेश अटकेपार पळालें । यादव-सैन्य हरीभोंतालें । तसेंच लष्कर पुण्यास आलें । पहा-वया जन सर्व निघाले । दर्शन होतां शरीर निवालें । घरोघरीं आनंद माइना ॥ ( चाल ) ॥ पाहुन पूर्वापार शिरस्ते । भवानी पेठेपासुन रस्ते । दीपोत्सव शोभती दुरस्ते । शृंगारुन गज तुरंग बस्ते । शहरामाजीं पदार्थ सस्ते । पहिलवान आणि जेठी मस्ते । खुराक त्यांना

---

१ बकरे. छत्रपतीची किंवा पेशवे यांची स्वारी निघाली ह्मणजे जो क्रम असे तोच क्रम प्रभाकरानें येथें धरला आहे असें नाहीं, परंतु बहुतेक सर्वांचीं नांवें मागें पुढें कोठें तरी दिलीं आहेत. स्वारीचा क्रम कसा असे याची याद देतों, कारण पूर्वींचे राजे नाहींत तेव्हां स्वाऱ्याही नाहींत. यांतील अंशतः स्वारींचा क्रम कांहीं संस्थानांतून दृष्टीस पडतो.—“ ( १ ) जरीपटक्याचे हत्ती दोन. ( २ ) सर्व फौजेंतील निशाणें. पागा, करवल लोक. लढाईंत सेनाधुरंधरपदाचे अधिकारी व सेनासाहेब सुभापदाचे अधिकारी बिनीरक्षणास. ( ३ ) तोफ-खाना, गाड्या, रथ. ( ४ ) शूर सरदार हत्ती व घोडे यांवर. ( ५ ) पायदळ लोक, पटेकरी विटेकरी, सांग, बरची, बाणेकरी, खासबारदार, बंदुकीचे लोक. ( ६ ) रणवाद्यें, तासे मर्फे, हलग्या, वाजंत्री शिंगाडे, कर्णे. ( ७ ) कोतवाल हत्ती, सांडणी, वाणाच्या कैच्या. ( ८ ) खासे घोडे कोतवाल. ( ९ ) मंगल-वाद्यें शहाजाने, कालूसनया, घोड्यावर नगारखाना. ( १० ) भाट, बंदीजन, ( ११ ) लम्या, निशाणें, बाणदार, भाले, बोथाट्या, चोपदार, भालदार, वेत्र-धारी. ( १२ ) जेठी व मल्ल शूर लोक पायदळाचे. ( १३ ) अंबारींत खासे स्वारी व उजवे व डावे बाजूस मागून योग्यतेचे मानकरी. ”

बदाम पिस्ते । सदा धुंद [1]जिलीबेंत चालती ॥ ( चाल ) ॥ [2]भांड भाट भालदार [3]भवय्ये । सुस्वर गाती [4]ढाडी गवय्ये । शिरापुरीचे सदा खवय्ये । मिठाई देती नित्य हलवय्ये । लोक सभोंवते किती लढवय्ये । नानासारिखे वीर [5]संगं-वय्ये । बलाढ्य शत्रु पराभवय्ये । धनी राव राजेंद्र क-न्हय्ये ॥ ( चाल ) ॥ [6]लॅंगी बाण बोथाट्या दाट । विना-इटचाचा खळखळाट । अंबाऱ्यांचा मागें थाट । त्या मागें [7]हुजरात अचाट । सत्तर हस्ती पुढें जुनाट । मधून फुटेना मुंगीस वाट । झुगारिल्या जरी दुरून ताट । तरी तें खालीं कधीं पडेना ॥ ( चाल ) ॥ सत्राशें सत्रामधिं स्वारी । राक्षस संवत्सरीं स्वनगरीं । उलटुनि आली घरीं माघारी । संवत् वैशाखाची बहारी । शुद्ध त्रयोदशी शुक्रवारीं । दहा घटका रात्रीच्या सुमारीं । गुढ्या उभारुन राजद्वारीं । गृहप्रवेश केला प्रभुनीं ॥ ( चाल ) ॥ [8]न्यहाल केलें सर-दारांना । दिला चौघडा मिरजकरांना । खेरीज जहागिर विंचुरकरांना । कडीं कंठ्या देऊन शूरांना । गौरवुनी नानानीं वीरांना । निरोप दिधले मग अमिरांना । गेले कृष्णाभीमातिरांना । कुटुंबसुद्धां स्वस्थ नांदती ॥ (चाल) ॥ गंगुहैबती शाईर मोठे । कवनीं ज्यांच्या वंदवनोटे । महा-

---

१ परिवार. २ हिंदुस्थानांतील स्त्रीवेष घेऊन एरवींच जे नाचतात, गातात ते. हे खुषमस्करे असतात. ३ गुजराथेंतील नट व नर्तक. ४ मुसलमान जातीचे गवई. हे स्वारींत चालत राजाचें यश गातात. ५ साहाय्य करणारा, मंत्री. ६ पताका. ७ खासगी पागा. ८ उच्चत्वास पावविले.

देवाचे सवाई सोटे। गुणीराजाचे शब्द शिंधोटे। जसे मोडिला घिवर चिरोटे। इतर कवीश्वर केवळ गोटे। अर्थ प्रास लावितात खोटे। पगड्या फिरवुन डौल मिरविती ॥ ( चाल ) ॥ कैक प्रसंगीं हरले। बिनडाकिल दागिने अमोलिक प्रभाकराचे ठरले ॥ दैन्य० ॥ ६ ॥

---

## १२. त्याच विषयावर दुसरा पोवाडा.

हा दुसरा पोवाडा आपा यशवंत नांवाच्या कवीनें केला आहे. याच्या आह्मांस चार प्रती मिळाल्या. एक 'ज्ञानप्रसारक' मासिक पुस्तकांत छापलेली, दुसरी 'विविधज्ञानाविस्तार,' पु० ३ पृष्ठें १७४ व १९२ येथें छापलेली, तिसरी एका गोंधळ्याकडून घेतलेली, व चवथी जुन्या बाडांत सांपडलेली. या सर्व प्रतीं ताडून हा पोवाडा छापला आहे.

चाल—भाऊनाना तलवार धरून। गेले गिलच्यावर चढाई करून ॥

तलवार पुण्यावर धरून, मोंगल आला चढाई करून ॥ ध्रुपद ॥

होणारासारिखें निजामअल्लीला पुढें आठवलें। एकांतीं अटउमराव मसूर बैसूनी खलवत मिटाविलें ॥ ठायीं-ठायीं सुभ्यांशीं पत्रें लिहुन सांडणीस्वार पिटविले। औंदांची पुण्यावर मोहीम निजामअल्लीनें जेहान उठविले ॥ ( चाल ) ॥ ठायिंठायीं जमाव बंदीचे। चालले कलम फौजेचें। राऊत पायदळाचे। शेरे[3] झटति लोक लोकांचे

---

१ सरळ. २ जमाव, फौज. ३ पगाराची नेमणूक.

॥ ( चाल ) ॥ धरिला पुण्याचा सुमार रे । बेदर सोडुनियां मोहरे । मुंहूर्तानें[1] ठोकिले डेरे । तोफा ओढिल्या बाहेर ॥ ( चाल ) ॥ मुख्यशहर[2] दक्षिणेवरती मोहीम झाली । बांधोनियां पुण्यावर कंनर चढती दाली । हिंदुपद घेईन ह्मणतो निजाम अली ॥ ( चाल पहिली ) ॥ कुचावर कुच रे कुचावर कूच पाहिना फिरून । तलवार० ॥ ॥ १ ॥

येणार पुण्यावर मोंगल ही बातमी अगोदर होती । डांकिनें[3] डांक पत्रें नानाशीं येऊन पोहोंचती ॥ ब्राह्मणी राज्य कैदवार एकापेक्षां एक मसलती । वाड्यांत सु-भ्यांची खलबत श्रीमंतांची चढती रती ॥ ( चाल ) ॥ रात्रीचा मनसुबा केला । हें वर्तमान अवघ्यांला । कारखाने ज्याचे त्याला । जरिपटका हरिपंताला ॥ नेमणूक हुजरातीची । मराठी नेकनोकिची । तलवार वि-श्वासाची । त्या परशुराम भाऊची ॥ ( चाल ) ॥ पानसे, पुरंदरे, रास्ते आणिक ढमढेरे । दिलि जागा पाहून मैं-दान पुण्याबाहेर । दिले गारपिरावर दलबादल डेरे ॥ ( चाल पहिली ) ॥ निघाले बाहेर रे, निघाले बाहेर क-धिंना फिरून[6] । तलवार० ॥ २ ॥

राव रंभा, कायेत, पांढरे, डफळे मानकरी । जाधव, चवाण, घोरपडे, घाटगे, लग्या भडकती जरी ॥ रणनवरे

---

१ 'मुलतानी' पा०. २ 'मुदाम' पा०. ३ 'दरकुचमुक्काम डांकीनें डांक' पा०. ४ एका जातीचे मोठे तंबू. ५ लढाईच्या बेतानें फौज उभी करणें. ६ 'मागें सरून' पा०.

गायकवाड, बासडे, वर झेंडे बनगरी । हे सुभे मोंगलां-कडचे उभे आपुलाल्या बाजूंवरी ॥ ( चाल ) ॥ इतमाम ज्याचा त्याला । मराठे मुसलमानांला । चालती कोर-बंदीला । दाटती मांड मांडीला ॥ मारती तीस हजार । संगें पठाणांची तलवार । लष्कर सोडुनियां मो-होरे । चालिलें लुटित पेंढार ॥ ( चाल ) ॥ गारदी, आरब, सिद्दि शिक पायदळ । बाणाच्या उंटावर कैच्या दारूगोळे । दर तोफेसंगें हत्ती, छकड्यांची माळ ॥ दहशत पडली रे, दहशत पडली भासतो दुरून । तलवार० ॥३॥

बावन पागा हुजरात छबीना डेऱ्याभोंवता उभा । शिंद्यांची सातशें तोफ, बरोबर कंपू सवता सुभा ॥ आल्या नागपुराहून फौजा भोंसल्याच्या बाणांची तबा । पेंढार बासडेवाला होळकर शत्रूला दबदबा ॥ ( चाल ) ॥ उमराव बलावुनी अवघे । हुद्दे ज्याच्या त्याच्या मागें । पायदळ तोफांसंगें । टाकिलें पिछाडिस बुणगें ॥ विनि दौलतराव शिंद्याला रे । कुच करोनि मोहोरे गेला । सिने-वरता तळ दिला । मग तिथें जिवबादादा आला ॥ ( चाल ) ॥ तिन लाख मिळाली जहान पेशवेशाई । प्रतिनिधीबरोबर माधवराव सवाई । ही कृपा शाहु रा-जाची ब्रह्मवाच्छाई ॥ ( चाल पाहिली ) ॥ लढाई मारूं रे लढाई मारूं एकदां ठरून । तलवार० ॥ ४ ॥

होते वकिल मोंगलाकाडिल पत्र पाठविलें तपशिल लिहून । नानाचा अवघा खेळ बरोबर श्रीमंतांला घेऊन ।

तिंन लाख सैन्य हिंदूंचें उतरलें सीनेवर तळ देऊन । हे शाण्णव कुळिंचे भूपाळ, चढले [2]भगव्या ढाला देऊन ॥ ( चाल ) ॥ नानानें हुकूम केला । तोफांचा बांधा किल्ला। ह्मणे परशुराम पंताला । सांभाळा श्रीमंताला ॥ एकदां झुंज मारावें रे । मोंगल मागें सारावे । गादिचें नांव राखावें । अवघ्यांनीं यश हें घ्यावें ॥ ( चाल ) ॥ श्रीमंतांची पहिली चढती स्वारी । चाकरी हुजुर बक्षिसी करा तलवारी । [3]तारील या समयांतून विठल हरी ॥ ( चाल पहिली ) ॥ प्रसंग वाईट रे, प्रसंग वाईट जाईल हरून । तलवार० ॥ ५ ॥

केलें कुच निजाम अलीनें पुढें खड्यावर चालुन आला । [4]दिल्या ढाला मैदानांत परांड्याच्या बाजुला ॥ झाले मोंगल तयार, तोंड लागलें प्रहर दिवसाला । आपा बळवंत, बाबा फडके, जखमा परशुराम भाऊला ॥ ( चाल ) ॥ पठाणांनीं गर्दी केली । मग चढला निजामअल्ली । सांडणी बातमी आली । लष्करांत गलबल झाली ॥ नानांनीं हुकूम केला । त्या दौलतराव शिंद्याला । भोंसला नागपुरवाला । मग होळकर तयार झाला ॥ (चाल) ॥ बावन पागा हुजरात

---

१ ' तीन लाखजण हिंदूंचा पडला सीनेवरता येऊन ' पा०. २ ' भगवा झेंडा घेऊन ' पा०. ३ ' या होमांतून तारी भव विठ्ठल तारी ' पा०. ४ ' दिले डेट ' पा०. ५ ' झाली तयारी मोंगलाकडील ' पा०.

खासगीवाले । डंक्यावर टिपरी पडतां हुशार झाले । पेंढार घांट रोखून उभे भोंवताले ॥ ( चाल पहिली ) ॥ उठा नानाच्या रे, उठा नानाच्या हुकुमावरून । तलवार० ॥ ६ ॥

झाला हुकूम तोफखान्याला किल्ली जिवबादादाचे हातीं । कंपुची झडती लईन गोळे जणुं गारा वर्षती ॥ भोंसला शर्थ बाणांची केली, गर्दी लावून बती । टाकिली फौज भाजून मोंगल येतो काकुळती ॥ ( चाल ) ॥ नानाचा हुकूम झाला । तोफांवर घोडे घाला । चहूंकडून उठला हल्ला । एकदांच हरहर केला । गर्दी पाहून घाबरला । मग नबाब मागें सरला । खडर्याचा सुमार धरला । जाऊन किल्ल्यांत शिरला ॥ ( चाल ) ॥ बेजार मार मारून मोंगल केले । पेंढार पल्ला देइना उभे भोंवताले । घेतील लुटून मारती धपाधप भाले ॥ लागले पाठीं रे पाठी तोफा भरून । तलवार० ॥ ७ ॥

दौलत केली खराब मोंगल खडर्यामधिं घातला । सभोंवताल्या लाविल्या तोफा जिवबादादा आणिक भोंसला ॥ कंपूचा पहारा खडा भवेता पेंढाऱ्यानें शह दिला । नानाशीं धाडलीं पत्रें जीवंत धरितों निजामअल्लीला ॥ ( चाल ) ॥ केली गर्दी मराठ्यांनीं । बुडवितील मुसल-

१ ' भोंसल्यानें केली केदी लावुन बाणांची सरबत्ती ' पा०. २ ' गोळा बेंदारानें साधिला ' पा०.

मानी । जासूद पिटिले नानांनीं । नका देऊं तिळमात्र कोंडापाणी ॥ पत्रामधिं नाना बोले । जें व्हायाचें तें झालें । शत्रूला कैद केलें । हें यश आह्मांशी आलें ॥ ( चाल ) ॥ जय अपजय परस्वाधीन बसला घसरा । हो मोंगल अजिंक्य वीर प्रतापी खरा । दक्षिणेंत केवळ असामी नाहीं दुसरा ॥ (चाल पहिली) ॥ आब राखावा रे आब राखावा, कीं जाईल मरून । तलवार० ॥ ८ ॥

कडबा दाणा बंद कोंडिलें पाणी कहर वर्षला । झाले मोंगल बेजार मरूं लागले, आले कौलाला ॥ दरम्यान मसूर घेऊन करा भरपाई सोडा आह्मांला । नानाला धाडिलें पत्र घ्यावी खंडणी होऊंदे सल्ला ॥ ( चाल ) ॥ याप्रमाणें करार झाला । मग दिवाण हवालीं केला । आले घेऊन मुक्कामाला । सोडिला निजामअल्लीला ॥ ( चाल ) ॥ फौजेचा उठाविला वेढा । सोडून खर्ड्याचा वाडा । आले बाहेर सुटला घोडा । मग पळता हा जीव थोडा ॥ (चाल) ॥ हिंदुंनीं उतरला चिरा घेतली ढाली । धरली बेदरची वाट, रेवडी झाली । दरकुचानें कुच करून पळतो निजामअल्ली ॥ ( चाल पहिली ) ॥ ताब हिंदुंनीं रे, ताब हिंदुंनीं घेतला हिरून । तलवार पुण्यावर० ॥९॥

---

१ 'दक्षिणेंत ह्मणाया केवळ आसला आसरा मोंगल प्रतापी वीर ह्मणाया दुसरा' पा०. २ आर्जवाला. ३ 'पळता जीव झाला थोडा पायांतील लुटला खोडा' पा०.

आलें यश रावसाहेबाला लौकिक नानाचा चहूंकडे । आलें दक्षिणेंत झाले महशूर जरब नामाचा डंखा झडे ॥ आले जेर करूनी मोंगल निशाण जरिपटका चाले पुढें । काळू कर्णे बाजे होती नौबत हत्तीवर चौघडे ॥ (चाल) ॥ शत्रूवर बोलबाला । आले करून शहर पुण्याला । यश आलें तलवारीला । चालती भिऊन गादीला ॥ ज्यांनीं ज्यांनीं समशेर केली । बक्षिसी तयांला झाली । खुप लुटला निजाम अल्ली । कैकांचीं दरिद्रें हरलीं ॥ (चाल) ॥ [1]गेली रंगबाजित नोकित गातो शोकी । कवि आपा यशवंताची धरितो बाकी । कवि हसेन कलगी-वाल्यावर लावी नोकी ॥ शिरीं शिरताज रे शिरीं शिरताज गातो भरून । तलवार० ॥ १० ॥

---

## १३. त्याच विषयावर तिसरा पोवाडा.

हा पोवाडा बाळा लक्ष्मण नांवाच्या कवीनें केला आहे. ह्याच्या आह्मांस तीन प्रती मिळाल्या. एक वि० ज्ञा० वि० पु० ८ पृ० ७९ येथें छापलेली, दुसरी एका गोंधळ्याकडून घेतलेली, आणितिसरी जुन्या बाडांत मिळालेली. ह्या सर्व प्रती ताडून हा पोवाडा छापला आहे.

चाल—घनःशाम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ।
उठ लवकरी वनमाळी उदयाचळीं मित्र आला ॥ भुपाळी.

श्रीमंत महाराज पेशवे अमोलीक सुरती मोती । सवाई माधवराव सवारी निघाली नबाबावरती ॥ ध्रुपद ॥

---

[1] 'राव तुर्कीत रंगबाजी' पा०.

मिळून[1] फौजा ऐकून घ्याव्या नामी नामी सरदार । रघुजि भोंसले दौलतराव शिंदे तुकोजी होळकर ॥ प्रथम दिवशीं संशे[2] आपाजी बळवंतराव मुजमदार । सखाराम पानशे परशुराम भाऊ भले हैत[3] झुंजणार ॥ रास्ते[4] लक्षुमण ऐका बाबा फडके बिनीवर । गणपतराव शिवदिन भेरी आबा होते शालुकर ॥ मानकरी मराठे लोक ऐका त्यांचा विस्तार । मालोजी घोरपडे आदी नाइक राजे निंबाळकर ॥ सोनवळे[6] सरकले वाघमारे सयाजी भापकर । गोविंदराव चवाण हैबतराव नांदुरकर ॥ भालवणीचे दाजीसाहेब चौराज्यामधिं महशूर । श्रीमंतांच्या बावन पागा त्यामधिं बावन सरदार ॥ शिंद्यांचे सरदार जिवबादादा एक वीर भारती । पन्नास हजार फौज फिरंगी तिन कंपू संगें जाती ॥ श्रीमंत० ॥ १ ॥

भोंसल्याचे विठ्ठलपंडित आणिक खासा पठाण । मर्द शिपाई जाउनि भिडती व्याघ्र जसे पंचानन ॥ पन्नास हजार फौज सातशें कैची उंटावर बाण । शंभर

---

१ ' मिळविल्या फौजा श्रीमंती ' पा०. २ ' जिवा ' पा०. ३ ' हे ' पा०. ४ ' रास्ते बाबा फडके पुढें दिले बिनीवर ' पा०. ५ ' सवती भेरी आणि खांचाशीं शालूकद ' पा०. ६ ' मालवाडीचे भवानराव घाडगे पाटणकर । मालेगांवचा अमरसिंग पागे जाधव दूरेकर ' पा०. ७ 'गोविंदराव कोकाटे चव्हाण हैबतराव नांदूरकर । मोहितन करंडे वाघ मोडस आणि भापकर । सोनवळे सरकाळे पांढरे आणिक शिरके गुजर ' पा०. ८ ' भले मर्द शिपाई रणामधिं भिडे जैसे ' पा०. ९ ' तुकोजी होळकराचें संतान ' पा०.

हत्ती स्वारींत झुलतो आणिक भोंसल्याचा मान ॥ गाज-विली तलवार [1]रणामधिं भले शिपाई ब्राह्मण । गणपत-राव शिवदिन भेरी पंधरा हजार तिघेजण ॥ रावसाहेब फडणीस नाना पन्नास हजार सैन्य । याशिवाय मराठे लोक बरोबर फिरंगी दहा पलटण ॥ [2]हेपशियान आरबी परदेशिक कइक जाती । [3]सवाई माधवराव पेशवे बसुनि नित्य मुजरा घेती ॥ श्रीमंत० ॥ २ ॥

पहिली श्रीमंतांची स्वारी पाहुन चांगला मुहूर्त । निघाली बाहेर तमाशा पहाती मग जणुं लोक ॥ सफेत पोशाक घालून अंगावर गहिना हा जडित । [6]दंडिं पाच-रत्नांच्या पेट्या सोन्याचीं कडिं हातांत ॥ सोन्याचें पड-दळें गळ्यामधिं शिपाइबाणा शोभत । सजवुन हत्ती बहु खुश होती राव बसले अंबारींत ॥ [7]बैसूनशानी दाजी फ-डके वरती चौरी उडवीत । [8]चोपदार छडिदार पुकारी ‘ नका बोलूं ’ ललकारीत ॥ दोहों बाजूंनीं उभे शिपाई रामराम मुजरा घेत । ऐशी फौज चालली दर्यामधिं

---

१ ‘पची चालला’ पा०. २ ‘ रोहिले आरब गारदी आणिक खासा पठाण । परदेशी रजपूत तयांची कोण करिती पहा गणती ’ पा०. ३ ‘ श्रीमंत महाराज बसुनि तयाची ’ पा०. ४ ‘ रावसाहेबांची ’ पा०. ५ ‘ निघाली कीं पुण्याबाहेर नगरलोक तमाशा पहात ’ पा०. ६ ‘ शिरीपेंच मोत्यांचा तुरा कानीं चौकडा शोभत । पाचूचा कंठा गळ्यामधिं हृदयीं पदक झळकत । पवित्र मुद्या बोटामधिं हिरकण्या लखलखीत ’ पा०. ७ ‘ मागें बैसले ’ पा०. ८ ‘ चोपदार जमेदार मालदार पुढें नकीब ललकारीत ’ पा०. ९ ‘ चालला दळबादल जैसा गड सागर हलवीत ’ पा०.

सागर हालवीत ॥ बारा कोस लांबी रुंदी ज्या फौजेचे तळ पडती । दूरमजली दूरकुच चालून आले नागलवाडी-वरती ॥ श्रीमंत० ॥ ३ ॥

मंगळवारीं नबाबांनीं पुढें धाडिलें सेनेस । कळलें श्री-मंताला बोलून नेले आपल्या सरदारास ॥ कशी करावी मसलत नवाब जाईन ह्मणतो पुण्यास । परशुराम भाऊ ह्मणे किं मारूं मरूं जरी या समयास ॥ नाना फडणिस सखारामबापू पुसती जिवबादादास । जिवबा बोले गर्जुन मोंगल काय आणिला जिन्नस ॥ उडविन बाविस टोप्या झेंडे नेऊन लाविन आकाशास । केलीं वस्त्रें पांचजणांशीं दिली आज्ञा झुंजायास ॥ पेंढाऱ्याच्या लष्करावरी जा-ऊन ताकिद करिती । ज्याची लुट त्याला मुभा कुणी कुणाची ना घेती ॥ श्रीमंत० ॥ ४ ॥

[1]मोंगलाचे उजवे बाजुला जिवबादादांचें[2] लष्कर । भ-रून तोफा तयार मागें लाऊन दिलें पेंढार ॥ आघाडीला परशुरामभाऊ[3] झोक त्याची तलवार । सीतर पहाड पहा जिवबादादा कंबरक्यांत सोडी बार ॥ धडाधडा तोफेचे बार लागतां पडती स्वार । घ्या घ्या ह्मणुन घाव घालती रक्ताचे वहाती पूर ॥ पळाया कोठें रीघ दिसेना मध्यें शिरलें पेंढार । भाल्यानें टोंचून पाडिती लुटुन घेतलें

---

१ अधिक तीन कडवीं दुसऱ्या एका प्रतींत आह्मांस आढळलीं आहेत. २ शिंयांचा सरदार ३ हे पेशव्यांचे सेनापती होत.

लष्कर ॥ मामलसे शेनखान बसुन हौद्यांतून मारीती तीर ।
मले हाणणार त्या दोघांवर चालविले वार ॥ त्यावर मग
रावरंभानें भली गाजविली तलवार । चारपांचशें लोक
पाडले भले शिपाई रणशूर ॥ परशुरामभाऊचे पुतणे
बळवंतराव झाले ठार । चार प्रहर झुंज झाली साहा घ-
टका चढली रात्र ॥ तरी तोफेचे गोळे राहीना नबाब
झाला मग जार । नबाब कहे रावरंभाकु " क्या हुवा
मुजेपर कहर ॥ बचाव जान आब तो मेरी चल जलदी
तो खरडेपर " । वांचवला नबाब बाजी न आले परतुन
खडर्यावर ॥ जळती चंद्रजोती । नबाब गेला निघुन देखुन
फौजा भोंताल्या पळती ॥ श्रीमंत० ॥ ५ ॥

मोडल्या पालख्या पडले उंट हत्ती सरदार किती ।
कोण करीत गणीत याची कोण कोणाला ना पुसती ॥
बाराशें तोफेचे गोळे चौदाशें बाण सुटती । तोफांच्या
धोधाट्याखालीं गाई बैल घोडे पळती ॥ गांवोगांवचे आले
लुटारी तीं धरून घेऊन जाती । पडली गांठ जर पेंढा-
ऱ्यांची धन तेही स्वतां नेती ॥ कैक झाले गबर कैकांच्या
तोंडीं पडली माती । लुटला दारूगोळा खजिना हत्यारांस
नाहीं गणती ॥ खडर्यावर नबाबाभोंवती श्रीमंतांची झाली
जती । रसद पाणी बंद केली रुपया शेर दाणे विकती ॥
रुपयाचें तांब्याभर पाणी त्यामध्यें अर्धी माती । सिनेवर
झाला येकच कहर फौजा तटातट मरती ॥ दहापांच सर-

दार मिळुन नबाबास अर्जी करीती । करा सल्ला नाहीं तर पाण्याविना फौजा मरती ॥ उमजला नबाब वकील पाठविले रावसाहेबाप्रती[1] । गेले वकील रावसाहेबापुढें जाऊन मुजरे करीती ॥ टाकिले कागद साग्र वृत लिहून पुढें लिहून ठेविती । जें मागाल तें देऊं साहेब सांपडले तुमचे हातीं ॥ नाना[2] भाऊनें[3] चालवलें तुह्मी चालवा तेच रीती । रावसाहेब नानाफडनवीस मग बसून मुनसुबा लिहिती ॥ पांसष्ट लाखांची जहागीर मश्रुलमुलुख दे ह्मणती । आले परतुन वकील कागद नबाबास वाचून दाखवती । नबाब ह्मणे बरें झालें मश्रुलमुलुख दे हातीं ॥ श्रीमंत० ॥ ६ ॥

सोडला नबाब रावसाहेबाचा झाला लौकीक । पांसष्ट लाखांची जहागीर दिला धाडून मश्रुलमुलुख ॥ निघाला मोंगल भागानगराचा[4] धरला रोंख । दरकुच दरमजलीनें श्रीमंतांचें चाललें कटक[5] ॥ झाले दाखल पुण्यावर मुजरे करिती पाहुन जन लोक । यशवंत महाराज सवाई माधवराव झाले अधिक ॥ केल्या मेजवान्या सरदारां दिले पोषाख । जरी झोंक कडीं तोडे कंठी चौकडे दिले हत्ती घोडे मुलुख ॥ शालिवाहान शके १७१६ चा शिमगा एक । दोन प्रहरीं बुडला खळ ज्यावर गोगुलस ॥ गुरुदत्तात्रय

१ सवाई माधवराव पेशवे. २ बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब. ३ सदाशिवरावभाऊ. ४ हैदराबाद. ५ सैन्य.

माहुरगडी शिष्याशीं दिली भाक । चिमणराव रंगनाथ हरीचरणीं ठेवूनियां मस्तक ॥ गांव पाटुंदे बीड प्रगणे वाजाचा तडाखा । दुस्मानावर कमचा उडतां त्याला पडला धाक ॥ राणुगुदाजी गदाजी गडगा वनहार दासी-बाणा जरी झोंक । खंडु फकीरा फुलनाथ गोसावी डफ घेऊन हातीं । साहेबखान गातो बाणीवर गावया पळोन जाती ॥ श्रीमंत० ॥ ७ ॥

मोडल्या पालख्या हत्ती घेऊन पलायन करिती । कुणी करीना त्याची गणती कुणी कुणाला ना पुसती ॥ बाराशें तोफेचे गोळे चवदाशें बाण सुटती । तलवारीनें कइक मेले कइक घायाळ तिथें घुमती ॥ पडली गांठ पेंढाऱ्यांची ते हिसकुन घेऊन जाती । श्रीमंतांनीं नबाबाला खर्ड्यावर केली जप्ती ॥ कइक झाले अमर कइकांच्या तोंडीं पडली माती । रुपयाचें तांब्याभर पाणी त्यामध्यें अर्धी माती ॥ दहा पांच सरदार मिळून नबाबास आर्जव करिती । नाना भाऊंनीं चालवलें तें चालावें कोण्या रीती ॥ बाळा लक्ष्मण गातो पवाडा हमेश बसुनिया एकांतीं । उलटले वकील कागद नबाबास वाचून दाविती ॥ बासष्ट लाखांची जहागीर मश्रुउलमुलूक द्यावा हातीं ॥ श्रीमंत० ॥ ८ ॥

---

## १४. त्याच विषयावर चवथा पोवाडा.

हा पोवाडा अनंतफंदीकृत आहे. अनंतफंदी हा संगमनेरचा राहणारा यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण होता. ह्याची कविता प्रायः कटिबंध व लावणी ह्या छंदांत आहे. पुणें, बडोदें, महेश्वर, ग्वाल्हेर, सांगली, मिरज इत्यादि राजधान्या, शहरें व पुण्यक्षेत्रें हिंडून व तेथील माहिती मिळवून निरनिराळ्या विषयांवर ह्यानें पुष्कळ कविता केली आहे. त्यांत सवाई माधवरान पेशव्यावर रचिलेला ' माधवकाव्य ' नांवाचा ग्रंथ फार सुरस आहे. हा ग्रंथ फार मोठा असल्यामुळें ह्या पुस्तकांत त्याचा समावेश केला नाहीं. बाकीची ऐतिहासिक कविता बहुतेक ह्यांत घेतली आहे.

चाल—' श्रीकृष्णानें सुदामजीला सोन्याची नगरी दिधली '—अमृतराय.

**सवाई माधवराव सवाई भाग्योदय ज्याचे पदरीं । यशवंत श्रीमंत पेशवे अपेश तेथें पाणी भरी ॥ ध्रुपद ॥**

**श्रीमंत सवाई नांव पावले । दिव्य तनु जशी चित्रबाहुलें । विचित्रपुण्य जरी समावलें । नाना ते राज्याचे आवले । विधात्यानें नेमून ठेविले । बसल्याजागीं कैक छपविले । उन्मत्त जाले तेच खपविले । अतिरथि कूळ दोरींत ओविले । जगवायाचे तेच जगविले । मग तमाम शत्रु नागविले । तपसामर्थ्यें अपेश लपविलें । दिल्ली आग्र्यावर झेंडे रोविले । अटक करनाटकांत भवले । जिकडे पहावें तिकडे उदवले । माधवराव पुण्याचीं पाउलें । टिपू-**

सारिखे मुठींत घावले । मेणापरीस मृदु वांकविले । सवाई तेजापुढें धाकले । पुण्य सबळ उत्कृष्ट फांकलें । नानापुढें बुद्धिवान् चकले । कैक त्याची तालीम शिकले । तरी ते अपक्व नाहीं पिकले । ज्यांणीं दहावीस वर्षें स्वराज्य हांकिलें । श्रीमंतांचें तक्त राखिलें । अक्कलवंत कोठेंही न थकले । श्रीमंत गर्भीं असतां एकले । नानांनीं राज्य ठोकून हांकिलें । माझे करून महामाव केले । जहाज बुद्धिबळें जवकलें । यावतकाळपावेतों टिकलें । श्रीमंत पाहून धनचर छकले । छोटेखानी कैक दबकले । जे स्वामीचरणास लुचकले । ते तरले परकड अंतरले । मीपणांत जे गर्वें भरले । ते नानांनीं हस्तकीं न धरले । ते साहेब सेवेंत घसरले । मग त्यांचे पुण्योदय सरले । न जन्मले माते उदरीं । घाशिराम कोतवाल त्यावर उलथून पडली ब्रह्मपुरी ॥ सवाई माधवराव सवाई भाग्योदय ज्याचे पदरीं । यशवंत श्रीमंत पेशवे अपेश तेथें पाणी भरी ॥ १ ॥

श्रीमंतांचें पुण्य सबळ कीं । न्यून पडेना पदार्थ एकही । महान्न झाले भिन्नमनोमय खिन्न करूनियां शत्रुच्या शकले । मधें मधें एक चिन्ह उदवलें । नवाब झाला सिद्ध करूं ह्मणे राज्य आपण पृथ्वीचें सारें । गरिबाचे मोडून पसारे । वकील धाडूनियां परभारें । हळूच लावले सारे दोरे । ह्मणे युद्ध करा धरा हत्यारें । त्यामुळें वीरश्रीच्या मारें । शहर पुण्याच्या बाहेर डेरे । गारपिरावर दिधले डेरे ।

श्रीमंतांला जैजैकारें । होळकरास धाडिलें बोलावून । छोटे मोठे समग्र येऊन । वडिलपणानें जय संपादा । पाटील गेले ते विष्णुपदा । जबर त्यांची सबसे ज्यादा । गादीवर दवलतराव शिंदा । बहुत शिपायांचा पोशिंदा । त्याच्या नांवें करूनि सनदा । लष्करी एकही नाहीं अंजुरदा[1] । त्याचे पदरचे जिवबादादासुद्धां । आणविले परशुरामभाऊ मिरजवाले । नागपुराकडून आले भोंसले । बाबा[2]फडके आपा[3]बळवंत । बजाबाबापू शिरोळकर माधवरावरास्ते । राजेबहादर गोविंदराव पिंगळे । विठ्ठलसिंग आणिक देवरंगराव वढेकर । गोडबोले राघोपंत जयवंत पानशे । मालोजीराजे घोरपडे । दाजीबा पाटणकर । अष्टप्रधानांतील प्रतिनिधि । फाकडे मानाजी मागून आले । चक्रदेव नारोपंत भले । दाभाडे निंबाळकर हे उभेच ठेले । रामराव दरेकर चमकले । वकील रामजी पाटील झुकले । मग याशिवाय चुकले मुकले कोण पाह्याला गेले आपले । तमाम पागेपतके बेरोजगारी घेऊनि कुतके । अचाट फौजा मिळून आले । वळून गेले जुळून संगम झाला । तीन लक्षांचा एकच ठेला । त्यामधीं नाना ते कुलकला । होणारी शंकर नाना बंदुखानी तोफा कर्णाला । वाद्यें रणभेरी कर्णाला । गणिता नाहीं श्यामकर्णाला मरणाला ना भीत । घोडे पुढें धडकावूनी नाना सहवर्त-

---

१ दुःखी. २ हरीपंत फडक्याचे हे चिरंजीव. ३ मेहेंदळे.

मान पुण्यांत आले राउत । तमाम दुनिया आली पाह्याला । कन्हया माधवराव फुलांचा झेला । पेशव्यांनीं कुच केला । सवेंचि मोंगलही सावध झाला । याचा त्याचा पाण्यावरूनि तंटा झाला । तो तंटा नित्यानींच वाढला । श्रीमंतांनीं करूनि हल्ला । घ्या घ्या ह्मणून कैक धुडावून दिले लुढावून मोंगल गोगलगाय । करूनियां पृथ्वी देईना ठाय । मोकली धाय करीत हाय हाय । तेव्हां लेंकरा विसरली माय । कैक जरबानें खालीं पाहे । कीं सर्पासन्निध उंदीर जाय । असा मृदु मोंगल केला । शरण आला मग मरण कसें चिंतावें त्याला । उभयतां पक्षीं सल्ला झाला । पुढें मग महाल मुलुख कांहीं घेतो देतो श्रीमंताला । ते आपल्याला कोण सांगतो आतां पुढें जे उडेल मोतु[1] । तेव्हां कळेल कीं अमके महाल अमके धोतु[2] । पडली पोंतु[3] नबाबाला । रहस्य राखून रंग मारला । पुढें ठेविली[4] अस्ता । रस्ता धरून पुण्याचा थाट दुरस्ता । नबाबावर कंबरबस्ता । फिरून आले वळून एक एक नानापरीच्या वस्ता । सस्ता दाणापाणी वाद्यांसहवर्तमान मधुलमुलुख कैद करूनियां श्रीमंतांनीं कारागृहीं ठेविला । एथुनी पवाडा समाप्त जहाला । सबशहरीं संगमनेरीं । फंदी अनंत कटिबंद छंद ललकारी । श्रीमंतांचें दरबारीं ॥

---

१ बातमी. २ नाणें. ३ दक्षिणा. ४ हा पोवाडा लढाई होतांच केला असावा.

सवाई माधवराव सवाई भाग्योदय ज्याचे पदरीं । यशवंत श्रीमंत पेशवे अपेश तेथें पाणी भरी ॥ २ ॥

---

## १५. त्याच विषयावर पांचवा पोवाडा.

हा पोवाडा होनाजी बाळ कविकृत आहे. होनाजी बाळ जातीचा गवळी असून, पेशावाईचे अखेरीस पुण्यास राहात होता. ह्याची कविता सरळ आणि गोड म्हणून नांवाजलेली आहे. "घन-श्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला " ह्या प्रसिद्ध व लोकप्रिय भुपाळीवरून ह्याच्या कवितेची योग्यता वाचकांच्या लक्षांत येईल.

चाल—'वसंतीं बघुनि मेनकेला। गाधिज मुनिनें निज०'—किर्लोस्कर.

त्रेतायुगीं शूर पाही । परशुराम विख्यात, कलिंत माधवरावसवाई ॥ ध्रुपद ॥

एकवीस वेळां धरत्री । फरशधरें अति पराक्रमें कुंभिनी केली निःक्षेत्री । माघ शुभनक्षत्रीं । पुरंदरीं जन्मतां दक्षिणेमध्यें राज्य एकछत्री । नाना प्रधान मंत्री । श्रीमंत गर्भीं असतां राज्य रक्षिलें आराधुन यंत्री ॥ ( चाल )॥ किर्ती दिगंतरीं मिरवे। जे महा महा दळ दक्षण उरवे । करून पुंडाई वर्तती गर्वे । अजिंक शत्रु जिंकुनि सर्वे । त्यांच्या मुखें वदविलें बर्वे । श्रीमंतांसन्मुख युद्ध न करवे । स्वकरें बुद्धी शस्त्र न धरवे ॥ ( चाल )॥ नाना ज्ञानगभस्ती आस्ता । करी स्वराज्य न्यून न दिसतां । मुलखामध्यें चौथाई शिरस्ता । शहर पुण्याशीं येती

रस्ता । जयजय धर्मराज इंद्रप्रस्ता । तैसे श्रीमंत तक्तीं बैसतां । सन्निध नाना दिपिच्या बस्ता । मोंगलावर कंबर-बस्ता । युद्धीं गवस्ता काय अवस्था । तें कथन बुध श्रवणीं वरषतां । वाटे प्रजेशीं सौख्य समस्तां । ऐकुनि हे व्यवस्था सारी ॥ (चाल) ॥ आहारे आवधे भूप तयारी । पर्वतीस जाते जंव स्वारी । गजपृष्ठीं आदर्शअंबारी । चोपदार ललकारी भारी । हारोहारी रयत व्यापारीं । साव-कारी मुजरे होतां मग मान तया साहेब दरबारीं ॥ ( चाल ) ॥ नानाची चतुराई धन्य तयाचें करणें दुसरी उपमा नाहीं ॥ त्रेतायुगीं० ॥ १ ॥

अमृत वेळ सुमुहूर्तीं । गारापिरावर डेरे दिधले शत्रुशीं बांधुन शर्ती । रणीं पण केल्या अर्थीं । नानाचें शौर्य तेज जें अर्जुन जैद्रथ वधार्थीं । दळ तीन लक्षांची भरती । व्हावयास नानाचीं धाडिलीं पत्रें देशावरती ॥ (चाल) ॥ कोण कोण सरदार ते न कळे । प्रळयकाळ शत्रुशीं तमले । वैकुंठीं यशाचे इमले । बांधुन मग सुरवंशीं जन्मले । तें श्रवण करा कथनीं न कळलें । जरीपटक्याचे सर्वे नेमिले । बाबाफडके हुजरातींतले । मानकरी शत्रुशीं तमले । शिरीं समले लाउन निकरानें ॥ ( चाल ) ॥ धायगुडे पाटणकर माने । जाधव यादव रणाभिमानें । घोरपडे केवडे मर्दाने । निंबाळकर पांढरे स्फुराणे । ढमढेरे बरे सन्मानें । उभे आपआपल्या बाजुनें । हुजरातींतले नामा-

भिधानें । किंचित कथलीं यथामतीनें । मध्यम पतकीं हिंदुस्थानें । विंचुरकर पवार धिरानें । उभे सडे फौजेंत भरानें ॥ ( चाल ) ॥ राजे बाहादर रंगराव होळकर स्वतां आदी उमराव । तयाचें जाहीर पृथ्वीवर नांव । प्रतापि शिंदे दौलतराव । सैन्य समुदाव संमंधी ॥ ( चाल ) ॥ जिवबादादा ते रणफंदी । काबीज हिंदुस्थान सिबंदी । करुन आले दक्षिण संधी । मिरजवाले भोंसले सुबुद्धी । आपा बळवंतराव निशाधी । ते परशुरामपंत प्रतिनिधी । वजाबाबापु ते स्थीरबुद्धी । फिरंगाणी हापसाणी सिद्धी । फराशीस आरबस्तानी सिंधी । चंदीचंदावर बुंदी । कोट्याचे नृपाळ असंख्य सर्वे शूरांची मांदी । धनी माधवराव त्यामधीं । प्रवर्तले मग मोंगल युद्धीं । राज्य अविंधी बुडउन होतां किंचित अवाधि । परागंदा शत्रुशीं करूं ह्मणती । द्वादश कोस तळाची गणती । महा महा मागिल युद्धांतीं । सैन्य न कळे तें पैवस्ती । वाडिल वृद्ध आश्चर्य सांगती । धन्यधन्य नानाच्या युक्ती ॥ ( चाल ) ॥ असो शत्रुच्या पराजयालागीं वेळ होती । मजलोमजलीं चढाई करुन चाललें सैन्य पुढें नेमुन सन्मुख लढाई । त्रेतायुगीं शूर पाही । परशुराम० ॥ २ ॥

युद्धप्रसंगकाळीं । मोंगल दळरण युक्तीशीं[1] सादर श्रीमंत सैन्य मुऱ्हाळी । होतां रणखंदाळी । यंत्राचे भाडिमार न दिसे धूम्रें सूर्य निराळीं[2] । मोकलितां शरजाळीं । भया-

---

१ मुक्तीशीं ! २ आकाशांत.

भीत गज अश्व शूर शत्रुसैन्य माळोमाळीं ॥ ( चाल ) ॥ येकच रणवाद्याची घाई । वीरश्रीची घुमराई । अचळ-प्राय मत्तकुंजर शाई । चक्राकार उभे शूर पाई । दळ अशिलता धरुन करा पाई ॥ ( चाल ) ॥ ठाईं ठाईं रथ शोभिवंत मग दाही दिशा चवताळती वारू । असी त्रादा असीवार तोंठाईं । थाट पुढें शत्रुचा देखोन हाट करुनीयां साठ तुरंगा । जाणउन मग गांठ घालिती । प्राणाशीं दुजार्यींच्या दाउन ऊर्ध्व वाट माघारे फिरती । दाट पराक्रम तुमचा साहेब अफाट कीर्ती । वडला वडली मार असे जव पडती । चढती कळा धन्याची जाणुन वीर असे भीडती । तेथें चढती मारुन अडती कैक नरमुंडे पडती । झडती घे यासीं येक येकाशीं उलटे । किंवा काळच परसैन्यावर उलटे । पापभार शत्रु निवटले फुटल परदळ लुटलें । अवघें विटलें । मोंगल मल्ल युद्धासीं उ-ठले । मागें इतक्यांत यशस्वी । श्रीमंत वीर प्रगटले । बळें लगटले । खटलेखोर तो मश्रुलमुलुख । त्यास विगटले[१] । घाबरलें दळ त्यांचें पळाया । पुढें वीर सरले । गांग-रले परिवारासहित हरिले । अवघे पराक्रम भुवनत्रयीं भरले । जें शत्रुचें मीपण हरलें । कारागृहीं ठेवावें ठरलें । सब सैन्य जयवंतराव साहेबांचें फिरलें ॥ ( चाल ) ॥ फिरलें जिकडे तिकडे सारें । विनहत्यारें येती शरण तृषेचे

---

[१] निटले.

मारें[1] । पाणी पाजुन प्राण वांचवा । ह्मणती हे परभारें वार्ता । ऐकुन कानीं श्रीमंतांनीं । आज्ञा दिधली नाहीं मनाई । कोणाशीं पाणी द्या सर्वांशीं । इकडे आज्ञा वकिलाशीं । चवथाई आणखी माहाल मुलुख पूर्वींचा होता तो मागुन घ्या त्याशीं । श्रीमंत आज्ञेनें नवाबाशीं मग वकिल भेटले । चवथाई मुलुखाचें निवेदन श्रुत केलें । मग वकिल आदरें गौरविले । त्या करें त्वरें मग । तें कबुलायतपत्र दिधलें । वाचितांच श्रीमंत हर्षयुक्त मनीं झाले । जय संपादुन शहर पुण्याशीं येउन आदरले ॥ ( चाल ) ॥ करुन नगोंची[2] राई । जयवाद्यें वाजवीत परतली श्रीमंतांची शाई ॥ त्रेतायुगीं० ॥ ३ ॥

शृंगारुन गजातें । आदर्श अंबारींत । करिती शूर मुजरे पिटुन भुजातें । उभवुन यश ध्वजातें । पुणें मार्गीं लागले हें ऐकुन श्रवणीं सौख्य प्रजातें । आनंदरूप द्विजांतें । ठेवूनियां श्रीराम आले भेटायाला भरतानुजातें । स्नेहसद्गदीत नंदीग्रामीं । तैसे श्रीमंत थेऊर मुक्कामीं । स्वामी देखुन स्वसेवका सुख अंतरयामीं । व्योमींहून[3] सुरपुष्पवृष्टि करिताती सकळिका । सरंजामी ते सरदार तैनामी । स्वामी सन्निध शोभताती । अती सव्यवामीं[4] । कामीं पडले

---

१ तृषेच्या व्यथेनें. २ पर्वताची राई केली म्हणजे पर्वतासारखा जो मोठा मोंगल त्यास जिंकून राईसारखें लघुत्व आणिलें. ३ स्वर्गाहून. ४ उजव्या डाव्या बाजूस.

रणसंग्रामीं । मुहूर्त शुभ पाहुन स्वधामीं । यावयास जमावले । ताकीद शहरांतील रस्ते झाडा ऐसें ऐकतां दूत धांवले । निर्मळ रस्ते करुन दुतर्फा दीप लावले । नगर लोक पहावया धांवले । पाहुन मन विश्रांती पावलें । बे समयीं कोणाचे कसें जिवीं भासलें । पूर्व तपश्चर्येचें फळ आज उद्भवलें । कीं श्रीमंत रुप या दृष्टीमाजी समावलें । सर्वांनीं धन्याशीं पोहोंचविलें । वाड्यांत आनंदें बैसविलें । गादीवर साहेब मग मुजरे करून सकळ शूरांनीं । त्वरेनें निरोपावारे घेतले स्वनगरासीं जाया इच्छिलें । येथुन मोंगलयुद्ध संपलें । श्रेष्ठ भाग्य रायाचें केवढें । शके सोळाशें शहाण्णवांतील जन्म । धन्य तैधींपासून[1] या दिवसोंदिवशीं । राज्याचीं चिन्हें दाखविली लिला । अद्भुत हे किर्ती गाजती । सर करुनियां सर्व ही सृष्टी । शके सतराशें सत्तर राक्षसनाम संवत्सरीं । शुक्लपक्ष अश्विनी पौर्णिमा । ते दिवशीं सायंकाळीं मग संपविला अवतार आपला । श्रीशांत[2] सिद्ध कृपावरें । होनाजी बाळा करीं कवन रसिक जें जनांसीं प्रिय या । श्रीमंत राज्यामधीं प्रजेला सुखअपार, ऋषी महान महान कल्याण वांच्छिती । गादीचा अधिकार ज्याला लक्ष श्रीमंता पायीं । लावुनी रामा अंदु निशिदिनीं रसिक कवनरस गाई ॥ त्रेतायुगीं शूर पाही । परशुराम विख्यात कलिंत० ॥ ४ ॥

---

१ तेव्हांपासून. २ गुरु. यांची समाधि येथें संगमावर आहे.

## १६. त्याच विषयावर सहावा पोवाडा.

हा पोवाडा रामचंद्रकविकृत आहे.

चाल—छोटेपणसे प्रीत लगाई वचन मेरेकु दिया ।
आतां कां पातळ केलिस माया ॥ —सीताराम.

हिंदुस्थान गुजरात सोडून शिंदा दक्खनेंत आला ॥
हुकूम केला बादशाहानें त्याला ॥ ध्रुपद ॥

मजल दरमजल नर्मदा उतरून आले पार । धरला दक्खनचा सुमार[1] । बेगुबेग येऊनि त्यांणीं घेतलें गंगातीर[2] । फौज होती चाळिस हजार । मनीं मनसुबा करुनि चढले बालेघाटावर । धरला व्यंकाजी तस्कर । मग कित्येकांस जरब पोंचली मरुन झाले चूर । पळाले पुंड पाळेकर । तेथून जलदिनें कूच करूनी दाखल तुळजापूर । आले दक्खनांत झालें जाहिर । दक्खनदेशीं अंबा भवानी दैवत अनिवार । देवीस केला नमस्कार ॥ ( चाल ) ॥ दिलें तळजापूर सोडूनी । गेले चंद्रभागा उतरूनी । खबर ऐकिली श्रीमंतांनीं । दोन कोस आले चालुनी । भेटले हाडपसराच्या रानीं । नेमिली पुण्याची छावणी । जवळ पेठ आहे भवानी । मुक्काम वानवडीवर केला ॥ हिंदुस्थान० ॥ १ ॥

सहा चार महिने तिथें गुजरले पुण्यास येऊनी । मनसुबा बहु सबळ करूनी । नवाबांस पत्र लिहिलें फार

१ शिंदे दक्षणेंत सन १७९२ मध्यें आले. २ गंगा=गोदावरी.

फार अर्जिनीं। खर्चि द्या आह्मांस पाठवुनी। जासुद जोड्या केल्या रवाना पोंचल्या जाऊनी। पत्र टाकिलें मुजरे करुनी। नबाब, बाहादूर मश्चुल्‌मुलुख एक मसलत करुनी। पत्र पाहिलें त्यांनीं। वाचून परगण्यावर चिठ्या नेमिल्या समय मग पाहुनी। नगदी ऐवज दिला लावुनी। पांसष्ट लाख रुपये पोंचले नाहीं भरलें मनीं। दक्खनचा हिशोब घेऊं भरुनी ॥ (चाल) ॥ ऐसें करणें भगवंताला। हिंदुस्थान ज्यानें काबिज केला। परतुन दक्खनामधिं आला। पुणें शहरीं काळ[1] झाला। खबर कळली नबाबाला। नबाब बेदरावरी आला। खरें खोटें भासे लोकांला। तक्तीं दवलतराव स्थापिला। हुकूम केला बादशहानें त्याला ॥ हिंदुस्थान० ॥ २ ॥

नबाबानें पत्र लिहिलें श्रीमंत नानाशीं। शिवाय दवलतराव बापूशीं। पांसष्ट लाख रुपये आम्हीं कर्ज दिलें शिंद्याशीं। लवकर द्या आमचे आम्हांशी। आटोकाट सरदार मिळोनी बसले मनसुब्याशीं। क्रोध आला दवलतरावाशीं। तुह्मी बसून रहा पुणें शहरीं हुकुम करा आह्माशीं। पाहुन घेतों नबाबाशीं। तमाम फौजा मिळोनि दिले रोजमुरे त्यांशीं। बोलाविलें जिवबादादाशीं। तिथें नेवत असलां तर इथें या तुम्ही पाणी प्यायाशी। घेऊनि देवजी गवळ्याशीं ॥ (चाल) ॥ येऊनि लवकर पोंचले।

---

१ ता. १२ फेब्रवारी सन १७९४ रोजीं वानवडी येथें महादजी शिंदे मृत्यु पावले.

श्रीमंत पुण्याबाहेर निघाले । मुळामुठावर डेरे दिले । बावन उमराव मिळाले । एकंदर बसुनि मनसुबे केले । भोंसले तेहि लवकर आले । शिंदे अघाडीस घातले । येऊन सिनेवर शह दिला ॥ हिंदुस्थान० ॥ ३ ॥

बेदर सोडुन नबाब लवकर बाहेर निघाले । अमीर उमराव संगें घेतले । चला चला म्हणून लवकर धारूसावर आले । पुण्याकडे झेंडे फिरविले । तेथुन जलदिनें कूच करूनी वांजरानदीवर आले । फिरंगी अघाडीस घातले । शेकसलाची[1] करूं कंदुरी[2] मशीरन बोलले । पेशवे थरथरां कांपूं लागले । पांसष्ट लाखांचा मुलुख मागतां तोही विसरून गेले । स्वप्नीं नबाब दिसूं लागले । सांडणीवरती सांडणी फिरती डांकवाले बसविले । वरचेवर बातमी आणवूं लागले ॥ ( चाल ) ॥ घाट उतरले मोहोरीचा । मार्ग धरिला पुण्याचा । एकच गट करुनि फौजेचा । माळ चढले नायगांवाचा । तकवा आला तिकडुन पेशव्यांचा । निश्चय केला यांनीं झुंजायाचा । धडाधड बार सुटे तोफेचा । मुसा[3] रहिमानचा मोर्चा तुडविला ॥ हिंदुस्थान० ॥ ४ ॥

नबाबानें मोर्चा तुडविला कळलें श्रीमंताला । अंजुरदे[4] जाले बहु मनाला । अमीर सारे बोलावूनी आणिले

---

१ पुण्यांतील शेकसल्ला. २ महंमदाची मुलगी फतिमा इच्या नांवानें मुसलमान उत्सव करितात तो. ३ मुसा रहिमान हा पेशव्यांचा आरब सरदार होता. ४ खिन्न.

डेऱ्याला । वक्त हा बुडायाचा आला । नानाफडनवीस एक मसूदी तर्क त्यानें काढिला । बोलाविलें जिवबादादाला । तुह्मीं अघाडीस असतां मनसुबा कसा नाहिं कळला । नवाब गफलतीनें आला । तीच विरश्री धरून सड्या फौजा अघाडीला । चुरस लागली तेव्हां शिंद्याला । भिमराव पानसे तोफखाना त्यांचे हवालीं केला । फिरंगी लोक तैनातीला ॥ ( चाल ) ॥ पेशव्यांनीं विंचरणा रोंखून । सड्या फौजा पुढें देऊन । रास्त्यांनीं एक अलंग धरून । फडक्यांनीं तवाफरा बांधुन । राजे बहादर नाम निशाण । फौजा नानाच्या आधीन । तेथें मिळाले अष्ट प्रधान । हौद्याशीं हौदा भिडुनी गेला ॥ हिंदुस्थान० ॥५॥

करून स्वारी तयार नवाब जरद्या अंबारींत । बेगमां-पुढें हुजुरात । त्यांची उमेदवारी पेशवे सर करूं सहजांत । बांधली राजानीं हिंमत । मश्रुलमुलुख त्याचे मसूदी राजा नेमिवंत । झाडुन फौजा त्याच्या अंकित । रोशनखा परविनीवाले नबाबाच्या हुकुमांत । भरअमल दोन्ही दळांत मांहीत । इस्मालखा पठाण गारदी त्यांचे संगत ।

१ मुत्सद्दी. एक मसूदी=अद्वितीय राजकारणी पुरुष. २ पुणें येथील शुक्रवारांतील पानसे यांचे पूर्वज. ३ लांब ओळ, बाजू. ४ एक बाजू. ५ स्वाधीन ! ६ नवाबाचा जनानखांना बरोबर हत्तीवर वागत असे. ७ मुत्सद्दी.

नामी [1]करवळ आहे हुजुरांत । फाजलखा रोहिले खांसि बारा हजार जमात । जंबुरे जोडुन उंटावरत ॥ (चाल) ॥ नबाबानें हल्ला केली । फौज लोणीचा माळ चढली । दोन्ही दळें उभीं ठाकलीं । नामीसरदार आसतअल्ली । तोफखान्याला शि[2]लक दिली । देवडी मार जेव्हां बसविली । पेशव्यांची फौज मागें हटविली । फिरुन खरनदीवर मुक्काम केला ॥ हिंदुस्थान० ॥ ६ ॥

रातोरात आणून तोफखाना जोडिला जिवबादादांनीं । लोणीगारमाळ पसरुनी । एकापरीस एक शिपाई रांगडा हिंदुस्थानी । दोन कंपू फिरंगाणी । मन्याबापू भोंसले परशुरामभाऊ आज्ञा घेऊनी । एक मोर्चा त्यांनीं रोंखुनी । भवानराव प्रतिनिधी आले अ[3]नुपान भोगुनी । एक मोर्चा त्यांनीं रोंखुनी । चौकोसांची लांबण पडली कोणांत नाहीं कोणी । [4]बहिऱ्यामधीं फौज गेली मिसळुनी ॥ ( चाल ) ॥ तोफेचा एकच वर्षला कहर । गगनीं लागुनी गेला धूर । मायेशीं पा[5]रखलें लेंकुर । नबाबाशीं कळुन आला फितूर । मजल काय सुटेल तोफेचा बार । पांचजण निवडले रणशूर । मुसा रहिमुनचें बुडविलें लष्कर । [6]रमणा बहुत तिथें मातला ॥ हिंदुस्थान० ॥ ७ ॥

---

१ बंदुकीस्वार. २ सरबत्ती. ३ ! ४ तोफांच्या आवाजामुळें बहिरेपणा आला होता. ५ पारखलें=परकें झालें; त्याची ओळख बुजाली. ६ तुमुल युद्ध, हातघाईची लढाई, गर्दी.

लालखान वजीरखान ह्यांनीं रणांत घोडीं घातलीं । परशुरामभाऊशीं जखम चढविली । दाजी साहेब येथें शामजंगास स्वारी केली । पठाणी लोक संग हाटेली । कटाव करीत चालले जेव्हां तिराचे मार बसविली ॥ भोंसल्यानें गर्द बाण उडविली । वजिरखानाशीं बाण लागतां हौद्यांत जान[1] सोडिली । लालखांची सुद नाहीं लागली । बाळासाहेब ठार जहाले मस्त[2] सेना पडली । खना खना लव्हागर्द उडाली । भले भले सरदार ह्यांनीं बहिरीत तोंडें घातलीं । अंबारी नवाबानें फिरविली ॥ ( चाल ) ॥ लोक लोक आले चेंदत । नवाब मश्रुलमुलुक हौद्यांत । आनंदराव किल्ला ठेवा नजरेंत । हावाई लाविली किल्ल्यांत । नवाब दाखल सुलतान दुर्गांत । बुणगे आले शिक्पटणाभोंवत । वेढा काय शिंद्याचा पडला । हुकुम केला बादशाहानें त्याला ॥ हिंदुस्थान० ॥ ८ ॥

खरनदीवर दिले मोर्चे किल्ल्याशीं रोंखून । फौज नबाबाची घेरून । जिवबादादा श्रीमंतांशीं बोले अर्ज करून । नबाबास क्षणांत घेईन लुटून । लुटल्यावांचून कारण नाहीं बसा शह देऊन । नाना करील तेंच प्रमाण । बेदंडयासी[3] हुकुम टाका रस्ते बंद करून । रुपया शेर तेंव्हां मिळेना अन्न । पाण्यावांचुनी फौज तैरसली[4] नबाबानें ऐकून । सल्ल्यास धाडिले गोविंद किसन ॥ (चाल) ॥ गोविंद किसन

---

१ जीव. २ मस्तसेना ! ३ पेंढाऱ्याशीं ! ४ त्रासली.

आले परतून । नबाबाशीं वर्त्तमान सुचवून । मश्रुलमुलुख दिले पाठवून । पेशव्यांनीं टाकिलें कैद करून । जसा सापळ्यांत व्याघ्र कोंडून । नबाबांशीं नानाचें वचन । खातरजमा झाली येथून । अवघा चित्तिचा विकल्प उडाला । हुकुम केला बादशाहानें त्याला ॥ हिंदुस्थान० ॥९॥

शके सत्राशें सोळा आनंदनाम संवत्सर । फाल्गुन वद्य षष्ठी बुधवार । किल्ल्यामधिं येऊनि नबाबासीं आठवला विचार । द्यावी निंबाळकराशीं जाहागीर । नबाब बोलतां हजर विश्वासराव बापू सुपेकर । आणाविले आपासाहेब निंबाळकर । भेट घेऊनियां करा कुचाचा विचार । किल्ल्यामधिं सदरजहा बाहादूर । शके सत्राशें सत्रा राक्षसनाम संवत्सर । चैत्र पौर्णिमा शुक्रवार । दळभार घेऊन नबाब वांजरानदीच्या वर । संगे होते निंबाळकर ॥ (चाल) ॥ करुनिया अखेर त्यावेळेस । नबाब गेले भागानगरास । श्रीमंत पोंचले थेट पुण्यास । गैबिचें देणें भुजंग आयास । कादरभाई चाकरू दिले बिनीस । त्यांनीं जाऊनि गांठिलें हारदास । रामचंद्र गातो मजलशीला । हिंदुस्थान गुजराथ सोडुनी शिंदा दक्खनेंत आला । हुकूम केला बादशाहानें त्याला ॥ १० ॥

---

## १७. त्याच विषयावर सातवा पोवाडा.

चाल–निजामाशीं लढले सवाईमाधवराव । मराठे मुसलमानांत अखेरचा डाव ॥

—कुशाग्रमति.

श्रीमंत धनी महाराज माधवराव । गोकुळीं उभारल्या गुढ्या जन्मला देव ॥ ध्रुपद ॥

तो पांडवांचा अर्जुन यशेश्वरी । ती पहिली निघाली स्वारी मोंगलावरी । त्यांनीं डेरे दिले गारपीरावरी । तो मोंगलाचा वकील विनंत्या करी । ते दवलतराव शिंदे अघाडीबिनीवरी । त्या होळकराची फौज धासत भारी । त्या बाबा फडक्याचीं कोरबंदी न्यारी । त्या जरीपटक्याखालीं हुजुरात चाले सारी ॥ (चाल) ॥ राव माने मानकरी । घाडगे पाटणकर यादव निंबाळकर ॥ ( चाल ) ॥ ते अंडगर बंडगर न्यारे आणिक पांढऱ्या पट्याची धार । ते धारुरकर भोंसले कीं सुपेकर स्वारी बरोबर । मोहिते न शिरके येऊन मिळाले रणाचे वर । ते गणेशपंत ढमढेरे आले बहादूर कि सवते दूर । ते मानाजी फाकडे भले रणशूर मारी तलवार ॥ (चाल) ॥ चालतांना स्वारी शोभती । कोरबंदी जपुन चालती । अशा सरदाराच्या गणती । कालुकर्णे बाजे होती । आपलाल्या बिनीवर हत्ती । पुढें सांडणीस्वार धांवती ॥ (चाल पहिली) ॥ घोडदळ पायदळ कुठवर पाहूं ॥ गोकुळीं० ॥ श्रीमंत धनी० ॥ १ ॥

तो पहिला शहाणा नांव साज । त्यानें श्रीमंताचें भलें राखिलें राज्य । अशीं पुण्यपवित्र खलवतें होती रोज ।

ते पंतप्रतिनिधी सुर्याचें तेज । ते आपाजी बळवंतराव भुजेशीं भुज । ते भवानराव घाटगे नांव साज । त्या पानशावर रावसाहेबाची रीझ । त्या राज्याचा हमेश डंका वाज ॥ (चाल) ॥ अशी गडबड झाली फार शिलेदारा घोडें मिळेना । दोशांचें घोडें चौशांला अशा खाशाला कोणी देईना । विसाचें तट्टु साठाला अशा दाटीला कुठें मिळेना । भीवरेवर पडला तळ रयत तळमळे नजर थांबेना । दाण्याचें झालें हांतरुण खुशाल पाहून कोणी घेईना । बायकोचें काढलें मोतीं घेतलें हातीं गुजर ठेविना । टक्याचें रुकें पायलीला दळणवालीला दळुन देईना ॥ (चाल) ॥ तीनलक्ष मिळालें दळ । आपुलाले धरती बल । लष्करांत पडली भुल । मोठे मोठे कीं लढनेवाले ॥ ते विठ्ठल शिवदेव नारो शंकरभाऊ ॥ गोकुळीं० ॥ श्रीमंत धनी० ॥ २ ॥

गेले कागद नागपुरा कीं भोंसल्याला । दरकुच येऊन सिनेवरती मिळाला । तो जिवबादादा बक्षी अलबेला । ते वेळे काय बोलला रावसाहेबाला । तो कसला कसा मोंगल आहे पाहुंद्या मजला । तो डीबाय फिरंगी गोळा मारनेवाला । फौजेंत केली ताकीद सडे स्वारीला । त्या गणेशपंत बेहऱ्याला बाबा फडक्याला । त्या परशुराम भाऊला जिवबा दादाला । तुह्मीं मिळुनशेनी जावें झुंजायाला ॥ (चाल) ॥ मोंगलानें गलिम पाहिला घोडा उठ-

विला कीं त्या रंगणांत । भले भले माईचे पूत सुरई हातांत मारिती हात । तो रावरंभा सरदार बसून हौद्यांत तिरंदाजींत । ते मश्रुल्मुलुख हत्तीच्या हौद्यांत बसून हणा हणा ह्मणवीत । बहु कोस मागें सारिला मार पडली हुजरातिला । त्या परशुराम भाऊला बाबा फडक्याला । जखमा चढल्या मरदांला । अशा कैक एकांड्याला ॥ रणखांब रोविला मुक्काम घोडेगांव ॥ गोकुळीं० ॥ श्रीमंत धनी० ॥३॥

आला मोंगल देशावरी कळल्या खबरी । गांवनगांव ओस पडलीं सारीं । ही पुण्यप्रतापी रावसाहेबाची स्वारी । त्या शाहुराजाचा हात पुरता शिरीं । त्या बुधवारच्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं । त्या जिवबादादानें तोफा लाविल्या दोहिरी । त्या भोंसल्याच्या बाणाच्या भरारी । त्या हनुमंतानें लंका जाळिली सारी । तेंवि सवाई माधवराव यशस्वरी । हणा हणा ह्मणुन निशाणें उठलीं सारीं ॥ (चाल) ॥ मोंगलानें गलीम पाहिला पळ काढिला धीर कोंदला । पाहुण्यांनीं दिल्या मुंडाळ्या ओढिती तट करिती अल्ला अल्ला । मर्दांनीं दिल्या डुया घेतल्या लुटी रात्रीं समयाला । खर्ड्यास नेऊन घातला नवाबसाहेबाला । पाण्याचा झाला कहर दाणा शेरभर आला कवलाला ॥ (चाल) ॥ राव देतों मी खंडणी । घ्या मुलुख तुह्मी लिहुनी । मशिरुल्ला देतों धनी । तेव्हां परशुराम भाऊनीं । रावसाहेब नाना फडणीसांनीं । मनसुबी केली

बैसुनी । दिलीं निशाणें सोडुनी । आले पुण्याशीं निघुनी । यश घेतलें पांडवांनीं । बहुरंग्याची लावणी । पवाडा केला मर्दानीं । त्या गुरुरायाचें वदन नित्य पाहूं ॥ गोकुळीं०॥ श्रीमंत धनी० ॥ ४ ॥

---

## १८. त्याच विषयावर आठवा पोवाडा.

चाल—कडे पठारी डोळे झांकून बसला मलुराया । स्वामीचरणं०

शिपाई मारी तलवारा वाटावें पान राखावें शुरा । शिपाई मारी तलवारा ॥ ध्रुपद ॥

गोविंदराव बापुंनीं जाऊनि जावसाल लाविला । बाकीचा पैसा द्यावा ह्मणून कज्या केला । मश्रुल्मुलुख ह्मणे धाडीन काशीला ॥ ( चाल ) ॥ वकिलास क्रोध आला । त्यानें पत्र पाठविलें धन्याला । खबर पाठविली पुण्याला ॥ ( चाल ) ॥ तेव्हां नाना पत्र वाची लवकर । श्रीमंतास राग आला थोर । बोलाविले पाटणकर आगीचे धार । शिंद्याशीं पत्र पाठविलें नर्मदापारा ॥ शिपाई० ॥ १ ॥

पाटील बोवाची तयारी झाली आले राव दक्खनवर । नर्मदा उतरून पौंचले आले राव घाटावर ॥ श्रीमंतांची भेट घेतली जिलीब चाले मोहरें ॥ धन्याशीं नालकी दिली पत्र धाडलें नबाबावर । राव एकदांची घ्यावी

टक्कर । आह्मी पाहूं ह्मणतो बेदर ॥ ( चाल ) ॥ त्या पाटील बोवाची आस्ता नाहीं पुरली । इतक्यांत भगवंताची आज्ञा झाली । त्या दवलतराव शिंद्यानें वस्त्रें केलीं । सारे सेनेमध्यें द्वाही त्याची फिरली । बिजाचे धर्म असती अंकुरा ॥ शिपाई० ॥ २ ॥

नबाब साहेब आले कचेरीस बोलाविले हंबीर । अस्तानजी खानाशीं आज्ञा चला अघाडीवर । रुस्तुमखान भले पठाण डावे बाजूवर ॥ ( चाल ) ॥ मश्रुल आघाडिला । मला अमल पिछाडीला । सेनेचा झोंक चालला ॥ ( चाल ) ॥ पोलादजंग बहादर घेऊन बरोबर । रावरंभा लिंबाळकर केवळ रणशूर । खर्ड्याशीं जाऊन पोंचले नाहीं उशीर ॥ मिळालें दळ तीन लाख झुरा ॥ शिपाई० ॥ ३ ॥

श्रीमंत महाराज निघाले पुण्यांतून बाहेर । दाजीबा फडक्याला नेऊन सांगितलें बाजूवर ॥ ( चाल ) ॥ लष्करची तयारी झाली । हुजरांत फौज चांगली । मानकऱ्यानें कोर धरली ॥ ( चाल ) ॥ भिराभिर उडति तलवारा निसंग होतात । त्यास नाहीं पर्वा ते का भितात । रणशूर शिपाई रणीं उभे राहतात । तीन कोस हटविल्या फौजा उभ्या पळतात । जाहला मोड जरा दम धरा ॥ शिपाई० ॥ ४ ॥

---

## १९. सवाई माधवरावांच्या मृत्यूवर पोवाडा.

हा पोवाडा प्रभाकरकविकृत आहे.

चाल—दोदिवसाची तनु हे साची सुरतरसाची करून मजा।
गमजा करता मनीं उमजाना हें सुख पुढें पडेल वजा—रामजोशी.

कमि नव्हते पृथ्वींत[1] अवांतर प्राणी न्यायाला। आयुष्य कसें कमि झालें सवाई माधवरावाला ॥ ध्रुपद ॥

प्रभु नारायणराव धुरंधर दक्षिणचे नृपती। प्रसन्नवदनें करुनि जयाला सकळ प्रजा जपती ॥ पतिव्रता किती धनाढ्य गंगाबाईभोंवत्या खपती। सुशील सति सौभाग्यवतीपुढें रूपवत्या लपती ॥ सवाई माधवराव प्रसवली कुळदीपक दिपती। पुरंदरीं रक्षणार्थ मंत्री रात्रंदिस जपती ॥ (चाल) ॥ शके सोळाशें शहाण्णवाच्या मुळ जय संवत्सरीं। अधिक होता वैशाख शुद्ध सप्तमी चंद्रवासरीं। पुनर्वसू नक्षत्र कडकडित दुपारचे अवसरीं ॥ ( चाल ) ॥ जन्मला आज दैदीप्यमान पुतळा। जणुं सूर्य उगवला प्रकाश करी भूतळा। दिलें द्रव्य कंचुक्या नाहीं गणती पातळा ॥ (चाल पहिली) ॥ महोत्साह घरोघरीं लागले लोक करायाला। परशुराम प्रत्यक्ष आले काय छेत्र[2] धरायाला ॥ कमि० ॥ १ ॥

पुरंदराहून पुण्यास आणिले राव पंचमवर्षीं। गुढ्या तोरणें उभवुन केली मुंज प्रथमसरशी ॥ विवाहकार्या भूप मिळ-

---

१ 'सृष्टींत' पा०. २ रक्षण करायाला; 'शत्रु हटायाला' पा०.

विले अति हर्षाहर्षीं । देति धाडुन करभार ढिगाचे ढिग कोरे फ[1]रशी ॥ स्वाऱ्या करून सरदार बुडविती रिपु चुर[2]सोचुरशी । थरथर किती कांपती वयस्[3]कर उभे टाकुन खुरशी । (चाल) ॥ प्रतापमहिमा थोर जळामधिं परि जळचर अडविला । नावि मोहिम दरसाल देउनि शाह रिपू तुडविला । अपार सेना लढवुनि मोंगल खड्यांवर बडविला ॥ (चाल) ॥ एकेक पदरचा सेवक साहेब सुभा । समरांगणिं सन्मुख कोणि न राहे उभा । ज्या दिशेस ज्याचा रोख ति त्याला सुभा ॥ ( चाल पहिली ) ॥ विजेपासूनि करि प्रभा चंद्र तारांगण ठायाला । प्रौढ होतां संपूर्ण लोक आले खरेच उदयाला ॥ कामि० ॥ २ ॥

कांहीं दिवस भयरहित सदोदित स्वराज्य चालविलें । दरिद्र अटकेपार जनांचें ज्यानें घालविलें ॥ तीर्थरुपांहुन सकळ भूमंडळ वरून हालविलें । रीतभात इनसाफ लवण नाहिं दुधांत कालवलें ॥ क्षिरसागरिं कृष्णास मुदत भरतां क्षणिं बोलाविलें । तसें रावसाहेबांस अकल्पित वरून पालविलें ॥ ( चाल ) ॥ उदास झालें चित्त परोपरि त्या दिवसापासुनी । विनचुक बोलती शब्द घडोघडि हृदयांतरिं त्रासुनी । बाजिराव साहेबांस आणा जा गुज सांगा निरसुनी ॥ (चाल) ॥ शिके दउत पद कटार दुसरी करा ।

---

१ फारसी रुपये. २ शत्रूंचा द्वेष. ३ 'परस्पर' पा०. ४ 'दुरशी' पा०. ५ 'रिपु बहादर बुडविला' पा०. ६ 'चढविला' पा०. ७ समजावुनी.

आवडलें मनांतुनी विधिविष्णुशंकरा । ठेवुं नका निसळें दादाच्या लेंकरा ॥ ( चाल पहिली ) ॥ तुह्मि सेवक ते धनी होउनि एक आवरा राज्याला । अशानें तरले जाल चिरंजीव रहाल पहायाला ॥ कमि० ॥ ३ ॥

वर्तमान कळतांच असें आली गोष्ट ती निकरास । नये नानाचे मनास जाहलें विपरित इतरांस ॥ झिडकारुनि एकांतीं वदती नित्य सरकारास । स्वस्थ असावें आपण जेऊन पंचामृत सुग्रास ॥ बहुत हट्ट जरि कराल तरि तुह्मि मुकाल प्राणांस । त्यांचि अवस्था तिच तुमची पुढें येईल आकारास ॥ (चाल) ॥ शब्दद्वारें ताडितां लोचनीं जळबिंदू वाहती । दुसऱ्याचे दिशिं अंबारींतून उडि घालूं पाहती । धरि आपा बळवंत झगा दृढ दडपुनि आपुले हातीं ॥ (चाल) ॥ फिरविलीं निशाणें नाहि सोनें लुटलें । शहरांत सैन्य चहूं रस्त्यांनीं लोटलें । पुढें भेट[1] घ्यावया किति माणुस दाटलें ॥ ( चाल पहिली ) ॥ झालि न झाली नजर उठले[2] एवढ्यांतच जायाला । नवल नवीन वाटलें तेथें सकळ समुदायाला ॥ कमि० ॥ ४ ॥

प्रवेशतां महालांत अडखळुन पडले खांबाला । त्वरित उतारे करुन देति लोह उडीद डोंबाला । खरी खबर कळतांच एकांतीं बाईसाहेबांला । धांव धांव धांवण्यास ह्मणती विनवुन सांबाला । घरांत[3] राहू ग्रासुं पाहतो चंद्रबिंबाला ।

१ ‘ नजर कराया ’ पा०. २ ‘ निघाले इतक्यांतच ’ पा०. ३ ‘ प्रताप पाहून ’ पा०.

## १७. त्याच विषयावर सातवा पोवाडा.

चाल—निजामाशीं लढले सवाईमाधवराव । मराठे मुसलमानांत अखेरचा डाव ॥

—कुशाग्रमति.

श्रीमंत धनी महाराज माधवराव । गोकुळीं उभारल्या गुढ्या जन्मला देव ॥ ध्रुपद ॥

तो पांडवांचा अर्जुन यशेश्वरी । ती पहिली निघाली स्वारी मोंगलावरी । त्यांनीं डेरे दिले गारपीरावरी । तो मोंगलाचा वकील विनंत्या करी । ते दवलतराव शिंदे अघाडीबिनीवरी । त्या होळकराची फौज धासत भारी । त्या बाबा फडक्याची कोरबंदी न्यारी । त्या जरीपटक्याखालीं हुजुरात चाले सारी ॥ (चाल) ॥ राव माने मानकरी । घाडगे पाटणकर यादव निंबाळकर ॥ ( चाल ) ॥ ते अंडगर बंडगर न्यारे आणिक पांढ्या पट्याची धार । ते धारुरकर भोंसले कीं सुपेकर स्वारी बरोबर । मोहिते न शिरके येऊन मिळाले रणाचे वर । ते गणेशपंत ढमढेरे आले बहादूर कि सवते दूर । ते मानाजी फाकडे भले रणशूर मारी तलवार ॥ (चाल) ॥ चालतांना स्वारी शोभती । कोरबंदी जपुन चालती । अशा सरदाराच्या गणती । कालुकर्णे बाजे होती । आपलाल्या बिनींवर हत्ती । पुढें सांडणीस्वार धांवती ॥ (चाल पहिली) ॥ घोडदळ पायदळ कुठवर पाहूं ॥ गोकुळीं० ॥ श्रीमंत धनी० ॥ १ ॥

तो पहिला शहाणा नांव साज । त्यानें श्रीमंताचें भलें राखिलें राज्य । अशीं पुण्यपवित्र खलबतें होती रोज ।

ते पंतप्रतिनिधी सुर्याचें तेज । ते आपाजी बळवंतराव भुजेशीं भुज । ते भवानराव घाटगे नांव साज । त्या पानशावर रावसाहेबाची रीझ । त्या राज्याचा हमेश डंका वाज ॥ (चाल) ॥ अशी गडबड झाली फार शिलेदारा घोडें मिळेना । दोशांचें घोडें चौशांला अशा खाशाला कोणी देईना । विसाचें तट्टु साठाला अशा दाटीला कुठें मिळेना । भीवरेवर पडला तळ रयत तळमळे नजर थांबेना । दाण्याचें झालें हांतरुण खुशाल पाहून कोणी घेईना । बायकोचें काढलें मोतीं घेतलें हातीं गुजर ठेविना । टक्क्याचें रुकें पायलीला दळणवालीला दळुन देईना ॥ (चाल) ॥ तीनलक्ष मिळालें दळ । आपुलाले धरती बल । लष्करांत पडली भुल । मोठे मोठे कीं लढनेवाले ॥ ते विठ्ठल शिवदेव नारो शंकरभाऊ ॥ गोकुळीं० ॥ श्रीमंत धनी० ॥ २ ॥

गेले कागद नागपुरा कीं भोंसल्याला । दरकुच येऊन सिनेवरती मिळाला । तो जिवबादादा बक्षी अलबेला । ते वेळे काय बोलला रावसाहेबाला । तो कसला कसा मोंगल आहे पाहुंद्या मजला । तो डीबाय फिरंगी गोळा मारनेवाला । फौजेंत केली ताकीद सडे स्वारीला । त्या गणेशपंत बेहऱ्याला बाबा फडक्याला । त्या परशुराम भाऊला जिवबा दादाला । तुह्मीं मिळुनशेनी जावें झुंजायाला ॥ (चाल) ॥ मोंगलानें गलिम पाहिला घोडा उठ-

विला कीं त्या रंगणांत । भले भले माईचे पूत सुरई हातांत मारिती हात । तो रावरंभा सरदार बसून हौद्यांत तिरंदाजींत । ते मश्चुल्मुलुख हत्तीच्या हौद्यांत बसून हणा हणा ह्मणवीत । बहु कोस मागें सारिला मार पडली हुजरातिला । त्या परशुराम भाऊला बाबा फडक्याला । जखमा चढल्या मरदांला । अशा कैक एकांड्याला ॥ रणखांब रोविला मुक्काम घोडेगांव ॥ गोकुळीं० ॥ श्रीमंत धनी० ॥३॥

आला मोंगल देशावरी कळल्या खबरी । गांवनगांव ओस पडलीं सारीं । ही पुण्यप्रतापी रावसाहेबाची स्वारी । त्या शाहुराजाचा हात पुरता शिरीं । त्या बुधवारच्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं । त्या जिवबादादानें तोफा लाविल्या दोहिरी । त्या भोंसल्याच्या बाणाच्या भरारी । त्या हनुमंतानें लंका जाळिली सारी । तेंवि सवाई माधवराव यशस्वरी । हणा हणा ह्मणुन निशाणें उठलीं सारीं ॥ (चाल) ॥ मोंगलानें गलीम पाहिला पळ काढिला धीर कोंदला । पाहुण्यांनीं दिल्या मुंडाळ्या ओढिती तट करिती अल्ला अल्ला । मर्दांनीं दिल्या डुया घेतल्या लुटी रात्रीं समयाला । खर्ड्यास नेऊन घातला नबाबसाहेबाला । पाण्याचा झाला कहर दाणा शेरभर आला कवलाला ॥ (चाल) ॥ राव देतों मी खंडणी । घ्या मुलुख तुह्मी लिहुनी । मशिरुल्ला देतों धनी । तेव्हां परशुराम भाऊनीं । रावसाहेब नाना फडणीसांनीं । मनसुबी केली

बैसुनी । दिलीं निशाणें सोडुनी । आले पुण्याशीं निघुनी । यश घेतलें पांडवांनीं । बहुरंग्याची लावणी । पवाडा केला मर्दांनी । त्या गुरुरायाचें वदन नित्य पाहूं ॥ गोकुळीं०॥ श्रीमंत धनी० ॥ ४ ॥

---

## १८. त्याच विषयावर आठवा पोवाडा.

चाल—कडे पठारी डोळे झांकून बसला मलुराया । स्वामीचरण०

शिपाई मारी तलवारा वाटावें पान राखावें शुरा । शिपाई मारी तलवारा ॥ ध्रुपद ॥

गोविंदराव बापुंनीं जाऊनि जावसाल लाविला । बाकीचा पैसा द्यावा ह्मणून कज्या केला । मश्रुलमुलुख ह्मणे धाडीन काशीला ॥ ( चाल ) ॥ वकिलास क्रोध आला । त्यानें पत्र पाठविलें धन्याला । खबर पाठविली पुण्याला ॥ ( चाल ) ॥ तेव्हां नाना पत्र वाची लवकर । श्रीमंतास राग आला थोर । बोलाविले पाटणकर आगीचे धार । शिंद्याशीं पत्र पाठविलें नर्मदापारा ॥ शिपाई० ॥ १ ॥

पाटील बोवाची तयारी झाली आले राव दक्खनवर । नर्मदा उतरून पोंचले आले राव घाटावर ॥ श्रीमंतांची भेट घेतली जिलीब चाले मोहरें ॥ धन्याशीं नालकी दिली पत्र धाडलें नबाबावर । राव एकदांची द्यावी

टक्कर । आह्मी पाहूं ह्मणतो बेदूर ॥ ( चाल )॥ त्या पाटील बोवाची आस्ता नाहीं पुरली । इतक्यांत भगवंताची आज्ञा झाली । त्या दवलतराव शिंद्यानें वस्त्रें केलीं । सारे सेनेमध्यें द्वाही त्याची फिरली । बिजाचे धर्म असती अंकुरा ॥ शिपाई० ॥ २ ॥

नबाब साहेब आले कचेरीस बोलाविले हंबीर । अस्तानजी खानाशीं आज्ञा चला अघाडीवर । रुस्तुमखान भले पठाण डावे बाजूवर ॥ ( चाल ) ॥ मश्रुल आघाडिला । मला अमल पिछाडीला । सेनेचा झोंक चालला ॥ ( चाल ) ॥ पोलादजंग बहादूर घेऊन बरोबर । रावरंभा लिंबाळकर केवळ रणशूर । खड्यांशीं जाऊन पोंचले नाहीं उशीर ॥ मिळालें दळ तीन लाख झुरा ॥ शिपाई० ॥ ३ ॥

श्रीमंत महाराज निघाले पुण्यांतून बाहेर । दाजीबा फडक्याला नेऊन सांगितलें बाजूवर ॥ ( चाल ) ॥ लष्करची तयारी झाली । हुजरांत फौज चांगली । मानकऱ्यानें कोर धरली ॥ ( चाल ) ॥ भिराभिर उडति तलवारा निसंग होतात । त्यास नाहीं पर्वा ते का भितात । रणशूर शिपाई रणीं उभे राहतात । तीन कोस हटविल्या फौजा उभ्या पळतात । जाहला मोड जरा दम धरा ॥ शिपाई० ॥ ४ ॥

---

## १९. सवाई माधवरावांच्या मृत्यूवर पोवाडा.

हा पोवाडा प्रभाकरकविकृत आहे.

चाल—दोदिवसाची तनु हे साची सुरतरसाची करून मजा ।
गमजा करता मनीं उमजाना हें सुख पुढें पडेल वजा —रामजोशी.

कामि नव्हते पृथ्वींत[1] अवांतर प्राणी न्यायाला । आयुष्य कसें कामि झालें सवाई माधवरावाला ॥ ध्रुपद ॥

प्रभु नारायणराव धुरंधर दक्षिणचे नृपती । प्रसन्नवदनें करुनि जयाला सकळ प्रजा जपती ॥ पतिव्रता किती धनाढ्य गंगाबाईभोंवत्या खपती । सुशील सति सौभाग्यवतीपुढें रूपवत्या लपती ॥ सवाई माधवराव प्रसवली कुळदीपक दिपती । पुरंदरीं रक्षणार्थ मंत्री रात्रंदिस जपती ॥ (चाल) ॥ शके सोळाशें शहाण्णवाच्या मुळ जय संवत्सरीं । अधिक होता वैशाख शुद्ध सप्तमी चंद्रवासरीं । पुनर्वसू नक्षत्र कडकडित दुपारचे अवसरीं ॥ ( चाल ) ॥ जन्मला आज दैदीप्यमान पुतळा । जणुं सूर्य उगवला प्रकाश करी भूतळा । दिलें द्रव्य कंचुक्या नाहीं गणती पातळा ॥ (चाल पहिली) ॥ महोत्साह घरोघरीं लागले लोक करायाला । परशुराम प्रत्यक्ष आले काय छेत्र धरायाला[2] ॥ कामि० ॥ १ ॥

पुरंदराहून पुण्यास आणिले राव पंचमवर्षी । गुढ्या तोरणें उभवुन केली मुंज प्रथमसरशी ॥ विवाहकार्या भूप मिळ-

१ 'सृष्टींत' पा०. २ रक्षण करायाला; 'शत्रु हटायाला' पा०.

विले अति हर्षाहर्षीं। देति धाडुन करभार ढिगाचे ढिग कोरे फरशी[1] ॥ स्वाऱ्या करून सरदार बुडविती रिपु[2] चुरसाचु[3]-रशी। थरथर किती कांपती वयस्कर उभे टाकुन खुरशी[4]। (चाल)॥ प्रतापमहिमा थोर जळामधिं परि जळचर अडविला। नावि मोहिम दरसाल देउनि शाह रिपू तुडविला[5]। अपार सेना लढवुनि मोंगल खर्ड्यावर बडविला[6]॥(चाल)॥ एकेक पदरचा सेवक साहेब सुभा। समरांगणिं सन्मुख कोणि न राहे उभा। ज्या दिशेस ज्याचा रोख ति त्याला सुभा॥ (चाल पहिली)॥ विजेपासूनि करि प्रभा चंद्र तारांगण ठायाला। प्रौढ होतां संपूर्ण लोक आले खरेच उदयाला॥ कामि०॥ २॥

कांहीं दिवस भयरहित सदोदित स्वराज्य चालविलें। दरिद्र अटकेपार जनांचें ज्यानें घालविलें॥ तीर्थरूपांहुन सकळ भूमंडळ बसून हालविलें। रीतभात इनसाफ लवण नाहिं दुधांत कालवलें॥ क्षिरसागरिं कृष्णास मुदत भरतांक्षणिं बोलाविलें। तसें रावसाहेबांस अकल्पित वरून घालविलें॥ (चाल)॥ उदास झालें चित्त परोपरि त्या दिवसापासुनी। विनचुक बोलती शब्द घडोघडि हृदयांतरिं त्रासुनी। बाजिराव साहेबांस आणा जा गुज सांगा निरसुनी[7]॥ (चाल)॥ शिक्के दउत पद कटार दुसरी करा।

---

१ फारसी रुपये. २ शत्रूंचा द्वेष. ३ 'परस्पर' पा०. ४ 'दुरशी' पा०. ५ 'टिपु बहादर बुडविला' पा०. ६ 'चढविला' पा०. ७ समजावुनी.

आवडलें मनांतुनी विधिविष्णुशंकरा। ठेवुं नका निराळें दादाच्या लेंकरा ॥ ( चाल पहिली ) ॥ तुह्मि सेवक ते धनी होउनि एक आवरा राज्याला। अशानें तरले जाल चिरंजीव रहाल पहायाला ॥ कमि० ॥ ३ ॥

वर्तमान कळतांच असें आली गोष्ट ती निकरास। नये नानाचे मनास जाहलें विपरित इतरांस ॥ झिडकारुनि एकांतीं वदती नित्य सरकारास। स्वस्थ असावें आपण जेऊन पंचामृत सुग्रास ॥ बहुत हट्ट जरि कराल तरि तुह्मि मुकाल प्राणांस। त्यांचि अवस्था तिच तुमची पुढें येईल आकारास ॥ (चाल) ॥ शब्दद्वारें ताडितां लोचनीं जळबिंदू वाहती। दुसऱ्याचे दिशिं अंबारींतून उडि घालूं पाहती। धरि आपा बळवंत झगा दृढ दडपुनि आपुले हातीं ॥ (चाल)॥ फिरविलीं निशाणें नाहि सोनें लुटलें। शहरांत सैन्य चहूं रस्त्यांनीं लोटलें। पुढें भेटे घ्यावया किति माणुस दाटलें ॥ ( चाल पहिली ) ॥ झालि न झाली नजर[1] उठले एवढ्यांतच जायाला[2]। नवल नवीन वाटलें तेथें सकळ समुदायाला ॥ कमि०॥ ४ ॥

प्रवेशतां महालांत अडखळुन पडले खांबाला। त्वरित उतारे करुन देति लोह उडीद डोंबाला। खरी खबर कळतांच एकांतीं बाईसाहेबांला। धांव धांव धांवण्यास ह्मणती विनवुन सांबाला। घरांत[3] राहू ग्रासुं पाहतो चंद्रबिंबाला।

---

१ 'नजर कराया' पा०. २ 'निघाले इतक्यांतच' पा०. ३ 'प्रताप पाहून' पा०.

गोत्रपुरुषाची किड कठिण लागली मुळ कुळकोंबाळा ॥ (चाल)॥ करिं घेउनि पंचारति प्रभुला धनभर ओंवाळुनी समाचार फुंदफुंदत पुसती निर नेत्रीं ढाळुनी । पहा पहा निट मग राव बोलती मुख आमचें न्याहाळुनी ॥ (चाल)॥ तुझि आमुची भेट हीच सगुण सुंदरी । रहा खुशाल आपल्या झुलत राजमंदिरीं । द्वाहीलेख तुझी जन वंदितील आदरीं ॥ (चाल पहिली)॥ जड पडल्या करि स्मरण सदोदित संकट समयाला । अशापरी निरवून धरिति कवटाळुन हृदयाला ॥ कामि० ॥ ५ ॥

प्रतिउत्तर परिसोन विश्वमाउलि मनिं गहिंवरली । नेउन रंगमहालीं सख्यांनीं चहुंकडून सांवरली ॥ विरक्त झाले श्रीमंत हिकडिल स्नेह ममता सरली । स्नानदानदेवपूजा गलबलिंत अगदिंच अंतरली ॥ एकादशिची रात्र बऱ्यांमधिं सहज मात्र सरली ॥ उजाडतां द्वादशीस कुणिकुण कुबुद्धि संचरली ॥ (चाल)॥ तिसरे मजल्यावरून घातली उडि कारंज्यावरी । एकाकीं हालचाल न होतां गेलि वार्ता दुरवरी । सेवकजन सर्वांग विकळ कडेखांद्यांवर आंवरी ॥ (चाल)॥ शके सत्राशें भर सत्राच्या अवसरीं । दक्षिणायनामधिं राक्षस संवत्सरीं । आश्विन शुद्ध पौर्णिमा भौमवासरीं ॥ (चाल पहिली)॥ रवि मावळतां वरी मरण झडकरी आलें सखयाला । इथुन आतां प्रारंभ दिसेंदिस अद्भुत प्रळयाला ॥ कामि० ॥ ६ ॥

हाहाकार जाहाला प्रगटतां पुकार शहरांत। बंद[1] पडलिं भणभणित दुकानें भर बाजारांत ॥ वृद्ध तरुण नरनारि बुडाल्या आकांत कहरांत । गंध कुंकुं किति सुज्ञ पुसुन धुळ बांधिति पदरांत ॥ स्वयंभुदीप विझतांच विवशी[2] व्यापलि दरबारांत । ठायिं ठायिं थिजले लोक शोकें संचारतां अंधेरांत ॥ ( चाल ) ॥ बंदोबस्त कडिकोट करूनियां शनिवारांतुन अधीं । अखंड[3] स्वारि रायाचि निघाली चौथिच्या अमलामधीं । दुर्लभ दर्शन ज्याचें प्रभु तो नदींत निजायाचा कधीं ॥ ( चाल ) ॥ पसरुनीं[4] तुळशी कर्पुर बेल चंदन । रचियलें सरण त्या शेवटचे स्यंदनीं[5] । आरुढले वीरनर नारायणनंदन ॥ ( चाल पहिली )॥ अनेक[6] रिपूंचें करुनी कंदन दवडुनि विलयाला । दर्भासन घातलें विष्णुलोकास बसायाला ॥ कमि० ॥७॥

बाईसाहेब कल्पांत जिवाचा तळतळून करिती । कां ग कुळस्वामिणी कोपलिस आजी मजवरती ॥ पतिपूर्वीं सौभाग्यवत्या ज्या पुत्रवत्या मरती । इहलोकीं परलोकीं धन्य त्या कुळास उद्धरती ॥ कसें माझें दुर्दैव उपजल्यें चांडाळिण पुरती । ह्मणुनि श्रीमंत प्रभुची मजला अंतरली मूर्ती ॥ (चाल) ॥ निरोगी सात सहस्र उंट न पार स्वामीचे ।

---

१ ‘ भुल पडली ’ पा०. २ विपत्ती देवता. ३ ‘ अखेर ’ पा०. ४ ‘ रचियलें कर्पूर गौर चंदन चर्चिला शेवटचा चंदन ’ पा०. ५ ‘ विमानीं ’ पा०. ६ ‘ असंख्य ’ पा०.

वीस सहस्र तुरंग निवडक भीमथडी[1] ग्रामींचे । सबल दोनशें नव्वद कुंजर विशाल हरकामींचे ॥ (चाल) ॥ ऐशी दोन सहस्र कटिदार बाणीच्या । सहा सहस्र गाई फार तऱ्हेतऱ्हेच्या । कांहीं सफेत कपिला व्याघ्रांवर खाणिच्या ॥ ( चाल पहिली ) ॥ बैल बारा सहस्र एवढ्या जिवास खायाला । कोण श्रीमंतांवांचूनी ह्यांना समर्थ द्यायाला ॥ कामि० ॥ ८ ॥

शिकार चित्ते व्याघ्र पटाइत वृक सांबर हरणें । जंबुक चितळे ससे हि भेंकर कुरवाळुन धरणें ॥ रीस येडके गेंडे सशांना बनात पांघुरणें । आपण खावें तें त्यांस पुत्रवत् किति माया करणें ॥ सुंदररूप रायाचें नाहिं कुणावर रागें भरणें । कलगितुरा शिरपेंच पाचुचीं पडत होतिं किरणें ॥ ( चाल ) ॥ सदयहृदय साक्षात पितांबर परिधानाचा प्रभु । कृष्ण कुळीं दैदीप्य जसा द्वापारीं अवतरला प्रभु । तसा करून दिग्विजय शेवटीं अवघड रचिला विभू ॥ (चाल) ॥ पाहुंद्या मला तें एकवेळ श्रीमुख । जन्म आहे तों अतां ह्या जिवास होईल दुःख । भोगिलें रमाबाईनें[2] कांहीं तरि सुख ॥ (चाल पहिली) ॥ हरी जाहला विन्मुख विसरल्यें सांग पुजायाला । प्रयागीं जावें उठुन वाटतें समाधि घ्यायाला ॥ कामि० ॥ ९ ॥

---

१ भीमथडी येथील घोडे चांगले असतात अशी प्रसिद्धि आहे. २ थोरल्या माधवरावांची पत्नी रमाबाई नवऱ्या बरोबर सती गेली तिनें.

अश्व आवडते कुंजर धेनु मृग मैना रडती । मोर खबु-[1]तरें तितिर सांबरें मूर्च्छागत पडती ॥ स्वर मंजुळ कोकिळ पक्षी ते पिंजऱ्यामधिं तडफडती[2] । पोपट भारद्वाज चाष पर दुःखानें खुडती ॥ भुंलांप[3] उलुका भालु रीत घन विजवा कडकडती । असंख्य तुटती तारे नभमंडळिं[4] किरणें पडती ॥ ( चाल ) ॥ ग्रामसिंह[5] दिवसास भयंकर सद्गद भुंकारिती । सवत्स नित अपरात्रिस गाई कितीक हंबरती । भुतें पिशाचें खविस डाखिणी काय हाका मारिती ॥ ( चाल ) ॥ दोहों द्वारीं बसुनी लक्ष्मी पिंपळावरी । करि दीर्घ रुदन मध्यान्ह होतां शनवारीं । नाहीं रहात अतां होईल आकाशवाणी वरी ॥ ( चाल पहिली ) ॥ शक्ति घेउन श्रीहरी निघुन जातां मुळ ठायाला । सव्यसाचि सारखे लागले मागें पहायाला ॥ कामि० ॥ १० ॥

धन्य वंश एकेक पुरुष कल्पवृक्ष पिकले । शत वर्षें द्विज पक्षि आनंदें त्या तरुवर टिकले ॥ जलचर हैदर नवाब सन्मुख रण करितां थकले ॥ ज्यांनीं पुण्याकडे विलोकिलें ते संपतिला मुकले ॥ असे प्रभु कसे अमर कराया ब्रह्मदेव चुकले । गहन गती कर्माचि सर्वजण पूर्वीं फळ विकलें ॥ ( चाल ) ॥ संपाविला अवतार धन्यांनीं ह्मणे गंगूहैबती । ध्वज पडले उलथुनी भडकल्या सुरु

---

१ ‘ससाणे’ पा०. २ ‘पडती’ पा०. ३ ‘भूकंप’ पा०. ४ ‘टोळ मंडपिं किरणें दडती’ पा०. ५ कुत्रीं. ‘ग्रामव्याघ्र’ पा०.

साहेब नौबती । कोण करिल प्रतिपाळ तूर्त मुलखास लागली वती ॥ (चाल) ॥ महादेव गुणीराज श्रुति गादिचे । लवे नुतन नवती शाहिर जदिपवादिचे । पीळ पेच अर्थ अक्षरांत वस्तादिचे ॥ (चाल पहिली)॥ प्रभाकराचें कवन प्रतिष्ठित सभेंत गायाला । अशा कवीची बुज नाहीं कोणि करायाला ॥ कर्मि० ॥ ११ ॥

---

## २०. शेवटल्या बाजीरावाच्या कारकीर्दींतील बंड व दुष्काळ यांवर पोवाडा.

सन १८०३–०४ ह्या वर्षी पुणें शहरांत व आसपासच्या प्रदेशांत मोठा दुष्काळ पडला होता. हा दुष्काळ पडण्यास दोन कारणें झालीं; पहिलें कारण यशवंतराव होळकर व त्याच्या हाताखालचे पेंढारी ह्यांनीं त्या प्रदेशांत चालविलेलें बंड व लुटालूट, आणि दुसरें कारण अनावृष्टि. सन १८०३ आणि १८०४ ह्या दोन्ही वर्षांत दक्षिणेंत पाऊस अगदीं पडला नाहीं, व त्यामुळें इतकी महर्घता झाली होती कीं, रुपयास दोन अडीच शेर देखील धान्य मिळत नसे. लॉर्ड व्हॅलेन्शिया ह्या नांवाचे इंग्रज प्रवासी ह्या वर्षी मुंबईहून पुण्यास आले होते. ते ह्मणतात कीं खंडाळ्याजवळ एका तळ्यावर दुष्काळानें मेलेल्या माणसांचीं सुमारें १०० प्रेतें गिधाडें व कुत्रीं ह्यांनीं खातांना त्यांनीं पाहिलीं. प्रत्येक खेड्यांत, प्रत्येक शहरांत व प्रत्येक घरांत दुष्काळाचीं चिन्हें दृष्टीस पडत. दुष्काळानें पीडलेल्या लोकांच्या साह्यार्थ मुंबई शहरांत ४०००० रुपये जमा झाले होते. त्या द्रव्यांतून इंग्रजांचे रेसिडेन्ट कर्नल क्लोज

हे पुणें शहरांत प्रत्यहीं ५००० माणसांस पैसे वांटीत. बाजीराव पेशवे हेही ह्या प्रसंगीं बराच दानधर्म करीत. परंतु त्यांच्या दानधर्मापासून फक्त ब्राह्मणांसच लाभ होई. ह्या दुष्काळाचें व त्या वेळच्या लोकस्थितीचें वर्णन ह्या पोवाड्यांत केलें आहे. हा पोवाडा रामजोशीकविकृत आहे.

चाल—'नरजन्मामधिं नरा करुनि घे नरनारायण गडी.' —रामजोशी.

**उगा भ्रमसि वाउगा कशाला युगांत[1] खळ हा कली । कली मातला सारा धनदारा इच्छी राज्यासहि हाकली ॥ ध्रुपद ॥**

**कुणा न कुणि धनि मना येइल तसें जनांसि जन वंचिती । धनानिमित्तें मरति किति गरति धरुनि यवन अन्न चारिती ॥ आठां दिवसांमधिं पठाण तिनदां लुटावया धांवती । उठावयाला तकवा[2] नाहीं बकवा सारा धनिचाकर झुंजती ॥ दारा[3] वित्त घरदार दिलें तरी मार चुकेना रती[4] । फार वदूं मीं वधिल्याहो काई गाई बाटविल्या द्विजसती[5]॥फंद मातले धुंद झालि बेबंद बुडाली क्षिती। मंद करिती मसलतीला मग फसली तिला नावरितां फळ भोगिती ॥ पुंड घरोघरीं बंड कुणावर दंड कोण बांधिती । खंड कुणाचा गावा कुणि घ्यावा द्यावा कुणि कुणाला किती ॥ असा न कोणी पुसावयाला कसा काळ काशि मती । बसावया नच जागा मग पागा गजरथ बागा कुठें राहती ॥ चिका**

---

१ कलियुगांत. २ सामर्थ्य, शक्ति. ३ स्त्री. ४ रतीइतका. ५ ब्राह्मण स्त्रिया.

आंत ज्या निका पढविल्या पिंकाशिं गळ लाविती ॥ विकावया त्या नेल्या किती मेल्या अबळा उरल्या जन चुंबिती ॥ फांस गळ्यामधिं वांस पाठिवर लोहहडा लाविती । मास विप्रलोकांचें तोकांचें वेचिती सांडस घेउनि हातीं ॥ धीर वीर कां हंवीरें[1] होउनी फकीर भिक मागती । चीर नसे हो आंगा किति सांगावा तो ताप जिवा लागती ॥ हातिं धरुनि देवता फोडिल्या लताराम भंगिती । गतायु[2] किति झाले किति प्याले विष किति उरले सुख सेविती ॥ ( चाल ) ॥ किति सागरउदकें कुटुंबसह वाहले । किति दैवगतीनें काशीसाहि पावले । किति कर्नाटक देशांत धनिक धांवले । किति अब्रूचें जन तेथाचि भांबावले । कैकांनीं हिरे बचनाग कैफ चावले । किति उठाउठी भयभीत मरण पावले । किति ब्राह्मणगालाहि यवनांनीं चावले । कावले जन करितील कां गावले । अति सात्विक ते दुष्कर्मीं सरसावले । किति फंद करिती ते बंदांताचि घातले ॥ ( चाल पहिली ) ॥ काय समय हा लया रुद्र करि दया दृष्टि झांकली । भयानका क्षिति झाली घरघाली रुद्र विंशाति जगिं फांकली ॥ १ ॥

रुसा न कलिवर पुसा मनाला कसा काळ हा तरी । असा जनक्षय कांहो कुणि पाहो संशय कथितों याचे वरी ॥ धराधीश कुणि परास म्हणती करा पातकें बरीं । खराब

---

१ शूर, प्रतापी. २ मरण पावले.

जन निजकर्में करिती अधर्म राजाची अफतैरी ॥ बाप तयाला ताप वृद्धपाणिं पापपुत्र हा करी। शाप देतसे तोही म्हणे नोहे माझा वीर्यज हा तरि जरी ॥ माय टाकिली पाय बांधुनी बायकोशिं घे शिरीं । होय कशाचा बेटा तो पेटाऱ्यांतुनि साप काढिला वरी ॥ सून बहिण सासू जे म्हणाति तिशिं सुरतवासना धरी । भवन बुडे पापानें मधुपानें मातुनि माय सुताला वरी ॥ मनीं धरुनि कामिनी मठामधिं मुनी विनयचातुरी । जगीं दाविती बावा परि आंतुनि कावा भोंदुनि खाती पुरी ॥ लेश नसे उपदेश आपुला देश टाकुनी दुरी । केशवार्चन करती वरती परि आंतुनि कर्में नानापरी ॥ असे धूर्त जे तूर्त जगामधिं मूर्त पाप चव धरी। पूर्ती मखादिक याचिं व त्याचीं कर्में म्हणूं नको हा खरी ॥ वित्त हरिति निरनिमित्त ठेवुनि चित्त अर्थ यावरी । मत्त धन्याशीं चोरी करिती अधिकारी दया कुठुन भूसुरीं ॥ सती ह्मणति निजपती त्यजुनि नांदती पराचे घरीं । जिवें मारिती भर्ते त्या वरते दुसरे करिति किितिक सुंदरी ॥ ( चाल ) ॥ किति कन्या हयाविक्रयें परमपातकी । एकाची वृत्ती एकास करी घातकी । किति दुर्मतिनें गुरुपत्नीला हाटकी । किति जारण मारण उच्चाटण नाटकी । कितिकांची वाणी मृषा वदुनि हालकी । धनियास पालखी चाकरास नालकी । कुणि विधवा ठे-

१ कारकीर्द ! २ दारू पिण्यानें. ३ मूर्तिमंत. ४ राक्षसांना. ५ खोटें.

विती घरामधें पाणकी । मित्रास वंचिती मग कोठुन भावकी[1] । अशिं कितिएक पापें जगीं कुणा ठाउकीं ॥ (चाल पहिली) ॥ जराक यास्तव करावया स्तव जरा मतिस जाकली । करा श्रवण होयाचें व्हायाचें ऐशी विधिवाणी भाकली ॥ २ ॥

चिन्ह वाटतें भिन्न पुढतिं जें खिन्न जाहलें मनीं । भिन्नदेह किति करति किति भरति पोटें स्नानाहि कंटाळुनी ॥ पहा कितिक जन महागाईनें दाही दिशा धुंडुनी । अहो शेवटीं मेले किती गेले यमलोकाशिं गणावे कुणीं ॥ भणाण सारा दणाण झाला कणा न पावति सणीं । कुणास न मिळे भाजी कुणि राजी करडी मिळो आमटी जुनी ॥ मुरक चढती कुणी भूक ह्मणाति द्विज आधुक तशा ब्राह्मणी । कुकरी शाल शाला कुणि त्याला उभे राहुं न देति आंगणीं ॥ कढी ह्मणति कुणि वडी घालिती उडीं अन्न पाहुनि । रडवितात किति पोरें किति ढोरें तैशीं ओढिति दारांतुनी ॥ पाक हो न हो हाक मारिती भाकर द्या ह्मणवुनी । टाक मुखामधिं कांहीं मज नाहीं ह्मणती अन्न पंधरा दिनीं ॥ जळा पिउनि किती नळांत फुगले पळांत वपु[2] त्यागुनी । गळां पडुनि किति रडति किति मरति बालकमुडदे कंटाळुनी ॥ क्षुद्र इतर जे शूद्र तयांवरि रुद्र[3] कोण या क्षणीं । मुद्रस कैंचा त्याला भलत्याला भाकर

१ बंधुत्व, भाऊपणा. २ देह. ३ भयंकर प्रसंग, संकट.

मागति मुख पसरुनी ॥ चणा अगर नाचणा एकादा दाणा मिळे त्यांतुनी । उणा दिवाळी दसरा किती दुष्काळाचा घसरा घ्या पाहुनी ॥ पीठ डाळकुट मीठ ढिगावरी नीट पडति जाउनी । धीट सोशिती कांठीं परि पाठी सोडित नच मेल्यावांचुनी ॥ ( चाल ) ॥ करितील कायहो अन्नाविण गांजली । ही दुनया सारी जठराग्निंत भाजली । नच माधुकरीला कोणि तदा लाजली । वेंचिती शितें चिखलांत राड माजली । धनिकाची दौलत आपणांत सामावली । शेवटीं विळे पळी दिवेलावणी बाजलीं । यावरि येउनियां देवा कां गांजली । कैकांनीं कुटुंबें विष पाजुनि निजविलीं । ही दुष्काळाची बरी नौबत वाजली । वर्णावी ह्मणुनियां कविमतिला डाजली ॥ ( चाल पहिली ) ॥ काळ कठिण दुष्काळ उडाला काळरीति ठाकली । बाळवृद्ध लोकांत कुठें कांहीं तरी मर्यादा राहिली ॥ ३ ॥

सुधी[1] ह्मणति निरवधी[2] काळ त्यामध्यें दीडपायली । कधीं ऐकिलीं चिपटीं कधीं निपटीं कोळवीं चोळवीं कधीं पाहिलीं ॥ जुना जिन्नस वरी उणा वाटे कुठें कुणांत पत राहिली । मणास रुपये तेरा तेलाला बारा तुपा शपथ वाहिली ॥ गूळ असो तोळाभर आहे कीं मूळ मिठा चीडली । खूळ लवंगा पैशाच्या सवंगा मिरची पांच दिधली ॥ हुजूर

१ शहाणे. २ अमर्याद.

वाणी रुजू तराजू खजूरी ती एकली । खिजून घेती पैसा देतिल हो कैसा माखली नच जीभली ॥ गहूं ह्मणाति जे बहु सवंग ते नउ चिपटीं जाहलीं । नवे मऊ जे दाणे बेदाणे झाले अशी दशा साहिली ॥ मका रांड ही आकाइला परि शिका कोठडी केली । नको द्वाड एरंडी हे रंडी आठा चिपटीं कधीं ऐकिली ॥ दुकाळ त्यामधिं बकाळ मंडळी ठकापरिस ठक भली । दुकान घालुनी बसती वरी दिसती निर्मळ घातुकता वाइली ॥ नितळ सोनिया पितळ ह्मणाति निज पितळ पुतळि आटली । कुतळ बुडविले सारे ही वारे वेळची सराफाइला दिली ॥ सार हिऱ्याला गार ह्मणाति सोनार देत पावली । चार शेर तांब्याला कांभ्यालां ह्मणे कांसार देत आधेली ॥ पुरे काळ हा नुरे योग्यता विरे निघुनि चालली । अहो शालुच्या फरदा चवालिचा खुरदा काय गोष्ट चांगली ॥ ( चाल ) हें राहो भाजींत बागवान जोडका । पैशाचा एकचि मुळा एक दोडका । पैशास मक्याचा कंद एक मोडका । हा कांदा दो पैशांस एक बोडका । जळणास रुपयाला एक लहान खोडका । घोड्यास शिपाई काय करिल बोडका । काळानें देश यापरि केला रोडका । मग हत्याराचा उपाय काय थोडका । खाउनी नावद ह्मणों नये गोड कां ॥ ( चाल पहिली ) ॥ अजातरिपु हे प्रजा इतःपर मजा वृष्टि शि-

---

१ युद्ध.

रकली । दुजी आस न कविरायाची कृति येथुनि उरकली ॥ ४ ॥

---

## २१. शेवटले बाजीराव पेशवे यांवर पोवाडा.

हा पोवाडा प्रभाकरकविकृत आहे.

चाल—कडेपठारीं डोळे झांकुन बसला मल्हुराया ।
स्वामीचरणभेटीचे कैसें केलें मल्हुराया ॥ —सगनभाऊ.

यशस्वी झाले श्रीमंत पहिले सर्व लढायाला । आतांच आलें अपेश कोठून बाजीरायाला ॥ ध्रुपद ॥

दादासाहेब पुण्यप्रतापी निस्सीम शिवभक्त । स्वारी करून दरसाल हालविलें दिल्लीचें तक्त ॥ आनंदीबाई सुशीलशिरोमणी सुगुणसंयुक्त । पतिभजनीं सादर घडोघडी अखंड आसक्त ॥ बाजीरावसाहेब सदोदित जो जीवन्मुक्त । जन्मांतरीं तप केलें निराहारीं राहुन एकभुक्त ॥ ( चाल ) ॥ शके सोळाशें शाहाण्णवीं अतिउत्तम जयसंवत्सरीं । पौष शुद्ध दशमीस भरणीनक्षत्र भौमवासरीं ॥ ठीक पाहिल्या प्रहरांत जन्मले रात्रीच्या अवसरीं ॥ (चाल)॥ पहा बाईसाहेब धार[1]मुक्कामीं राहुनी । कंठीला काळ कांहीं दिवस दुःख साहुनी । केलें तेथुन कुच सुपुत्रमुख पाहुनी ॥ (चाल पहिली) ॥ गंगा[2]तिरीं येऊन राहिली अपूर्व ठायाला । कचेश्वर शुक्लेश्वर सन्निध दर्शन घ्यायाला ॥ १ ॥

समाधान सर्वांस वाटलें कोपरगांवास । स्वारी शिका-

---

१ राघोबादादा पळत असतां आनंदीबाईस धारेस ठेविलें होतें त्या वेळीं बाजीरावाचा जन्म झाला. २ कोपरगांवीं.

रीस बरोबर जाती कथा उत्सवास ॥ जें करणें तें पुसून करती अमृतरावास । एकास नख लागल्या दुःख होई त्रिवर्ग भावांस ॥ असें असुन नानांनीं मांडिला अति सासुरवास । हळुच नेऊन जुनरास ठेविलें श्रीमंतरावांस ॥ ( चाल ) ॥ इतक्या संधींत सवाई माधवराव मरण पावले । तेव्हांपासून नानांनीं राक्षसी कपट डौल दाविले । परशुराम रामचंद्र निरोपुन मग वाटेस लाविले ॥(चाल)॥ आले खडकी पुलावर श्रीमंतांस घेउनी । दर्शनास नाना परिवारें येउनी । दाखविली याद एकांतीं राव नेउनी ॥ ( चाल पहिली ) ॥ भय मानुनि शिंद्याचें निघाले वांईस जायाला । साताऱ्यांत राहून लागले भेद करायाला ॥२॥

आपण बाळोबा होउन एक केली खचीत मसलत । चिमाप्पास धनी करून राखिली जुनाट दौलत ॥ करारांत दोघांच्या झाली कांहीं किंचित गफलत । ह्मणुनि फिरून नानांनीं उलटी मारून केली गल्लत[1] ॥ सूत्रधारी जो पुरुष ज्याच्या गुणास जग भुलत । हातांत सगळे दोर पतंगापरी फौजा हालत ॥ ( चाल ) ॥ परशुराम रामचंद्र आणि बाळोबास ठाउक रण । राज्यकारणी नव्हेत एक केसरी एक वारण । कठिण गांठ नानांशीं न चाले तेथें जारणमारण ॥ ( चाल ) ॥ महाडास बसुनि नानांनीं बेत ठरविले । बाळोबास शिंद्याकडून कैद करविलें । शिव-

---

१ गडवड.

नेरी गडावर पटवर्धन धराविले ॥ ( चाल पहिली ) ॥ रास्ते झाले जामीन प्रसंगीं अवघड समयाला । असा गुजरला वक्त नेले मांडवगड पाहायाला ॥ ३ ॥

घडी बसवून महाडाहून नाना त्वरितच उलटले । द्वेषबुद्धि विसरून संशय सर्वांचे फिटले ॥ शिंदे भोंसले होळकर मश्रुलमुलक एकवटले । दलबादल डेऱ्यांत श्रीमंतांसन्निध संघटले ॥ बाजीराव राज्यावर बसतां आनंदें जन नटले । तोफांचे भडिमार हजारों बार तेव्हां सुटले ॥ ( चाल ) ॥ नंतर नाना एकविसांमधिं समाधिस्त झाले । महालमुलुख शिंद्यांनीं बेविसांमधिं आपले पाहिले । यशवंतराव होळकर लढाई समजुन उभे राहिले ॥ ( चाल ) ॥ शिंद्यांनीं करून माळव्यांत खातरजमा । केली फौज गंगेच्या रोखावर खुप जमा । सोडीना कंबर कधिं काढिना पायजमा ॥ ( चाल पहिली ) ॥ कुच मुक्काम दररोज बनेना पलंगीं निजायाला । घेई जोठाशीं पचंग समरीं कोण जिंकील याला ॥ ४ ॥

दिला मार वळणास जातिनें पुण्यास येउनियां । शहर सभोंतें वेढून बसले चौक्या ठेवुनियां ॥ खंडेराव रास्त्यांनीं प्रभुला वसईस नेउनियां । सुखांत होते स्वस्थ सतत पंचामृत जेवुनियां ॥ इंग्रजास कुमकेस प्रसंगीं बरोबर घेउनियां । सरमजाम अलिबहादरपैकीं तयास देउनियां ॥ ( चाल ) ॥ अगोदर सोजर तुरुक धांवले मवाशीं दक्षणी ।

त्या भयानें होळकर परतले नाहीं कोणी संरक्षणी । भरधोशानें श्रीमंत त्यावर पुण्यास येतांक्षणीं ॥ ( चाल ) ॥ मग झाला बंदोबस्त पहिल्या सारिखा । परि घरांत शिरला सबळ शत्रु पारखा । लाल शरीर टोपी आंगीं आठप्रहर आंगरखा ॥ ( चाल पहिली ) ॥ धर्म कर्म ना जातपात स्थल नाहीं बसायाला । असें असून संपूर्ण व्यापला प्राण हरायाला ॥ ५ ॥

फार दिवस आधिं जपत होते या इंग्रज राज्याला । अनायासें झालें निमित्त पंढरपुरास कज्जाला ॥ संकट पडलें कांहीं सुचेना प्रधान पुज्याला । रति फिरली सारांश मिळाले लोक अपुज्याला ॥ भयचिंता रोगांनीं ग्रासिलें काळिज मज्जाला । पदर पसरिंती उणाव आणखी नीज निर्लज्जाला ॥ ( चाल ) ॥ परम कठिण वाटलें आठवलें त्रिभुवन रावबाजीला । थोर थोर मध्यस्थ घातले साहेबांचे समजीला । निरुपाय जाणुन हवालीं केलें मग त्रिंबकजीला ॥ ( चाल ) ॥ ठेविला बंदोबस्तीनें नेऊन साष्टीस । एक वर्ष ठेविल्यानंतर या गोष्टीस । केलें गच्छ भाद्रपद वद्यांतील षष्ठीस ॥ ( चाल पहिली ) ॥ स्वदेशीं जागा विकट पाहिली निसुर बसायाला । शोध लाऊन पाठविलें साहेबांनीं धरायाला ॥ ६ ॥

इंग्रजाचा अन्यायी निवाला पाठ पेशव्याची । ह्मणून साहेब लोकांनीं आरंभिली आगळिक दाव्याची ॥ वसई

प्रांत कल्याण गेली गुजराथ पुराव्याची । रायगड सिंहगड बेलग जागा केवळ विसाव्याची ॥ कर्नाटक दिल्लीहून ठाणीं बैसलीं पेशव्यांचीं । कोणास नकळे पुढील इमारत इंग्रजी काव्याची ॥ ( चाल )॥ अश्विनमासीं वद्य एकादशी दोन प्रहर लोटतां । श्रीमंत बापुसाहेब एकांतीं पर्वतीस भेटतां । हुकूम होतांक्षणीं रणांगणीं मग फौजा लोटतां ॥ ( चाल )॥ बैसले राव दुर्बिणींत युद्ध लक्षित । भले भले सरदार सैन्य रक्षित । लागुन गोळी झाले ठार मोरदीक्षित ॥ ( चाल पहिली )॥ तसाच पांडोबानीं केला नाहीं उशीर उठायाला । उडीसरशी तलवार करून गेले लवकर विलयाला ॥ ७ ॥

आला त्रास फार वाटतें ह्यावरून बक्षीस । विन्मुख होऊन श्रीमंत आणिले चहूंकडून स्वामीस ॥ फसले शके सत्राशें एकुणचाळीसांत रणभूमीस । ईश्वर संवत्सरांत कार्तिक शुक्ल अष्टमीस ॥ प्रहरदिसा रविवारीं सर्व आले आरब गुरमाईस । खुप मोर्चा बांधून विनविती श्रीमंत स्वामीस ॥ ( चाल )॥ दारुगोळी पुरवावी आम्ही आज हटकून त्याशीं लढूं । गर्दीस मिळवून देउन पलटणें क्षणांत डोंगर चढूं । शिपाइगिरीची शर्थ करून समशेरी सोन्यानें मढूं ॥ ( चाल )॥ लाविलें बापुसाहेबांनीं तोंड जाउनी । दीड प्रहर रात्र होतांच श्रीमंत दम खाउनी । गेली स्वारी मशाला हिलाल मग लावुनी ॥ ( चाल प० )॥

जलदी करुनि साहेबांनीं लाविलें निशाण पुणियाला ।
खेंचून वाड्याबाहेर काढिलें कदीम शिपायाला ॥ ८ ॥

सकळ शहरचे लोक हजारों हजार हळहळती । सौख्य स्मरून राज्याचें मीनापरी अखंड तळमळती ॥ रात्रंदिवस श्रीमंत न घेतां उसंत पुढें पळती । यमस्वरूप पलटणें मागें एकदांच खळबळती ॥ धडाक्यानें तोफांच्या वृक्ष आणि पर्वत आदळती । त्यांत संधि साधून एकाएकीं दुरून कोसळती ॥ ( चाल ) ॥ भणाभण झालें सैन्य सोडिली कितीकांनीं सोबत । कितिक इमानी बरोबर झुकले घर टाकुन चुंबित । कितिक मुकामीं अन्न मिळेना गेली साहेब नौबत ॥ ( चाल ) ॥ कोठें डेरे दांडे कोठें उंट तट्टें राहिलीं । कोठें होऊन सहज झटपट रक्तें वाहिलीं । कोठें श्रीमंत बाईसाहेब सडी राहिली ॥ ( चाल प० ) ॥ बहुत कोमावली पहावेना दृष्टीनें भयाला । हरहर नारायण असें कसें केलें सखयाला ॥ ९ ॥

माघ शुद्ध पौर्णिमेस बापुसाहेब रणीं भिडले । जखम करून जनरलास फिरतां जन म्हणती पडले ॥ गोविंदराव घोरपड्याचे दोन हात भले झटले । आनंदराव बाबर ढिगामधिं खुप जाऊन गढले ॥ मानाजी शिंदे मागें पाहतांना डोइ देऊन अडले । छत्रपती महाराज तळावर समस्त सांप-

१ जनरल स्मिथशीं बापू गोखल्यानें जो शेवटीं सामना केला होता तो येथें दाखविला आहे.

डले ॥ (चाल) ॥ घाबरले श्रीमंत सुचेना मन गेलें वेधुनी । बाईसाहेबांना तशीच घोड्यावर पाठीस बांधुनी । नेलें काढुनियां अमृतराव बळवंत ज्येष्ठ बंधुनीं ॥ (चाल) ॥ दहा प्रहर पुरे पंतप्रधान श्रम पावले । नाहीं स्नान शयन नाहीं स्वस्थपणें जेवले । आले आले ऐकतां उठपळ राव धांवले ॥ (चाल पहिली) ॥ गर्भगळित जाहले लागले शुष्क दिसायाला । बाईसाहेबांना फुरसद न पडे बसून न्हायाला ॥ १० ॥

दिवाळी आणि संक्रांत कंठिला दुःखांत फाल्गुन । रागरंग नाहीं आनंद ठाऊक रायालागून ॥ सदैव चिंताग्रस्त शब्द बोलती वैतागून । कर जोडून फौजेस पाहिलें घडोघडी सांगून ॥ धैर्य धरून कोणी कसून लढेना क्रियेस जागून । कर्म पुढें प्रारब्ध धांवले लगबग मागून ॥ (चाल) ॥ पांढरकवठ्यावर रिचविल्या घनगारा अद्भुत । थंडीनें मेले लोक उठविले गोरेपगाऱ्यांनीं भूत । बेफाम होतें लष्कर नव्हती कांहीं वार्ता संभूत ॥ (चाल) ॥ ओढवलें कसें सर्वांचें समयीं संचित । कडकडून पडलें गगन जसें अवचित । दुःखाचे झाले डोंगर नाहीं सुख किंचित ॥ (चाल पहिली) ॥ अनुचित घडली गोष्ट दिसेना ठाव लपायाला । कोणे ठिकाणीं नदींत गेलें सैन्य बुडायाला ॥ ११ ॥

जे श्रीमंत सुकुमार वनांतरीं ते भडकत फिरती । कळलें तिकडे भरदिवसास प्रभु कांट्यांमधिं शिरती ॥ आपला घोडा आपण स्वहस्तें चुचकारून धरिती । खालीं पसरून

उपवस्त्र दिलगिरींत वर निद्रा करिती ॥ अस्तमानीं कधिं रात्रीं भात भक्षिती पाटावरती । दरकुच दरमजलीस कृपेंतील सेवक अंतरती ॥ ( चाल )॥ पेशव्यांचे राज्यांत असा नाहीं कहर कोणीं पाहिला । हत्ती घोडे उंट खजीना जेथील तेथें राहिला । बाजीराव होय धन्य ह्मणून याचरी आकांत साहिला ॥ ( चाल )॥ नर्मदेस शालीवाहन शक संपला । त्याठायीं ठेविला शकपंती आपला । भरचंद्र राहुग्रहणांत जसा लोपला ॥ ( चाल पहिली )॥ सांब कसा कोपला लागले गलीम लुटायाला । सिद्ध झाले मालकमास रावराजेंद्र भेटायाला ॥ १२ ॥

समस्त लष्कर दुःखित पाहुन श्रीमंत गहिंवरले । सद्गद झाला कंठ नेत्र दोन्ही पाण्यानीं भरले ॥ आह्मांपुढें जे शत्रु रणांगणीं नाहीं क्षणभर ठरले । ते आमच्या जन्मास दुष्ट चांडाळ पुरुन उरले ॥ केवळ असा विश्वासघात केल्यानें कोण तरले । इंद्र आदि करून आपल्या संकटास अनुसरले ॥ ( चाल )॥ तुमची आमची हीच भेट आतां राव सर्वांनां सांगती । कृपा लोभ परिपूर्ण करित जा द्या दर्शन मागुती । ऐसें उत्तर ऐकून शतावधि पायीं सेवक लागती ॥ ( चाल )॥ महाराज उपेक्षून आह्मांस जाऊं नये । दुर ढकलून शरणागतांस लावूं नये । पहा कसाबाचें घर गाईस दावूं नये । ॥ ( चाल प० )॥ हिंमत सोडूं नये सर्व पुढें येईल उदयाला । कोण काळ कोण दिवस धन्यांनीं पुसावें हृदयाला ॥ १३ ॥

प्राण असुन शरिरांत बुडालों वियोग लोटांत । बरोबर येतों ह्मणून घालिती किती डोयी पोटांत ॥ निराश जाणून झाली रडारड मराठी गोटांत । निर्दयांनीं लांबिवली पालखी पलटण कोटांत ॥ मातबर लोकांचीं ओझीं चालतात मोटांत । गरीब करी गुजराण प्रसंगीं एक्या जोटांत ॥(चाल)॥ कुंकवावांचून कपाळ मंगळसूत्रावांचून गळा । तसा सैन्यसमुदाय उदासिन रंग दिसे वेगळा । धर्म बुडाला अधर्म झाला दुनयेमधिं आगळा ॥ (चाल ) ॥ कसें प्रभुनीं ब्रह्मावर्त शहर वसविलें । अगदींच पुण्याच्या लोकांला फसविलें । हुरहुर करित कां ! उन्हामध्यें बसविलें ॥ ( चाल प० ) ॥ नाहीं तर तोंड पुढें दिसेना जीव जगावयाला । कोणास जावें शरण कोण हरि देईल खायाला! ॥ १४ ॥

विपरित आला काळ मेरुला गिळिलें मुंग्यांनीं । पंडितांस जिंकिलें सभेमध्यें मदांध भंग्यांनीं ॥ भीमास आणिलें हारीस रणांगणीं अशक्त लुंग्यांनीं । कुबेरास पळविलें अकिंचन कसें तेलंग्यांनीं ॥ जळीं राघव माशास आडविलें असंख्य जिंग्यांनीं । जर्जर झाला विष्णुवाहन बदकांचे दंग्यांनीं ॥(चाल)॥ ईश्वरसत्ता विचित्र सारें दैवानें घडविलें । हरिश्चंद्र आणि रामचंद्र नळ पांडवांस रडविलें । फितुर करून सर्वांनीं असलें राज्य मात्र बुडविलें ॥ ( चाल ) ॥ ह्मणे गंगु हैबती जर पावेल शंकर । तर दृष्टीस पडतील पुढें राव लवकर । महादेव गुणी श्रीसं-

तांचे चाकर ॥ ( चाल पहिली ) ॥ प्रभाकराची जडण घडण कडकडित ह्मणायाला । दुरून नारो गोविंद वंदि त्या निशिदिनीं पायांला ॥ १५ ॥

---

## २२. खडकीची लढाई.

ही लढाई सन १८१७ च्या नोव्हेंबर महिन्याच्या पांचव्या तारखेस बाजीराव पेशवे व इंग्रज ह्यांत झाली. पेशव्यांचा मुख्य सरदार बापु गोखले असून त्यांची फौज तेहतीस हजार होती. इंग्रजांचे फौजेंत मुख्य एल्फिन्स्टनसाहेब, क्याप्टन फोर्ड व कर्नल बर हे होते. इंग्रजांची फौज अठ्ठावीसशें होती. ह्या लढाईंत इंग्रजांचा जय होऊन बाजीरावसाहेब पेशवे सातार्‍यास पळून गेले.

हा पोवाडा सगनभाऊकृत आहे.

चाल—कडेपठारीं डोळे झांकून बसला मलुराया ।
स्वामीचरणभेटीचे कैसें केलें मलुराया ॥ —सगनभाऊ.

दक्षणच्या पेशव्यांशीं घाला कधीं नव्हता आला ।
गंगाधर शास्त्र्याचेवरून राज्याचा नाश झाला ॥ ध्रुपद ॥

गंगाधर शास्त्री मारिले पंढरपुरांत । त्याची बातमी गेली इंग्रजांच्या घरांत । तेथुनि माजला कलह[1] ऐका आश्चर्याची मात । त्रिंबकजी डेंगळे हवालीं करून झाले शांत । दोन दिशीं वाद[2] मिटला ठेंविला ठाण्यांत । पुढें[3] व्हायाचें पळून गेले सहाव्या महिन्यांत । इंग्रजांच्या पहाऱ्यांतून असा कोण गेला ॥ गंगाधर० ॥ १ ॥

---

१ " कज्या आला " पा०. २ " तंटा मिटवुन " पा०. ३ " वडिल पंत होण्याचे " पा०.

कोट किल्ले दिले ओलिला त्रिंबकजीसाठीं। महिन्याचा वायदा मसलत केली उफराटी । वसई सुभा [1]दिलारे देवा आड केली ताटीं । कसा तरी जिव वांचो पडल्या दुष्टांच्या गांठी । बाबासाहेब गेले पंढरीला विठलाच्या भेटी । उजवें फूल द्यावें आह्मां माहुलीच्या कांठीं। गोविंदराव काळ्यानें मनसुबा [3]पैहा कैसा केला ॥ गंगाधर० ॥ २ ॥

बापुगोखले मुळींच ऐका बेटावर गेले । बेट जाळून निघूनशानें खडकीवर आले । दोघांचे मोर्चे भिडले आ-काश कडकडलें । बापुगोखले जाऊनशाने तोफेवर पडले। टोपीवाल्याची फेर झडली लढाईवान पडला । लहान थोर जन रणभूमीशीं युद्धास आला । दोहों सैन्यांचा बहुतसा चेंदा तो झाला ॥ गंगाधर० ॥ ३ ॥

दोन पलटणी येउन पुण्यावर गारपिरीं भरल्या । युक्ती युक्तीनें उठवून लावितां खडकीवर ठरल्या । आश्विन महिना एकादशी तरवारी झडल्या । तेराव्या दिसचा स-माचार ऐकुन घ्या दाखला । सत्राशें एकुणचाळीस ईश्वरी नाम संवत्सराला ॥ गंगाधर० ॥ ४ ॥

लाख फौजेचा जमाव झाला श्रीमंतांपाशीं । रणभूमी-वरी येऊन पडल्या तोफांच्या राशी । अल्पिष्टनूसाहेब

१ " देऊं केले " पा०. २ " देऊं केला अडकेल्या " पा०. ३ " पक्का नाहीं " पा०.

स्मिथसाहेब आले रागाशीं । सिंधुराच्या टेंकडीवर दि-ल्या तोफांच्या राशी । अलिपष्टन् साहेबाचा हुकूम तो लइ करडा झाला ॥ गंगाधर० ॥ ५ ॥

करनल बरसाहेब होते पलटणींत । आले धांऊन खड-कीच्या मैदानांत । लढाई करून बहुत केली मात रंजुक झडत । पाचेचा हिरा दडेना वाटोवाटी चंद्र गगनांत । बापु गोखला सकळ सुरवर स्तविती रणांत । तीन लाख फौज पळून गेली बापु गोखला राहिला रणांत । युद्ध केलें त्यानें युद्ध केलें बहुत । बाबासाहेब विश्वास देऊन माहुलीस गेला । बापुगोखला लढतां सवाप्रहर दिवस आला ॥ गंगाधर० ॥ ६ ॥

दळणासरसें[1] किडे रगडिले रडती नरनारी । लेंकराला[3] माय विसरली कसा ईश्वर तारी । आधीं गेले ते पार पडले पुण्याच्या पारीं । पुण्यावरतीं चढले झेंडे केली वारासारी । जो येतो तो लढतो हातामधिं भाला घेउनी । सगन भाऊ ह्मणे ऐशी ईश्वराची करणी । चिंबिछन ह्मणे चंद्र सूर्याशीं कलंक लागला ॥ गंगाधर० ॥ ७ ॥

---

## २३. खडकीची व अष्टीची लढाई, यावर पोवाडा.

खडकीची लढाई झाल्यापासून बाजीराव पेशवे हे एकसारखे

---

१ " दाण्यासंगें " पा०. २ " ती ह्मणती " पा०. ३ " शहरांत लोक आतां रडतात मारी " पा०.



सरदार बापू गोखले.

गांवोगांव पळत होते. त्यांस सन १८१८ चे फेब्रुवारी महिन्यांत जनरल स्मिथ यांनीं पंढरपुरापासून पंधरा मैलांवर अष्टीगांवीं गांठलें. या लढाईंत बापु गोखल्यांनीं वर्णनीय शूरत्व दाखविलें. पांचशें लोकांनिशीं इंग्रेजांचे सैन्यावर ते नदी उतरत असतां हल्ला करून त्यांची दाणादाण करून दिली, व मोठ्या शौर्यानें लढत असतां गोळी लागून पडले. गोखले पडतांच पेशव्यांचे फौजेंत अव्यवस्था होऊन ती पराजित झाली, व इंग्रजांस जय मिळाला.

हा पोवाडा चंद्रभागेच्या कांठीं हनुमंताच्या पारावर बसून रत्नुकेरु नांवाच्या कवीनें कटिबंध छंदांत रचिला, असें पोवाड्याच्या शेवटल्या चरणावरून समजतें.

चाल:—खबर ऐका बदामीची ॥

चाल दुसरी—केशवकरणी अघटित लीला नारायण तो कसा।
जयाचा सकल जनावर ठसा ॥

**पंढरीराया करा दया हालीव सूत्र निर्धारीं। चला करूं पंढरीची वारी ॥ ध्रुपद ॥**

**शके सत्राशें एकुणचाळीसांत श्रीमंत आले आषाढीला। अंत लागेना फौजेला ॥ चौंफेर दिले दलबादल डेरे गोविंदपुऱ्यासमोर। गोखले आणि विंचुरकर ॥ लोक सरसा अरब खासा श्रीमंताचे बरोबर। उतरले पन्न तळ्यावर ॥ फिरंग गोरा पठाण तेरा गोपाळपुरचें ओढ्यावर। रास्ते पटवर्धन मोहरें ॥ सैन्य जमलें बहू रमले आनंद झाला महाद्वारीं। चला करूं पंढरीची वारी ॥ १ ॥**

वेदशास्त्र संतचार कल्पना घेती साधुजन । आज पंढरी दिसती शून्य ॥ गंगाधर शास्त्री पुण्यपवित्र जात होता रस्त्यानें । केवळ विष्णु भगवान ॥ पुढें मागें लोक संगें मशाला जळती जोड्यानें । शास्त्री हो चाले सोवळ्यानें ॥ कोणी मसलत केली गफलत ठाईं ठाईं बसले जपून । धांव घेतली कर्मानें ॥ तस्करानें जलदी करून हात मिळविला जाऊन । मशाला पडल्या गळून ॥ पडला वार झाला ठार प्राण गेला वरचेवरी । चला करूं पंढरीची वारी ॥ २ ॥

झाली गर्दी नाकेबंदी कोणी पुसेना कोणाला । लोक वागेना रस्त्याला ॥ मशालजीनें जलदी करून खबर पोंचविली सेनेला । शास्त्रीबोवा ठार झाला ॥ लोकबळ मायाजाळ घळघळ रडती बावाला । कसा वैऱ्यानें घात केला ॥ मानकरी होते पदरीं पाणी आणिती डोळ्यांला । आमचा पोशिंदा गेला ॥ कारकून पडले शून्य हुजऱ्या स्फुंदत स्फुंदत द्वारीं । कसा कोपला श्रीहरी ॥ चला करूं० ॥ ३ ॥

शिलेदार मर्दशूर ताकीद केली सेनेला । आरबी बाजा फडफडला ॥ कारकून बसुनशान मनसूब रायानें केला । पत्र पाठवा फिरंग्याला ॥ घटका रात्रीं गंगाधर शास्त्री जात होता देवाला । मधीं खपविला रस्त्याला । त्यावेळे झाला काळ उशीर नाहीं घटकेचा झाला । प्रेत जळत तीराला ॥ फिरंग्याला क्रोध आला मुत्सदी कोणीं मारला ।

हातीं कलम घेऊन पडला ॥ रात्रसमयीं पत्र लिहिलें लखोटा कुंपणीला गेला । अवघा वर्तमान लिहिला ॥ कुंपणीनें पत्र पाहून प्रभूशीं जप्ती करी भारी । चला करूं पंढरीची वारी ॥ ४ ॥

सेनेंत झाला बेत घाबरें झालें लष्कर । जीन ठेविलें घोड्यावर ॥ दूर मजली फौज शिणली घाट उतरुन गेले पार । दाखल झाले पुण्यावर ॥ कुच केलें निघुन गेले मुक्काम केला वेळापुरावर । गस्त फिरंग्याची तुरुकस्वार ॥ चौफेर लाल गोल वाजवी तंबुर बासरी । चला करूं पंढरीची वारी ॥ ५ ॥

शुक्रवारीं प्रहर रात्रीं मनसूबा करती आवघे जण । द्यावी चवथाई लिहून ॥ गोखल्याला क्रोध आला लैन काढीन कापून । टोपी झाडाला लावीन ॥ नानाभाऊ दिल्लीस जाऊं जरीपटका सोडीन । बसवूं दिल्लीचें ठाणें ॥ दिल्लीवर सवा प्रहर भाऊनें झेंडे लाविले । बादशाही तक्त फोडीलें ॥ रणीं पडले नांव केलें वंश क्षेत्र्याचा अभिमान । लढाई घेऊं जातीनें ॥ तह ठरला लढाईला कंबर बांधीली गोखल्यानें । खवळला व्याघ्र पंचानन ॥ स्वार झाला निघुन गेला फिरंगी गारपिरावर । श्रीमंत आले नागझरी ॥ चला करूं० ॥ ६ ॥

आदितवारीं पहिले प्रहरीं घालमेल झाली सैनेची । तयारी दारूगोळ्याची ॥ सुरु तोफा सिपाई बाका पाठी-

मागें वामनराव पंची । सिस्त मोठी गोलंदाजाची ॥ गोसावी नंग पिऊन भांग हातीं घेउन समसेर कमची । खबर आह्मी घेतों फिरंग्याची ॥ लोक उमदी आरब सिंद्दी फौज आली पाटणकराची । हवा काय दिसती अंबारीची ॥ निपाणकर पुणेश्वर फत्ते तलवार गोखल्याची । बिकट लढाई कानड्याची ॥ फितुर होता ठाव नवता चोर बातमी फिरंग्याची । तयारी झाली लैनेची ॥ पुढें लैन मधीं सैन्य बाजूनें दाटी तोफेची । पिछाडी तुरुकस्वाराची ॥ साहेब गोरा तीनशें बारा काढिलीं कुलुपें मेण्याचीं । दरद नाहीं त्याला मरणाची ॥ दारू प्याला निसंग झाला हातामधिं झमके तरवारी । जसे कांहीं पांडव क्षत्री ॥ चला करूं० ॥ ७ ॥

तोफ सुटली लैन उठली कडाका पहिला आरबाचा । देवडी मार कानड्याचा ॥ गोसाव्यानें लगट करून मार बसवी तीरकमट्याचा । पाडिला खासा लैनीचा ॥ आलपिटान जलदी करून बुरुज बांधीला फिरंग्याचा । दुहेरी मार तोफांचा ॥ केली हल्ला मधीं शिरला सोडवी गळा कानड्याचा । बंद कापिला गोसाव्याचा ॥ सात हजार गारदी ठार अंत लागेना आरबाचा । लोक फार पडला गोखल्याचा ॥ गोखल्यानें उलट करून वार टाकिला

---

१ 'सिंधी' पा०

गोऱ्यावरी । रीघ निघेना उपाय चालेना फिरली स्वारी ॥ चला करूं० ॥ ८ ॥

रण घुमलें कतल झालें पूर अशुद्धाचा वाहिला । स्वर्गी घंटा वाजला ॥ बाराभाई शिंदेशाई मार्ग त्यांनीं काशीचा धरला । फिरंगी पाठी लागला ॥ दरमजलीं फौज शिणली दाखला पंढरीस आला । मुक्काम त्यानें अष्टीचा केला ॥ अष्टीवर लढाई फार मानकरी थोर थोर पडला । गोखल्याचा अंतकाल झाला ॥ श्रीमंत भयाभित पळुनी घाटपार झाला । पवाडा कटिबंध केला ॥ रत्नु-केरू नाथबहिरू अखाडा महाशूरानें केला । चंद्रभागेच्या तीराला ॥ छंद झाला बसुन केला हणमंताचे पारावरी । चला करूं पंढरीची वारी ॥ ९ ॥

---



नाना फडणवीस सवाई माधवराव पेशवे यांचे मुख्य प्रधान.

# भाग तिसरा.

---

# मराठे सरदार.

---

## १. बाळाजीपंत भानु ऊर्फ नाना फडनवीस, यांवर पोवाडा.

नाना फडनवीस ऊर्फ बाळाजीपंत भानु ह्यांचें नांव माहीत नाहीं असा पुरुष महाराष्ट्र देशांत विरळाच सांपडेल. पानपतचे लढाईंतून नाना फडनवीस परत आल्यावर त्यांजवर नानासाहेब पेशव्यांची मर्जी फारच बसली व तेव्हांपासून ते कारभार पाहूं लागले. त्यांनीं पांच पुरुषांचा कारभार ( कारकीर्द ) पाहिला; त्यांतून तिघां पुरुषांचे वेळीं तर सर्व राजसूत्र यांचेच स्वाधीन होतें. या पुष्कळ दिवसांचे अनुभवावरून त्यांस अतिशयित माहिती होऊन शहाणपण प्राप्त झालें होतें.

अर्वाचीन काळीं होऊन गेलेल्या साडेतीन शहाण्यांपैकीं हे अर्धे शहाणे होते, असें ह्मणतात. राज्यकारभारांत नानाइतका चतुर साऱ्या हिंदुस्थानांत त्या काळीं दुसरा पुरुष नव्हता, असा लौकिक अद्यापपर्यंत आहे. सन १८०० च्या मार्च महिन्यांत पुणेंशहरीं नानांचा काळ झाला आणि त्यांच्याबरोबर पेशव्यांच्या राज्यांतील शहाणपण आणि चातुर्य हीं नष्ट झालीं.

हा पोवाडा बाळा बहिरू नांवाच्या कवीनें केला आहे.

चाल—श्रीमंत महाराज पेशवे अमोलिक सुर्तीमोती ॥

श्रीमंत महाराज सवाई रावसाहेब मोतीदाणा । खुप युक्तीनें[1] राज्य राखिलें यशवंत फडणीस नाना ॥ ध्रुपद ॥

रतिवंतें[2] महाराज पेशवे माधव विष्णू अवतार । हिंदुस्थान कर्नाटक तेलंगण काबिज केलें सारें ॥ घरिं बसल्या घरिं खंडण्या येती वृतांत ऐकां[3] साचार । शिंदे होळकर गाइकवाड नामी नामी सरदार ॥ जाट रोहिले पठाण कांपति राजे उदापूरचा राणा ॥ खुप युक्तीनें राज्य राखिलें यशवंत फडणीस नाना ॥ १ ॥

जरीपटक्याचें निशाण तात्या हरिपंताला सरदारी । चौखंडांमधिं[4] धौंशा[5] वाजतो कइकांला दहशत[6] भारी ॥ हुजरातिची जिलीब[7] चालती मानकरी सेना सारी । पाटणकर घोरपडे निंबाळकर तलवारीचे धारकरी ॥ अपाजि बळवंतराव शिपाईशाईमधिं एक दाणा । खुप युक्तीनें राज्य राखिलें यशवंत फडणीस नाना ॥ २ ॥

भले बुद्धीचे सागर नाना ऐसे नाहीं होणार । मर्दानें हो राज्य राखिले मनसोबीची तलवार ॥ इंग्रेजाला खडे चारिले नाहीं लागुं दिला थारा । दर्यामधीं पिटून घातलें काय सांगूं वारंवार ॥ बदामीचा किल्ला घेतला असा

१ "शर्तीनें" पा०. २ दैवान्. ३ "ज्याचा विचार" पा०. ४ "मुलखांमध्यें" पा०. ५ नौबद, कीर्ति. ६ भीति. ७ खासा स्वारीचा इतबाम.

पुरुष नाहीं शहाणा । खुप शर्तीनें राज्य राखिलें यशवंत फडणीस नाना ॥ ३ ॥

भले बुद्धीचे सागर बुद्धीवंत बुद्धीचे सागर । दुष्टाचें निर्दाळण करुनि राज्य राखिलें एकछतर ॥ श्रीमंतांच्या वाड्यामधीं सबनिस अण्णा खेडकर । कुल अखत्यारी बंदोबस्ती बाळाजीपंत ठोसर ॥ नानापरिचे विलास करितो जैसा गोकुळीं हा कहाना[1] । खुप शर्तीनें राज्य राखिलें यशवंत फडणीस नाना ॥ ४ ॥

लक्ष[2] धन्याचे पायीं चित्तापासुनि हा ज्याचा भाव । पहा राईचे[3] पर्वत केले वाढिवले माधवराव ॥ लग्नासाठीं आणले ज्यानें मोठे मोठे उमराव । जागजागीं दिल्या बैठका अनंत होतो उत्साव ॥ तखतरॉया[4] रथ हत्तीचा पुढें वाजे नौबतखाना । खुप युक्तीनें राज्य राखिलें यशवंत फडणीस नाना ॥ ५ ॥

राव बाजीचें पुण्य प्रतापी पुणें शहर केवळ काशी । गोब्राह्मणां प्रतिपाळितो दक्षिणा श्रावणमासीं ॥ टिकून धनया धन्य ह्मणे या पेशव्याच्या वंशाशीं । बाळा बहिरू करी कविता बसूनियां नित्य गासी ॥ सेवक सिताराम ज्यांचा दशनामीं भगवा बाणा । खुप युक्तीनें राज्य राखिलें यशवंत फडणीस नाना ॥ ६ ॥

---

१ कृष्ण. २ मन. ३ मोहरी. ४ "पागा दिल्या होत्या त्यापुढें वाजतो" पा०.

## २. त्याच विषयावर दुसरा पोवाडा.

ह्या पोवाडा अनंतफंदीकृत आहे.

चाल धुमाळी—कटावाची.

सवाई माधवराव सवाई, सवाई डंखा बजाया। फड-नीस नानाकी तारिफ अक्कलने तो गजप किया ॥ ध्रुपद ॥

विनाधारसे राज्य चलाया ना किसे चकमक झडी। कैक मुच्छदी सब् गये सब् भये नानाकी तो अक्कल बडी। दिल्ली अटक लाहोर माहोर कर्नाटक बीच पुकार पडी। चारों तरफ तजेला निकला चंदा ऐशी किरत बडी। जिने बैठे राज कमाया दिलके ते खुप दिल दिलासा दिया। साहेब बंदगी करना पुना छोड कहू अया न गया। अजी बडी अकल। सवाई माध० ॥ १ ॥

कैक मुत्छदी हो गये अक्कल नानाकी नयी पाया किसे। निजामाल्ली भगा दिया साहेब जसदे हारा ऊसे। टिपूस-रीखे लाये बगलमें ज्या पहुंचे दरवाजेसे। पेशवोका नि-मक जहालम मनी किया वो गाजीसे। क्या नबाबका हुवा खराबा तोबा सब भायि डुबा दिया। तुम हामबी कानोंसे सुनते याजस लेकर कोन गया। कुचबी नहिं। सवाई माधव० ॥ २ ॥

किया मोगलपर हल्ला उसदीन कयी उमराव संगा चले। शिंदे होलकर और नागपुरवाले भोंसले आन मिले। दाभाडे पाटणकर निंबालकर कट्टे लढनेवाले। पवार



महादजी शिंदे ऊर्फ पाटीलबोवा.

जाधव माधवरावके संगात नाना बी निकले। फडके आपाबळवंत रास्ते अबये इसमे कोन रह्या। चुका भुला हुवा देखने कहा आपना आखार गया। अजी किसे खबर। सवाई माधव० ॥ ३ ॥

सब मिले हल्ला किया उडा दिया नबाबके धुडके धुडके। मशरमुलुख पकड कैदमें डाल दिया बैठो चुपके। पानी विगर घोडे उट हत्ती तमाम मर गये नबाबके। रुपयका जल एक कटोरा पानी ऐसी जगा रखे। किसे खबर भयी मेहेरमुलुख नबाबने क्या दिया लिया। फंदी अनंतकु तैक्या मालुम सुनते है कुच कबुल किया। सच होयगा। सवाई माधव० ॥ ४ ॥

---

## ३. महादजी शिंदे,

### यांवर पोवाडा.

अठराव्या शतकांत मराठी राज्यांत नानाफडनवीस हे एक मोठे शहाणे व राजकार्यधुरंधर पुरुष होऊन गेले ह्मणून जशी ख्याति आहे, तशीच महादजी शिंदे हे एक मोठे शूर व अप्रातिम पराक्रमी पुरुष होऊन गेले ह्मणून सर्वत्र प्रसिद्धि आहे. महादजी हे शिंदे घराण्याचे संस्थापक राणोजी ह्यांचे पुत्र. ह्यांनीं सन १७९३ ह्या वर्षी उत्तर हिंदुस्थानांत स्वारी करून दिल्लीपतीकडून पेशव्यांस वकील-ए-मुतालिक हा किताब व वस्त्रें आणिलीं. पादशहाकडून किताब मिळाला ह्मणून आनंदप्रदर्शनार्थ पुणें शहरांत रंगाचा उत्सव

झाला. त्या प्रसंगास अनुलक्षून हा पोवाडा आहे. हा पोवाडा होनाजी बाळ कविकृत आहे.

चाल—ब्राह्मणी राज्य जोरदार घोड्यावर स्वार होते शिपाई ।
जबरदस्ती कैकांनीं पाहिली शत्रु ठेविले नाहीं ॥

द्वापारीं[1] श्रीमाधवविलास भागवतीं प्रत्यय पहावा । तसे कलीमध्यें रंग खेळले श्रीमंत आणि पाटीलबावा[2] ॥ ध्रुपद ॥

पुण्यासारखें दुजें शहर या दक्षिणेंत कोठें नाहीं । धर्मराज श्रीमंत धन्याची त्रैलोक्यामध्यें अवाई । धन्य रणवीर पाटीलबावा पराक्रमी जाणती शाई[3] । नवखंडामध्यें कीर्ति गाजती धनी रावसाहेब सवाई[4] । यशवंत अति श्रेष्ठ तपोबळी साजती ब्रह्म[5] बादशाई । दिल्लीपतीनें माहिमरीत[6] दिली नालकी लवलाही ॥ (चाल) ॥ स्वामी प्रताप अद्भुत वर्णुं कुठवरी । सारें हिंदुस्थान पाटीलबावाचे करीं । घेविलें[7] असून स्वस्थानीं परात्परी ॥ मी वर्णूं कुठवरी हा प्रादुर्भाव स्नेहाचा ऐकावा ॥ द्वापारीं० ॥ १ ॥

शके सतराशें पंधरा चैत्र नाम प्रमादी संवत्सरीं । अत्यादरें हा रंग खेळले उभयपक्षीं हर्ष अंतरीं । बंब भरून रंगाचे ठेविले ठाईं ठाईं शहराभीतरीं । गुलालाचे हौदे भरुनियां खुप कसले हस्तीवरी । तक्तराव्यावर पात्रा नाचती परोपरीं । रंग भरून पिचकाऱ्या घेतल्या सर्वांनीं आपले करीं ॥ (चाल) ॥ एक एकावरीं चालले रंग टाकीत ।

१ द्वापारयुगांत. २ महादजी शिंदे. ३ राजमंडळ. ४ सवाईमाधवराव. ५ ब्राह्मणांची. ६ "माहीमोतंबें" पा०. ७ "घेववलीं स्वस्थानें परसरीं" पा०.

नानांनीं बंब रंगाचे ठेविले जिथें । त्या ठाईं येतां श्रीमंत स्वारी अवचित । सर्व भिजविले तेथें हा कुठवर घोष किर्तीचा वर्णावा ॥ द्वापारीं० ॥ २ ॥

सर्व मुत्सद्दी मानकरी यांच्या हौद्याचे जमावा निशीं । हस्ती सेवकांसुद्धां सकळहीं लाल रंग रसी । रविवार पेठे-मध्यें[1] पाहा तात्यांचे दरवाज्याशीं । दोन बंब रंगाचे भरून ठेविले होते अति सायाशीं । निट बुधवार पेठेंतून श्रीमंत स्वारी गेली त्या ठायाशीं । खुप गर्दी रंगाची केली तात्यांनीं[2] अति उल्हासीं ॥ (चाल) ॥ ते दिवशीं सफेत असा कोण नाहीं राहिला । रंगाविरहित नाहीं दृष्टीनें पाहिला । लौकिक रंग हा पृथ्वीवर पसरला । पुत्रपौत्राशीं सांगा-याशीं जाहला । हा रंग सुवदावा ॥ द्वापारीं ॥ ३ ॥

नानापरी गोकुळीं क्रिडले श्रीमाधवजी कुंजवनीं । तें साक्षात् दृष्टी पाहिलें पुणें नगर पुण्यस्थानीं । नाना परीचे हरिचे विलास शास्त्रीं ऐकिल्या श्रवणीं । पुणें ग्राम गोकुळ क्रिडलें त्यांत कृष्ण श्रीमंत धनी । आधीक देह आमचे आह्मांला भासतसे आपले ध्यानीं । स्वामीपद अवलोकुन दैवी उल्हासी होत नित्यानी ॥ (चाल) ॥ होनाजी बाळा पदरचा आहे किंकर । विज्ञप्ती श्रुत करितों जोडून कर । अक्षई असावी कृपा सेवकावर । धनी बक्षीस देणार । रामा अंदु वांछी स्वामी सेवा ॥ द्वापारीं० ॥ ४ ॥

---

१ फडक्यांचे वाड्याशीं. २ हरीपंततात्या.

## ४. जनकोजी शिंदे,

### यांवर पोवाडा.

जनकोजी शिंदे हे शिंदे घराण्याचे मूळपुरुष राणोजी ह्यांचे नातु व महादजी शिंद्यांचे पुतणे. हे महादजीप्रमाणेंच मोठे पराक्रमी होते. ह्यांचा अल्पवयांतच काळ झाला. ह्यांच्या गुणांचें वर्णन पुढील पोवाड्यांत केलें आहे.

हा पोवाडा परशुरामकविकृत आहे.

**चाल**—हा फंदी फांकडा मज सांपडला गुंडा ।
चालूंदे प्रीत शेवटा देवा मार्तंडा ॥

**जनकोजीराव महाराज फुलांचे झेले । नित्यरंगराग होती अबिर मोतिवाले ॥ ध्रुपद ॥**

**साक्षात् विष्णु अवतार ईश्वरी गादी । यशाची समशेर एकसारखी सद्दी । भर हिंदुस्थान सर करून ठेविला अगदीं । नजराणे देती रोकड आणवून नगदी । सवालक्ष साहेबी सदा सदोदित सरंजाम कडीकोट । पन्नास पलटणें उभीं फऱ्याशीं फरा धरून लखलोट । सत्राशें पसरल्या तोफा भवति अक्षई बांधुन कोट । पुण्याचे पर्वत कर्म शिकंदर ताले । उपेंद्राची संपदा पाहुन मन धालें ॥ जनकोजी० ॥ १ ॥**

**तीन ताल उंच रंगमहाल गोरखी खाशी । मखमाली पडदे भरजरी झालर त्याशीं । नवरंगी गलासें हारोहारीनें लइशीं । कांचेच्या हंड्या दीपक लावुनि सरशी । ठाई**

ठाईं लाविले आरसे आंत तसबिरा काढिल्या दाट । नित्य रंगराग करवुन गातसे अपूसरा थाट । जे विश्व कीर्ति वर्णिती बोलती पुढें बंदिजन भाट । सोनेरी खुर्च्या जडाव कोंदण केलें । पाठीशीं उभे हो सेवकजन हुद्देवाले ॥ जनकोजी० ॥ २ ॥

रमणीक रम्य अंगबाग विलासिक लावुन । अक्षई राहिला वसंत देहिं जाउन । गुलजरा भ्रमरा करती मुद्रा पाहुन । हरपली ताहान भूक क्षणभर नयनीं पाहुन । जोतीबा देव आहे प्रसन्न ज्याला वडिलावडलिपासून । यशाचा नक्षा एकसारखा हा काल पहिल्यापासून । नागाचीं निशाणें हत्तीवर लावून जरीपटका वर कसून । जिलबींत चालति बालंम पटेवाले । अंबाऱ्या झळकती सूर्य आकाशीं डोले ॥ जनकोजी० ॥ ३ ॥

एक देव पाहावा अथवा राव जन बोले । हें दैव योग हो धन्य पाहिले ताले । कडिकोट स्वारी लखलखाट मंदिरीं आले । गाती छंद करून नामीं विठल वावीवाले । असे परशुरामाचे तोंड अति गोड रसिक रंग भरून । वैभवासारिखें वर्णन केलें प्रमाण चित्तीं धरून । दिल्हे खाशानें पोशाग ऐकतां मेहर कृपेचा करून । गुणिरामकृष्ण रामचें जडण सरलें । हें पूर्वपुण्य एकदां फळाशीं आलें ॥ जनकोजी० ॥ ४ ॥

---

## ५. अहिल्याबाई होळकरीण,

### यांवर पोवाडा.

अहिल्याबाई होळकरीण ह्या होळकर घराण्याचे मूळपुरुष मल्हारराव होळकर ह्यांच्या स्नुषा व खंडेराव होळकर ह्यांच्या पत्नी होत. ह्यांचें वय एकवीस वर्षांचें असतांच ह्यांचा भ्रतार निवर्तला. ह्यांस मालिराव नांवाचा पुत्र व मुक्ताबाई नांवाची कन्या अशीं दोन अपत्यें होतीं. अहिल्याबाई ह्या फार सत्वशील, दृढनिश्चयी व उदार होत्या. त्यांस आत्मस्तुति अगदीं आवडत नसे. अहिल्याबाईच्या गुणांचें व सत्कृत्यांचें वर्णन पुढील पोवाड्यांत केलें आहे.

हा पोवाडा प्रभाकरकविकृत आहे.

चाल—हा फंदी फांकडा मज सांपडला गुंडा ।
चालूंदे प्रीत शेवटा देवा मार्तंडा ॥

**सति धन्यधन्य कलियुगीं अहिल्याबाई । गेली कीर्ति करुनियां भुमंडळाचे ठायीं ॥ ध्रुपद ॥**

**महाराज अहिल्याबाई पुण्य प्राणी । संपूर्ण स्त्रियांमधिं श्रेष्ठ रत्नखाणी । दर्शनें मोठ्या पापाची होईल हानी । झडतात रोग दोषाची होईल ग्लानी । वर्णिती कीर्ति गावात संत ते गाणीं । झाली दैवदृशें ती होळकराची राणी ॥ ( चाल ) ॥ उद्धार कुलाचा केला । पण आपला सिद्धीस नेला । महेश्वरास जो कुणी गेला ॥ ( चाल ) ॥ राहिला तेथें जो जाऊन घेऊन बापभाई । संसार चालवी दीन दुबळ्यांची आई ॥ १ ॥**



श्रीमती अहिल्याबाई होळकर.

प्रत्यहीं द्यावीं ब्राह्मणांस [1]दशदानें । ऐकावीं पुराणें बहुल आनंदानें । शोभती होमकुंडें द्विजवृंदावनें । टाकिती हजारों नेमांत अवदानें । + + + + + + + + + + + ॥ ( चाल ) ॥ कधीं कोटि लिंगें करवावीं । [2]वेधूवरें कधीं कधीं मिरवावीं । [3]अर्भकां दुधें पुरवावीं ॥ ( चाल ) ॥ पर्वणी पाहुनी दान देतसे गाई । जपमाळ अखंडित हातीं वर्णू काई ॥ २ ॥

जेथें ज्योतिलिंग जेथें तीर्थें महाक्षेत्रें । घातलीं तेथें नेहमीं अन्नछत्रें । ज्यास आलि [4]जरा झालिं कांहीं विकळ गात्रें । पुरवावीं त्यास औषधें वस्त्रें पात्रें । कितिकांनीं घेतलीं स्मार्त अग्निहोत्रें । दिलीं स्वहस्तें करून त्या भटास क्षणमात्रें ॥ ( चाल ) ॥ आधिं [5]इच्छाभोजन द्यावें । उपरांतिक तीर्थ घ्यावें । वाढून ताट वर मग न्यावें ॥ (चाल ) ॥ जेविल्या सर्व मग आपण अन्न खाई । [6]रघुवीरचरित्रें ती रात्रिस गाई ॥ ३ ॥

यात्राकऱ्यांला वांटी पंचे जोडे । कोणास आंगरखे कोणास धोतरजोडे । कोणास दुशाला कोणास बटूघोडे । गवयास मिळावे सुवर्ण कंठी तोडे । + + + + + + + घाली गिऱ्याशाचे पायांत बेड्या खोडे ॥ (चाल) ॥ बांधिले घांट मठ फार । कुठें शिवास संतत धार । कुठें

---

१ दहा दानें. २ नवरानवरी. ३ बालकांस. ४ उतरती कळा. ५ मागेल तें भोजन. ६ श्रीरामचंद्र.

वनांत पाणी गार ॥ ( चाल )॥ त्यासाठीं मुशाफर कायें धांवत जाई । विश्रांत पावती पाहुन आमराई ॥ ४ ॥

किती ग्रहण संधींत तिलतुला त्या केल्या । कधिं कनक रौप्य आणि कधीं गुळाच्या भेल्या । सांभाळ करून काशीस यात्रा नेल्या । कावडी शतावधि रामेश्वरीं गेल्या । संसारीं असुन तिच्या वासना मेल्या । तिजपुढें सहज मग मुक्ति उभ्या ठेल्या ॥ ( चाल )॥ कवि गंगु हैबती ह्मणती । पुण्याची कोण करील गणती । राज्यास होती पडपणती ॥( चाल )॥ महादेव गुणीचें लक्ष तिचे पाईं । कवनांत प्रभाकर करितसे चतुराई ॥ ५ ॥

---

## ६. मल्हारराव होळकर,

### यांवर पोवाडा.

मल्हारराव होळकर हे तुकोजी होळकरांच्या चार पुत्रांपैकीं एक असून अहिल्याबाईचे पणतु व प्रसिद्ध आणि शूर यशवंतराव होळकराचे बंधु होत. हे मोठे पराक्रमी होते. यांनीं लाख्या बारगीर नांवाचा शूर योद्धा आपले पदरीं बाळगिला होता. दौलतराव शिंद्यांचें व यांचें कांहीं कारणावरून वैमनस्य पडलें होतें. त्यावरून मल्हारराव होळकरास जिवंत धरून आणावें ह्मणून दौलतराव शिंद्यानें आपले कारभारी जीवबादादा यांस सांगितलें. जीवबादादा होळकरावर स्वारी करून निघाले, ही बातमी मल्हारराव होळकरास कळली मात्र तोंच ते देवपूजा टाकून लाख्या बारगिरास बरोबर

लाख्या बारगिर, मल्हारजी होळकर रणामधिं बघा नवरा । तिसरा खिजमतदार संगतीं इमानाचा होता पुरा ॥ दारूच्या अमलांत झमाझम उडूं लागल्या तलवारा । माणूस पडलें फार शाईमध्यें पाहूं लागलें भिरभिरा ॥(चाल)॥ शाईमध्यें माइचा पुंत[1] । जोडगोळ्या[2] भरून बारचेत । पाहुनि मारी छातींत[3] । राव मल्हार[4] केला चित । मागुन मारिला लाख्या बारगिर प्रेतावर पडलें प्रेत । तिसरा खिजमतगार, राख मग चौघांची एकच मौत ॥ वाहवाजी मल्हार० ॥ ४ ॥

मोठे मोठे सरदार करिती विचार मनामधिं चकचुरं[5] होती । काय बलावणें झालें मल्हारबा सवती आपली बाजु होती । कांहींच घेणें कांहींच देणें नाहीं आपुलिया हातीं । जें झालें तें बरें झालें द्या रायाला मुठमाती ॥ (चाल)॥ तुह्मी होळकर बोलवा । तुह्मी करा मातेची सेवा[6] । थडग्याला[7] काम तुह्मी लावा । होळकर शाईमधें मल्हारबा होता एकचि पूत । खुप केलीस तलवार सवाई मल्हारी नांव साजत ॥ वाहवाजी मल्हार० ॥ ५ ॥

लाख्या बारगिर मल्हारराव रण बहिरी कां मारला ॥ (चाल)॥ लाख्या बारगिर ज्यानें ठेविला । खुप छाती

---

१ "एक होता पठाणी पुत्र" पा०. २ "आंगें होता सराईत । जोड गोळ्या घालून बारांत" पा०. ३ "उभा राहिला रस्त्यांत । मल्हारराव आला नीट । गोळी मारी पाहून छातींत" पा०. ४ "घोड्यावरून पाडी प्रेत" पा०. ५ खिन्न. ६ "राज्याची सेवा करा । जेजूरीचें देऊळ बांधा" पा०. ७ "तळ्याशीं" पा०.

लिहिलें याच्या दैवांत । आयुष्याची दोरी तुटली कसे कोपले भगवंत ॥ वाहवाजी मल्हार० ॥ १ ॥

लाख्या बारगीर हिंडुन आला दरबारीं घेउन सारी सेना । लाख रुपये कुठून द्यावे हिय्या[1] कोणाचा होईना ॥ लाख्या बारगीर ह्मणे मल्हारबा आलों मी तुमच्या दर्शना । मल्हारजी होळकर बोलुं[2] लागला नाहीं लाखाचा परगणा ॥ ( चाल ) ॥ ज्यानें थोर हिय्या केला । लाख्या बारगीर ठेविला । एक घोडा बसाया दिला । पन्नास माणूस दिमतिला । दहा माणूस सेवेला । किती जेवी त्याच्या पंक्तीला । पांचशें रुपये निवळ मोजून घातले त्याच्या पदरांत । असे रुपये कितीक झाले[3] करा वर्षाचें गणीत ॥ वाहवाजी मल्हार० ॥ २ ॥

मल्हारजी[4] होळकर नेटके करित बसले देवपूजा । एकाएकीं झाली गर्दी आग लागली दारूच्या गंजा ॥ लाख्या बारगिर धांवून आला ह्मणे मल्हारबा मनीं समजा । काय बसला निश्चिंत घडीभर ठेवा गुंडाळून देवपुजा ॥ ( चाल ) ॥ राव मल्हार उठले आंगं । हातिं घेऊन ढाल फीरंग । हिमत कर मामा अंगें । तो लाख्या बारगिर संगें । तुह्मी ह्मोरे या मी मागें । मल्हाररावाची दासी बोलली दिनभर बसा डेऱ्यांत । तिला दिलें लवंडून मल्हारबा गेले रागांत ॥ वाहवाजी मल्हार० ॥ ३ ॥

१ " छाती कुणाची " पा०. २ " बोले माझा नऊ लाखांचा परगणा " पा०. ३ लाख्या बारगीरास मल्हारराव रोज पांचशें रुपये देत असे. ४ " आदितवारचे दिशीं " पा०.

लाख्या बारगिर, मल्हारजी होळकर रणामधिं बधा नवरा। तिसरा खिजमतदार संगतीं इमानाचा होता पुरा॥ दारूच्या अमलांत झमाझम उडूं लागल्या तलवारा। माणूस पडले फार शाईमध्यें पाहूं लागलें भिरभिरा॥(चाल)॥ शाईमध्यें माइचा पुंत[1]। जोडगोळ्या[2] भरून बारचेत। पाहुनि मारी छातींत[3]। राव मल्हार[4] केला चित। मागुन मारिला लाख्या बारगिर प्रेतावर पडलें प्रेत। तिसरा खिजमतगार, राख मग चौघांची एकच मौत॥ वाहवाजी मल्हार०॥ ४॥

मोठे मोठे सरदार करिती विचार मनामधिं चकचुरें[5] होती। काय बलावणें झालें मल्हारबा सवती आपली बाजु होती। कांहींच घेणें कांहींच देणें नाहीं आपुलिया हातीं। जें झालें तें बरें झालें द्या रायाला मुठमाती॥ (चाल)॥ तुह्मी होळकर बोलवा। तुह्मी करा मातेची सेवा[6]। थडग्याला[7] काम तुह्मी लावा। होळकर शाईमधें मल्हारबा होता एकचि पूत। खुप केलीस तलवार सवाई मल्हारी नांव साजत॥ वाहवाजी मल्हार०॥ ५॥

लाख्या बारगिर मल्हारराव रण बाहिरी कां मारला॥ (चाल)॥ लाख्या बारगिर ज्यानें ठेविला। खुप छाती

---

१ "एक होता पठाणी पुत्र" पा०. २ "आंगें होता सराईत। जोड गोळ्या घालून बारांत" पा०. ३ "उभा राहिला रस्त्यांत। मल्हारराव आला नीट। गोळी मारी पाहून छातींत" पा०. ४ "घोड्यावरून पाडी प्रेत" पा०. ५ खिन्न. ६ "राज्याची सेवा करा। जेजूरीचें देऊळ बांधा" पा०. ७ "तळ्याशीं" पा०.

हिप्या केला । शहाअली बोवा गुरू बोलला । शुरमर्दांचा पोवाडा । थोड्या दिवसांमधिं पंची वाजवून गेला चौघडा ॥ ( चाल ) ॥ पुढें होणार जाणार । तें ब्रह्मचांचें अक्षर । हें कदा नाहीं चुकणार । बोले राणू सुतार । रहिवाशी पुणें शहर । राजुताजुशा फकीर । ठिकाणा राहतो उंदिर गांवांत । त्याची दृस्ती नाहीं कोणाला । कजब्यांला जोडून हात ॥ वाहवाजी मल्हार० ॥ ६ ॥

---

## ७. यशवंतराव होळकर,

### यांवर पोवाडा.

यशवंतराव होळकर हे तुकोजी होळकराचे पुत्र व प्रसिद्ध अहिल्याबाईचे पौत्र होत. हे मोठे धीट व शूर होते. बाजीरावांनीं आपला बंधु विठोजी ह्यास मारिलें त्याबद्दलचा सूड उगविण्यासाठीं सन १८०२ ह्या वर्षी ह्यांनीं पुणें शहर लुटलें. यशवंतराव होळकरापासून आपला बचाव व्हावा ह्मणून शेवटल्या बाजीरावानें इंग्रज लोकांचा आश्रय केला ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. यशवंतराव शूर होते इतकेंच नाहीं तर त्यांनीं फारशी व मराठी भाषांचा उत्तम अभ्यास केला होता. यशवंतरावांस सन १८०८ ह्या वर्षी वेड लागलें, व सन १८११ च्या ऑक्टोबर महिन्याच्या बाविसाव्या तारखेस त्यांचा काळ झाला.

---

[१] पुण्यास कजब्यांत दोन शेकसल्ले आहेतः एक मोठा व एक लहान. राजु ताजुशा हा ह्यांपैकीं एका शेकसल्ल्याचा मुजावर होता.

हा पोवाडा आनंदफंदी संगमनेरकर ह्यांनीं केला आहे.

**चाल**—दोदिवसांची तनु हे साची सुरतरसाची करून मजा ।
गमजा करतां मनिं उमजाना हें सुख पुढें पडेल वजा ॥

—रामजोशी.

सुभेदार यशवंत कन्हेया सदा फत्ते करी तलवारी। सवाई यशवंतराव होळकर प्रसन्न मल्हारी हस्त शिरीं ॥ ध्रुपद ॥

वडिल नावकर मल्हार ऐका गर्दी झाली त्यावरती । जे सावध होते परंतु सर्यंत केली सरतासरती। भाऊ यशवंतराव बहादर ऐकुन घ्याया ह्या कीर्ति । दोन लाख फौजेचा जमाव दों वर्षांमधिं घ्या गणती । बनकस कंपू पठाण कडिये फौजेमधिं नित्य झडतीं । मान भिडावुन देति लढावुन टोपीवाले नाहीं गणती । नागोपंत सरदार शिपाई अनेक उमराव हे बहिरी ॥ सुभे० ॥ १ ॥

शहर पुण्याशीं यावें ऐसा विचार ठरला फौजेचा । दरकूच घेउनि अघाडी मुकाम केला फलटणचा । मागुन दुसरा गोलपठाणशाह आमदखान मीरखानचा । मार्गी येतां लढाई संग्राम झाला टोपीवाल्यांचा । उद्यां लढाई दुसरी नेमिली आला हलकारा लष्करचा । खाशासुद्धां करुनि तयारी मुकाम केला जेजुरिचा । किं मल्हाराचें दर्शन घ्यावें मग निर्दाळावे वैरी ॥ सुभे० ॥ २ ॥

---

१ यशवंतराव होळकर जेजुरीस गेल्यावर देवाच्या गाभाऱ्यांत जाऊन देवास ह्मणालाः "देवा, तुह्मी देवळें पायऱ्या आह्मीं कशाला बांधल्या ? पूजा, नगारखाने कशाला चालविले ? त्याचा उपयोग आज व्हावा. नाहीं तर आतां

सोमवारच्या दिवशीं प्रातःकाळीं लढाई नेमिली । फत्ते-सिंगमानी यांणीं तलख लिहून पाठविली । अशी लढाई करा ह्मणावें मागें मोहरें नाहीं जाहली । टोपीवाले फार हरामी त्यांणीं बहु धुंद केली । सवाई यशवंतराव जाऊन अंगें तलवार चमकविली । दोन लाख फौजेमधिं जाऊन कणसापरि कत्तल केली । तमाम कंपू पळ सुटला च कडे गेले हो पेंढारी ॥ सुभे० ॥ ३ ॥

सवाई मल्हार ऐका गर्दी झाली त्यावरती । बेफाम होते परंतु भली केली सरता सरती । सवाई यशवंतराव बहादूर ऐकून घ्याव्या या कीर्ति । दोन लाख फौजेचा जमाव दो प्रहरांमधिं घ्या गणति । बंक कंपु पठाण कडवे फौजेमधीं नित्य झडती । मान भिडावून देती लुढा-वून टोपीवाले नाहीं गणती । फत्तेसिंग मान्या कुलअख-त्यारी ऐकुनि घ्या या शूर मूर्ति । नागोपंत सरदार शिपाई अनेक उमराव हे बहिरी । जसा कृष्ण अवतार मुरारी गोपिकांवर कृपाकरी ॥ सुभे० ॥ ४ ॥

सुभेदार महाराज प्रतापी नामें ऐका एक मोहोरा । कारमारी ऐकुनि घ्यावे हरनाथाचा कुलकल्ला । शहर

---

मी आपला प्राण येथें देतों. तिसरा घंटा वाजतांच शिरच्छेद करून घेईन." असें ह्मणून पूजा बंद केली. पुजाऱ्यास आंत येऊं देईना. दोन घंटे वाजले. तिसरा वाजणार तोंच तलवारीचें म्यान सरकलें. मग यशवंतरावास आनंद होऊन सव्वालाख रुपयांचें सोनेरी भंडार जेजुरीस उधळिला.

पुण्याची नाकेबंदी वागुं देईना पसारा । खाटमार मोठा कठिण नाहिं कुठें ऐकिली तऱ्हा । मार देउनि खंडण्या घेतो चौमुलखामधिं दरारा । वडिला वडिलीं पुरुषार्थ महिमा सवाई यशवंतराव जुरा । आनंदफंदीचे छंद ऐकतां लढाई झाली ही सारी । सुभेदार यशवंत कन्हेया सदा फत्ते करी तलवारी । सवाई यशवंतराव होळकर प्रसन्न मल्हारि हस्त शिरीं ॥ सुभे० ॥ ५ ॥

---

## ८. फत्तेसिंग गायकवाड,

### यांवर पोवाडा.

फत्तेसिंग गायकवाड हे गोविंदराव गायकवाडाचे चिरंजीव. सन १८०६ मध्यें यांस अधिकार मिळाला, व सन १८१८ च्या जूनचे २३ वे तारखेस अल्पवयांत मृत्यु पावले.

हा पोवाडा अनंतफंदीनें केला आहे. ह्यांत एक विशेष मौज अशी आहे कीं, बडोद्याच्या स्थितीचें आणि पुण्याच्या स्थितीचें साम्य दाखविलें आहे. फंदीबोवा नेहमीं पुण्यास राहत असून पेशवाईची सर्व बारीकसारीक माहिती त्यांस होती, ती त्यांनीं बहुतेक यांत बहारीनें मध्यें गोंविली आहे.

**चाल**—आला हो वनवास पर्ता गेला नवतीचा गडे चाहणारा ।
आतां समजलें राजा भर्तृहरी भरतपूरचा राहणारा ॥

**चाल दुसरी**—कुंकु कपाळीं शोभत नाहीं रत्नागिरीच्या जोतिबा ।
माझें रूप स्वरूप पारखें झाला आहे तोबा तोबा ॥

**पुण्यांत बाजीराय बडोद्यामध्यें फत्तेसिंग महाराजे ।**
**उदार स्वामी सेवक त्यांना कर्णाची उपमा साजे ॥ ध्रु०॥**

इकडे अमृतराय[1] वडिल तिकडे बाके आनंदराय दादा ।
इकडे प्रभु बाजीराय तिकडे फत्तेसिंग साहेब जादा ।
इकडे अप्पासाहेब[2] तिकडे महाराज सयाजी उमदा ।
इकडे पांच[3] चार वाडे तिकडेही तसाच महाल जुदा[4] ।
इकडे स्वामी चाकरीस पलटणें तिकडे सेवक इंग्रेज ।
पुण्यांत० ॥ १ ॥

इकडे[5] स्वार शिपाई तिकडेही संच थोडे बहुत ।
इकडे श्रावणमासीं दक्षिणा तिकडेही धर्म होत ।
इकडे आल्यागेल्याचा आदर करितात यथास्थित श्रीमंत ।
तिकडेही जो आला गुणिजन तो नाहीं गेला रिक्तहस्त ।
इकडे पेशवे तिकडे गायकवाड उभयतां शिरताज ।
पुण्यांत० ॥ २ ॥

इकडे भरगच्ची पांघुरणें तिकडेही याहून चढी ।
इकडे अन्नशांतीचा तडाखा तिकडेही चालू खिचडी ।
इकडे आदितवार बुधवार तिकडे मांडवींत घडमोडी ।
इकडे मुळामुठा तिकडे विश्वामित्रा जोडी जोडी ।
इकडे तलाव पर्वतीचा तिकडे सुरसागर नांव गाजे ।
पुण्यांत० ॥ ३ ॥

---

१ अमृतराव; यांस राघोबादादांनीं दत्तक घेतलें होतें. २ चिमणाजीअप्पा. ३ बुधवारचा वाडा, शनवारचा जुना वाडा, विश्रामबागचा वाडा, शुक्रवारांतील वाडा. ४ दुसरा; वेगळा. ५ पुणें ह्या शब्दाबद्दल कवीनें इकडे ह्या शब्दाची योजना केली आहे.

इकडे भूमीवर आंथरूण तिकडे रेतीमुळें घरोघर खाटा ।
इकडे पैका पुष्कळ तिकडेही सुवर्णांच्या लाटा ।
इकडे जुना वाडा तिकडे लहरीपुऱ्याचा बोभाटा ।
इकडे पुरण वरण तिकडे चुरमा क्वचित वरंटा पाटा ।
इकडे पैठणी लफ्फे तिकडे उशा जवळ अमदाबाज ।
पुण्यांत० ॥ ४ ॥

इकडे हत्ती घोडे पालख्या तिकडेही कमती नाहीं ।
इकडे राव बाजी तिकडे फत्तेसिंगाची द्वाही दुराई ।
इकडे जोगेश्वरी तिकडेही दैवत बेचराई ।
इकडे देवस्थानें तिकडेही तशीच सांगूं काई ।
इकडे लोक दक्षिणी तिकडे गुजराथी न्यारी मिजाज ।
पुण्यांत० ॥ ५ ॥

इकडे उत्साह गणपतीचा तिकडे तशीच चंपाषष्ठी ।
इकडे हरदासांच्या बिदाग्या तिकडे तशाच भरमुष्टी ।
इकडे मेघडंबरीं तिकडेही तशीच पहा जा दृष्टी ।
इकडे ओंकारेश्वर तिकडे मुक्तेश्वर नवीच सृष्टी ।
इकडे दिग्गज पहिलवान तिकडे जेठी कुस्त्या रोज ।
पुण्यांत० ॥ ६ ॥

इकडे नानाफडणीस तिकडे सिताराम दिवाण गाजी ।
इकडे पंत सदाशिव तिकडे शास्त्री गंगाधर दाजी ।
इकडे बाग मळे तिकडेही हरजिन्नस होती भाजी ।

इकडे माती तिकडे रेती, हारफेर जमिनी माजी ।
इकडे हौद पाण्याचे तिकडे कुव्यावर मोठी मौज ।
पुण्यांत० ॥ ७ ॥
इकडे रावबाजी पंढरीस आषाढी यात्रे जातात ।
तिकडे विसा कोशांवर डाकुरजी पंढरीनाथ ।
इकडे गंगा जवळ तिकडेही तसेंच रेवातीर्थ ।
इकडे तसाच तिकडे घटाव दोन्ही कडला यथार्थ ।
इकडे कडे न तोडेवाले तिकडेही तशीच लहज ।
इकडे आनंदफंदी तिकडेही जाऊन आला सहज ।
पुण्यांत० ॥ ८ ॥

---

## ९. थोरले सयाजीराव गायकवाड,
### यांवर पोवाडा.

थोरले सयाजीराव गायकवाड हे सन १८१९ ह्या वर्षी गादीवर बसले. हे शरीरानें बळकट असून मोठे बुद्धिवान्, शूर व धार्मिक होते. हे आपला राज्यकारभार स्वतः पाहात असत, ह्यामुळें खट-पटी लोकांचें ह्यांच्यापुढें फारसें फावत नसे. सन १८२५ ह्या वर्षी बिशप हेबर नांवाचे एक इंग्रज प्रवासी बडोद्यास गेले होते. त्यांनीं आपल्या प्रवासवर्णनांत सयाजीरावांच्या भेटीचा व बडोद्यास भर-लेल्या दरबाराचा वृत्तांत दिला आहे. ते ह्मणतात:— " हलींचे गायकवाड ( सयाजीमहाराज ) हे मोठे बुद्धिवान् पुरुष असून सर्व राज्यव्यवस्था स्वतः पाहातात, व ह्यामुळें त्यांच्या कारभाऱ्यांचें त्यां-

च्यापुढें कांहींच तेज पडत नाहीं. हे राज्यकारभार नीतीनें व हुशारीनें चालवितात. ह्यांच्यांत एकच व्यंग आहे तें कोणतें ह्मणाल तर "द्रव्यलोभ". सयाजीराव हे सन १८४७ त निवर्तले. ह्यांच्या गुणांचें व कारकीर्दीचें वर्णन पुढील पोवाड्यांत आहे.

हा पोवाडा प्रभाकर ह्यांनीं केला आहे.

**चाल**—दोदिवसांची तनु हे साची सुरतरसाची करून मजा ।
गमजा करतां मनिं उमजाना हें सुख पुढें पडेल वजा ॥

—रामजोशी.

**धनी सयाजीमहाराज धुरंधर भाग्यवान भूपती । स्त्रिया पुत्रसहवर्तमान ते भोगितात संपत्ती ॥ ध्रुपद ॥**

**प्रौढ प्रतापी शाहू छत्रपति सिंहासनीं सुंदर । सभोंवताली सरदार शूर मध्यें आपण पुरंधर । प्रांत परगणे गांव ज्यांनीं सोडाविले गिरिकंदर । सरनाम तें तयास दिधलें जहागीर एकंदर । फौजबंद गायकवाड सेनापती समशेरबहादर । वंशध्वज त्या वंशीं जन्मले हे स्वकर्मीं सादर ॥ ( चाल ) ॥ महाराजसयाजी लालसा । करी प्रकाश कुळीं दिनमणी[१] फारसा । देई चिंतित चिंतामणी पहा कसा । तसा पुरुष ह्या दिसांत पहातां नाहीं असा अधिपती । सुपुत्र ऐसा प्रसवली धन्य ती जननी धन्य ते पती ॥ १ ॥**

**निष्कलंक निर्दोष स्वामिनीं करून पूर्वार्चन । प्रसन्न केला असेल मागील जन्मीं भाललोचन[२] । पदोपदीं तो**

१ सूर्य. २ शंकर.

सांब ह्मणून करी प्रसंगीं भयमोचन । धैर्यवान दृढ पिंड न बाधे पदार्थ होई पाचन । जोडच्या जोर कसून खूप केलें बळसंचन । सहस्रांत सौंदर्य गौरपण पीत जसें कांचन ॥ ( चाल ) ॥ पगसें तुरा वांकडा कानावर दिसे जरा ···गोजरा । कानीं भिकबाळी चौकडा साजरा राजबीज फांकडा ॥ सुशोभित दिसे शरीरसंपत्ती । गळ्यांत कंठ्या हार कडीं करीं जडावाचीं तळपती ॥ २ ॥

मर्जी होईल त्यादिशीं स्वारी कुलतमाम शृंगारणें । पूर्व कधीं पश्चिमेस जाती मृग शिकारीकारणें । भरधांव फेंकून अडरानांत घोडा चुचकारणें । स्वतः सिस्त बांधून गोळी टाकून ठीक मारणें । भील लोक बोथाटी टाकितां वरचेवर वारणें । मागें पुढें बाजूस हूल दावून भाला फेरणें ॥ (चाल) ॥ सुतिहात तिरंदाजीचा । डावा हात दुसऱ्यावर बाजीचा । आणिती अन्याय गरीब गाजीचा । छाणिती खबरदार लिहिण्यांत कल्पना इतरांचीं अल्पंतीं० ॥ ३ ॥

सर्व गोष्टींचा शोक जातीनें हुशार तर कुस्तीस । दंड भुजा आंटिव उमर रायांची तीस पस्तीस । तूप साखर आणि कणिक ऊंस चारून आणुन मस्तीस । साठ मार चहूंकडून खिजविती नित्य नव्या हस्तीस । पहिलवान

---

१ संकटाचें निवारण. २ " पगडीस " पा०.

किती जेठी येऊन राहतात तेथें वस्तीस । खुराक उत्तम त्यांस कारकून वर बंदोबस्तीस ॥ ( चाल ) ॥ हें जाणुन कविसागर धांवति । गुणसभेस नटनागर दाविती । बक्षीस कडीं लंगरादिक पावती । ज्यांकडे पाहती कृपादृष्टि तो करतील लाखोपती । सप्त पिढ्यांचें दरिद्र विच्छिन्न होऊन रिपु लोपती ॥ ४ ॥

भक्तजनाचें माहेर देशावर श्रीपंढरपुर । याचकांस हें योग्य बडोदें सर्व क्लेश करी दुर । नित्य उठून वांटितात खिचडी ब्राह्मणही माहामूर । स्त्रिया पुरुष मुली मुलांसरसकट शेर होतो भरपूर । पुण्यवानू गायकवाड जगतीतळांत ते महशूर । सर्व कनकमय लोक घरोघर निघे सोन्याचा धूर ॥ ( चाल ) ॥ जें देणें दिलें एकदां योजून । तें परत न घेती कदा समजून । कोणी फंद करील जर कदा मानून । दर्शनास तो अयोग्य त्यावर विधि हरिहर कोपती । अशा प्रभूच्या रक्षणार्थ उडी घाली म्हाळसापती ॥ ५ ॥

अहारे बडोदेंशहर कोट काम मजबूत । चार दरवाजे चार दिशे ज्यांवर शिपाई लालबूत । चोहों रस्त्यांवर दाट हवेल्या काप संगिन शाबूत । मांडवींत मोहोरमांत जमती सर्व तेथें ताबुत । अजब शहर वसाविलें गिराशे करून नस्तनाबुत । बागबगीचे तलाव साहेब घेति हवा तंबूंत ॥

( चाल ) ॥ महा जागृत राजेश्वर[1] पावती । संकटीं नीळकंठेश्वर[1] धांवती । भूत वाटेस यवतेश्वर[1] लावती । बहुत उग्र नरसिंह[1] समंधादिक थरथरां कांपती । प्राशन करितां तीर्थ हिमज्वर इतर रोग करपती ॥ ६ ॥

विठ्ठलमंदिर[1] सुरेख दुसरें देऊळ बालाजीचें[1] । खंडेराव[1] दक्षिणेस उत्तरपंथीं बेचराजीचें[1] । भीमनाथ[1] केदार[1] रामेमंदिर रंगामेजीचें । महाकाली[1] मंदीर लक्ष्मी लक्षणीक मुख जीचें । गोजिरवाणी मूर्त नांव नारायण[1] सुंदर जीचें । कांहीं पुढें बाहेर महंमदवाडींत घर काजिचें ॥ (चाल) ॥ किति धर्म हरिभक्तिचा[2] होतसे । लल्लु[2] पारख खुष वक्तिचा दिसतसे । सामळ[2] सौदा नक्तिचा करितसे । दैवशाली गोपाळराव[2] मैराळ ह्यांची अपार संपत्ती । खुशालअंबईदास[2] रत जनीं असे कितिक धनपती ॥ ७ ॥

महाराजांचे आप्त अवांतर धारकरी बरोबर । घोरपडे उमराव एकासारखे एक करती डौल डंबर । घोरपडे उमराव लक्ष्मणराव कसुन कंबर । मागें न फिरती रणांत पडल्या तुटुन जरी अंबर । मानसिंगराव सिर्के आणिक रघुनाथराव बरे । थोर कुळींचे मर्दराजे मंडळींत असे नंबर ॥ (चाल) ॥ मामांची मानमान्यता चांगली ।

---

१ हीं बडोद्यांतील देवालयांचीं नांवें. ह्यांत बेचराजी, नरसिंह आणि भीमनाथ हीं देवस्थानें फार प्रसिद्ध आहेत, व ह्यांच्या पूजेचा वगैरे खर्च गायकवाड चालवितात. २ हीं बडोद्यांतील प्रसिद्ध सावकारांचीं नांवें.

करतील दूर दैन्यता लागली। ही चौघांमध्यें धन्यता वागली। भाऊ पुराणिक पूर्ण कृपेंतिल जें कारण स्थापिती। मान्य पडे तें प्रभ गुरुवर दया करी गोपती ॥ ८ ॥

हस्तमुखें खावंद गादीवर बसुन सकुमार । रुमाल चौरी धरितात वर भोंवते उभे किंकर । नारायणराव दिवाण विठ्ठल भास्कर जोडून कर । सदय हृदय शास्त्रज्ञ मुतालिक मुख्य भिमाशंकर। रामचंद्र विश्वनाथ फडणीस येती पुढें लौकर । मुजुमदार ते नारायणराव माधव करंदीकर ॥(चाल)॥ विश्वासुक बक्षी खरे मर्जीचे । किति शब्द सुचविती बरे अर्जीचे । गोपाळपंत गुणी पुरे मर्जीचे । कृपावंत सरकार ह्मणून श्रम सारे हरपती । चाहती उमाशंकरास बारिक काम कोण कोपती ॥ ९ ॥

अशा पतीचें उमाकांत कल्याण सदोदित करो । गाई हस्ती अश्वांचा अपार पागा भरो। पुत्रपौत्रीं राज्यलक्ष्मी अशीच अक्षयीं ठरो । शत्रु पराजय करून प्रतापें राजनीति आचरो । दान दक्षणा धर्मीं निरंतर चित्तवृत्ति अनुसरो। गंगुहैबती शीघ्रकवीची प्रपंचचिंता हरो॥ (चाल)॥

---

१ दुसरे सयाजीराव गायकवाड ह्यांनीं गोंधळी व त्यांसारखे पोवाडे रचणारे इतर कवि ह्यांस बराच आश्रय दिला होता ह्मणून लौकिक आहे; आणि ही गोष्ट सयाजीरावाचे पुष्कळ पोवाडे उपलब्ध आहेत ह्यावरून खरी ठरते. परंतु पुढें जे गायकवाड झाले त्यांनीं तसा आश्रय दिला नाहीं. खंडेराव गायकवाड ह्यांनीं ह्या लोकांस थोडाबहुत आश्रय दिला होता ह्मणून ऐकतों. परंतु त्यांच्या

दाहा चौकीं काम उठवून संगिन । हरजिनसी य......
रंगीन । गातात गुरु आठवून चंगिन । महादेवाचें कवन
कमळवर भ्रमर गुणी झेपती । प्रभाकराची नजर हीच
करणीं धन्यास विज्ञप्ती ॥ १० ॥

---

## १०. नागपुरकर चिमणाजीबापु भोंसले
### यांवर पोवाडा.

चिमणाबापू हा मुधोजी भोंसल्याचा मुलगा. ह्याचाच भाऊ दुसरा

---

वेळीं मागच्यासारखा सुरस व सरळ पोवाडे करणारा कोणी निपजला नाहीं. खंडेरावाच्या वेळचे अलीकडे बरेच पोवाडे आह्मास मिळाले आहेत पण हे मागच्यांशीं तलना करून पाहिले असतां ते निरस आहेत हें पुढील पोवाड्यावरून लक्षांत येईल:—

### खंडेरावमहाराज गायकवाड यांवर पोवाडा.

पूर्वतपामुळें राज्य तुह्माला हो साही । धन्य खंडेराव महाराज फाकडे सवाई गुणग्राही । पुण्यवान धर्मशील राज्य असें दुसरें नाहीं । चौंदेशांमधें तारीफ तुमची फिरत दिशा दाही । जशी गोकुळीं कृष्ण तसे या युगीं प्रभुराई । धन्य खंडेराव महाराज खुशालींत आहे गायकवाडीशाही ॥ ( चाल ) ॥ रायीं प्रभात कानीं हिरवा लोलक चमके । कांतीचा सुवास अगंजा सुगंध भमके । शिरींपेंच पगडीवर झमझमाट झमके । धमके भुमीवर चंद्र तसा राजेंद्र करिराज । मोतीबाले अलबेले सवाई नक्षा दूर गाजे । गायकवाड समशेरबहादर हिरे खंडेराव महाराज । नळराजाची पदवी कर्णाची उपमा साजे ॥ १ ॥

स्वरूपवान बुद्धिवान राजे मुदीवरले ठिकडे । मूर्त चांमली तेज लकाकित जसे नाजुक मुखडे । मेहर झाली कंपनीची दिले चांद मोर्चेलाचे झमके प्रभुराज महाराज धनी शाहीचे मह्रा छकुडे ॥ ( चाल ) ॥ छकुडे पुण्याचे पुरुष अवतारी । होतो लक्ष मनुष्यांचा मुजरा दरबारीं । शहरांत मात कडकडीत निघे स्वारी । दोही रस्त्यानें मुजरे करती सर्वांच्या शिरीं आलें तेज । राजद्वारीं होतो गजर चौघडा अष्टौप्रहर गाजे । गायकवाड समशेरबहादूर० ॥ २ ॥

रघुजी ऊर्फ बापूसाहेब नागपुरचा तिसरा राजा होता. हा चिमणा-बापू नागपुरचा राजा नव्हता. ज्याप्रमाणें चिमाआपा यांनीं थोरले बाजीराव यांचें साहाय्य केलें तसें चिमणाबापूनें केलें. हा मोठा शूर होता. हा सन १७८९ त मरण पावला. यापूर्वींचीं बारा वर्षें याचे कारकीर्दीचीं होतीं असें समजावें.

हा पोवाडा सुलतान कवींनें नागपुर शहरीं केला.

चाल—हा फंदी फांकडा मज सांपडला गुंडा ।
चालुं दे प्रीत शेवटा देवा मार्तंडा ॥

**शिपाई चाकरी गेले नागपुराला । तेली वाणी उदमी दाली बांधूं लागला ॥ ध्रुपद ॥**

**राजांनीं मनसुबा केला बंगाल्यावर । पाहिले मोहतुर दिले खासे डेरे । बोलावून मानकरी कचेरी भर । झाली चिमणाबापूची ताकिद जलदी फार ॥ राव-माने मानकरी घाटगे पाटणकर । यादव निंबाळकर ज्यातक जाधव ढमढेर । ननवरे पठाण सारे । झाली हुजूरात तयार । अगड धों धों बाजे चवघडा बाहेर निघाला । रावबांड निशाण हाय उजव्या बाजुला ॥ शिपाई० ॥ १ ॥**

**वनीं येळ[1]वाच्या जाळ्या वन दारुण । कइकांनीं आवें[2]-धाकें दिले प्राण सोडुन । कइकांसीं आलें हिवजाळ धास्तिनें । गेली फौज सोमल वाड्यावर चालुन ॥**

१ वेळूच्या. २ भयानें.

मग सोडलीं निशाणें। हल्ला उठला चहुंकडून। मग सुटती तोफा बाण। झाली लष्करांत सडघाण। भेसूर दिसे रण। जरीपटका गेला चालुन। रावमान्याची लगी हाय उजव्या बाजुला। गेले मारीत खंदकापाशीं मोरच्या दिला ॥ शिपाई० ॥ २ ॥

तेली वाणी उदमी नाइक पडले भरी। कर्जाची घेतली घोडी आले चाकरी। गेले वऱ्हाडांत फिरून माहुरावरी। दरकूच आले कवडूच्या तळ्यावरी ॥ मनसुबी थोपली सारी। बोलावून मानकरी। सांगितलें बरवेपरी। आली बंगाल्याची चाकरी। ओलांडून गेले बारी। गेले चवके बारीवरी। अशी फौज मिळून गेले नकटे बारिला। एक ह्मणती उगाच आलों पस्तावा झाला ॥ शिपाई० ॥ ३ ॥

गेलें लष्कर झाडीमधीं पडलें जाऊन। मधिं पडली फट बुणगे गेले चुकुन। तीनरोज लष्कर गेलें गडबडून। धाडून सांडणी मिळाली फौज येऊन ॥ तेल्या वाण्या उदम्यानें। घोडें आणलें अर्धलिनें। गेलें एकाएकीं मरून। दिलें जिन खोगीर टाकून। काय जावें देशा कारण। कधीं तोंड दाविना ह्मण। गेलें लष्कर कटकावर जागा पाहीला। तेथें जंबुमाळ्याचा लाल बाग देखिला ॥ शिपाई० ॥ ४ ॥

---

१ भयंकर.

एक आंबराइमधीं उतरलें लष्कर । किल्ल्याहून गोळ्यांचा मार निघेना धीर । शिंपी साळी पिंजारी पळती भिऊन माघारें । तेली वाणी उदमी होती पाठमोरे ॥ एकजात शिपाई रणशूर । मारिवले खंदकावर । दाहारोज सोसला मार । शिपायाचें ढाल बखतर । गोळ्या फोडुन होती पार । गडबडलें सोमलपुर । गडबडला किल्लेदार कवलासी आला । दिली खंडणी राजाला तिथून शह उठविला ॥ शिपाई० ॥ ५ ॥

एक उडव्या मुलखामधीं गेलें लष्कर । सहा महिने छावणी झाली कटकावर । तिथें बारा भाटिचा किल्ला ऐका थोर । त्या खंदकामधीं सुसरी महाकुंजर ॥ नादान मुलुख फार । नाहीं पैसा तांब्याची तार । कवड्यांची चाल फार । खायाशीं भात खापर । नेस लंगोटी वर धोतर । अंगीं कळकट बोतर । झाल्या खुशाल रांडा पाहुन भल्या लोकाला । अवघ्या लष्करामधिं उडव्या मुलुख उठला ॥ शिपाई० ॥ ६ ॥

गेली फौज चालून ढाक्या नाल्यावर । तिथें सोडलीं निशाणें झाले तयार । झाली पहिली हल्ला लोक पडले फार । आली हल्ला फिरून माघारी जयजयकार ॥ भले मर्द शिपाई रणशूर । धांवले खंदकावर । लोक जखमी झाले फार । कईकाचीं बुडालीं घरें । रणकंदन अनिवार । लढण्याची हौस फार । गडबडला किल्लेदार

लागले झाडी तोडायाला। देइना खंडणी तसाच पळून गेला ॥ शिपाई० ॥ ७ ॥

पुरीवर लष्कर गेलें महिनाभर। एक श्रावणमास महिना पवितर। तिथें जगन्नाथ एक देव तीर्थ थोर। त्याचें दर्शन घेतां पापें होतीं दुर ॥ देवाचें शिवालय थोर। लागेना अंतनापार। राम लक्षुमण अवतार। रिद्धी सिद्धीचें घर। एक मडकें विस्तवावर। दहा मडकीं होतीं तयार। वाणी कुणबी ब्राह्मण बसले जेवायाला। एके जागीं जेविती अवघा गोपाळकाला ॥ शिपाई० ॥ ८ ॥

एक बालेसरावर उतरलें लष्कर। तेथें उत्तर पेठ आहे दरयाचे किनार। गजकर्ण दुःख रोग उठले अंगावर। चारी प्रहर वर्षतो काहार निघेना धिर ॥ आला पाऊस सुटला वारा। गारांनीं बसविला मार। गेले उडून राव्हट्या डेरे। उंट तट मेलीं फार। देवाची करणी फिरंगी आला। राजाची फत्ते तलवार यश पावला ॥ शिपाई० ॥ ९ ॥

भगवंत दिलें वरदान आले फिरुन। एक बंगाल्याची चाकरी झाली कठीण। जो दान पुण्य करील तोचि निधान। रणशूरा दानशूराला देव प्रसन्न ॥ कर दया धर्मनिधान। देव काढील विघ्नांतुन। कवि सुलतान ह्मणे त्याचें वेळापुर ठिकाण। भानुहयवती सांगेल खुण।

बाळा अवध्यामधीं अज्ञान । नागपुरीं पवाडा केला बसुन गायाला । चार साहेबजादे बसले ऐकायाला ॥ शिपाई० ॥ १० ॥

---

## ११. नागपुरकर आपासाहेब भोंसले, यांवर पोवाडा.

हा पोवाडा सन १७३१ सालानंतर लिहिला असावा असें दिसतें, कारण भोंसल्यांस नागपूरचें राज्य सन १७३१ च्या सुमारास इंग्रजांस मिळालें. हा पोवाडा आपासाहेबाविषयीं आहे तथापि यांत इतर गोष्टीही सामील केल्या आहेत. यांतील सर्वच गोष्टी इतिहासांत नाहींत. हा पोवाडा करणारा बापू नांवाचा मराठा शेतकरी असल्याकारणानें त्यानें ऐकीव माहितीनें केला आहे.

**चाल**—अर्जुना मज आवडत नाहीं ।
भक्तिवीण कांहीं मज आवडत नाहीं ॥ अर्जुना ॥

उमाबाई करी रोदना राजाचे[1] साठीं । कधीं येतील महालाप्रती ॥ ध्रुपद ॥

शंभर वर्षें राज्य केलें पहा भोंसल्यानें । गुरुकृपेनें ॥ बारो[2] वर्षें राज्य केलें चिमणाबापूनें । एका बुद्धीनें ॥ कर्नाटक बदामी घेतली चिमणाबापूनें । तलवारीनें ॥ गौड[3] देश बंगाला घेतला चिमणाबापूनें । इभ्रतीनें ॥ पुण्या-

---

१ आपासाहेबांसाठीं. २ चिमणाबापू हा मुधोजी भोंसल्याचा मुलगा. ह्याचाच भाऊ दुसरा रघोजी ऊर्फ बापूसाहेब नागपूरचा तिसरा राजा होता. ३ सन १७७९.

सारखें तखत हलविलें चिमणाबापूनें । वसविलें ठाणें ॥ राव पेशवे लोक मराठे चालति कडाख्यानें । भीवरथडीनें ॥ सुंदर चिमणाबापूस रस्ता दिधला नदीनें । त्याचे सत्तेनें ॥ टिपू[1] सुलतान मेला, वाट पडली तधिंपासून । फिरंगी नव्हता मालूम ॥ बाजीरॉव पेशवे गेले दर्यासी चालून । फिरंगा आणला त्यानें ॥ बाजीरावांनें[3] घर बुडविलें आपल्या हातानें । करणी केलि नबाबानें ॥ दक्षिण सोडून आला फिरंगी पहा तो डंकेन । पुण्यामधिं वसविलें ठाणें ॥ तवां तो राजा ह्मणे उद्यां मी पुसीन अवघ्यांशीं । पत्र पाठवा पुण्याशीं ॥ उमाबाई० ॥ १ ॥

तवां तो गोरा ह्मणे गाविलगडिं गडा पाहीन । जलदी आला चालून ॥ फिरंग्यानें पैन खाईली आपल्या जातीनें । गाविलगड ह्मणे मी घेईन ॥ फितुर केला गोंडानें । रस्ता दाखविला त्यानें । गडावर गेला चालून ॥ नामी होता सरदार बेनिसिंग आपल्या जातीनें । तलवार खुप केली त्यानें ॥ बेनिसिंगाचा सवाइ सपाटा केला छापा त्यानें । फिरंग्याचि केली धुळधाण ॥ जेर केला

---

१ टिपू सुलतान हा सन १७९९ चे मे महिन्याचे ४ थे तारखेस मेला. २ होळकराचे भीतीनें सन १८०२ त वसई मुक्कामीं राव बाजी पळून गेले. ३ सन १८०२ चे अखेरीस रावबाजीनें वसई मुक्कामीं तह केला व त्यामुळें जो अनर्थ झाला त्यास उद्देशून हें लिहिलें आहे. ४ ह्या गोष्टीविषयीं माहिती मिळत नाहीं. ५ डंकन हे कर्नल आर्थर वेल्स्ली ( ड्यूक ऑफ वेलिंग्टन ) ह्यांचे सैन्यांतील सरदार असावे. ६ दुसरा रघोजी ऊर्फ बापूसाहेब.

फिरंगी मरून गेला आपल्या हातानें । निमक राखलें त्यानें ॥ तवां तो गोरा ह्मणे मुल्क हा मोठा तुफान । खानेकु नहि मिलता आन ॥ तवां तो गोरा[1] ह्मणे नागपुर एकडाव पाहीन । जलदी आला चालून ॥ सीताबर्डीवर मुक्काम केला ऐका चित्त देउन । बंगला बांधला त्यानें ॥ दोन ओणे[2] लिहून दिल्हे बापूसाहेबानें । राज्य करावें भोंसल्यानें ॥ उमाबाई० ॥ २ ॥

चौखुंटांचें राज्य दिधलें आपासाहेबाला । बाळाला[3] तक्तीं बसविला ॥ मारुन बाळा राजा, राज्य केलें आपासाहेबानें । नव महिन्यांचें प्रमाण ॥ काशीबाई[4] सती निघाली पाहिलें अवघ्यानें । शाप दिधला सतीनें ॥ धर्माजीनें मुल्क लूटला केलें वैराण । खर्चीं खुप केली त्यानें ॥ धर्माजीचे दिवस पूरले, बुड केली त्यानें । मरणा गेला जातीनें ॥ उमाबाई० ॥ ३ ॥

मग मारुन धर्माजीला बातमी कळली बाईला । क्रोध बाईशीं आला ॥ जवळ होता पंडितजी[6] मनसुबा सांगि-

---

१ ऑनरेबल माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन. हे सन १८०४ त नागपुरीं आले. २ हें देवगांवचे तहास अनुलक्षून लिहिलें आहेसें दिसतें. ३ परसोजी हा चवथा राजा. ४ परसोजीची बायको. ५ हा बाकाबाईचे तर्फेचा होता. परसोजी राज्यकारभार चालविण्यास अयोग्य ह्मणून त्याचे मांडीवर कोणास तरी बसवून राज्य चालवावें असा बाकाबाईचा व तिचे अनुयायी यांचा मनोदय होता. तो आपासाहेबास न रुचून त्यानें बाकाबाईस कैद केलें व धर्माजीस ठार मारिलें. आपासाहेबाचे भीतीनें गुजाबादादा प्रयागास पळून गेला. हें सर्व झाल्यावर परसोजीस मारिलें. ६ नारायणराव पंडितजी हा काशीकडील राहणारा असून नागपुर मुक्कामीं व्यापार करीत असे. व्यापारी असून हा पुढें मुत्सद्दी बनला.

तला तीला । कैद करावें राजाला ॥ "कैद करा राजाशीं, राज्य देतों तुह्माशीं" । असें सांगा इंग्रेजाशीं[1] ॥ तसे चौघे चालून गेले सीताबर्डीला । हकिकत सांगती फिरंग्याला ॥ " करा कैद राजाला, राज्य देतों तुह्माला " । तेव्हां फिरंगी हांसला ॥ दोन हत्ती रुपये कबूल फिरंगी झाला । पहा रामचंद्र वाघाला ॥ उमाबाई० ॥ ४ ॥

तैसे चौघे चालून आले पहा त्या महालाला । हाकिकत सांगति राजाला ॥ " कां बसलां निश्चिंत गोरा येतो लढाईला " । असा पंडितजी बोलला ॥ यादव[3] माधव पोवान बरकत तो चालुन आला । जमाव फौजेचा झाला ॥ भिकन खान पठाण जमादार तो चालुन आला । मोर्चे लावी किल्ल्याला ॥ गणपतराव सुभेदार आले चालून । संगातीं लोक घेऊन ॥ साडेतीनशें हत्ती राजाचें जन पहाति दूरुन । जसें कां मुंग्याचें सैन्य ॥ साठ हजार फौज राजाची उभी नटून । हुकुम मागती अवघेजण ॥ सुरू झाली लढाई ठाउक नाहीं कवणाला । फितुर घरच्यानें केला ॥ उमाबाई० ॥ ५ ॥

तैसे चौघे चालुन आले पार[4]डी महालाला । हकिकत

१ सर रिचर्ड जेंकिन्स् हे ह्या वेळीं रेसिडेंट होते. २ रामचंद्र वाघ, नागो पंडित, नारायणराव पंडित व चवथ्याचें नांव माहित नाहीं. ३ हीं नांवें अप्रसिद्ध आहेत. ४ हें नागपुरचे पश्चिमेस दोन कोसांवर गांव आहे. येथें राजाची छावणी असे. तेथें एक राजाचा वाडाही असे. प्रस्तुत पूर्वीपैकीं कांहींएक नाहीं.

सांगति राजाला ॥ दोन गोष्टींचें काम आहे यावें जातीनें । राज्य घ्यावें समजून ॥ तेव्हां आरब बोलले नको जाऊं भेटीकारण । राजे गेले उठून ॥ ह्मणे राजा निर्मळ वचन ऐकलें त्यानें । वर दिला उमाबाईनें ॥ मला आण पित्याची गाईचें पुच्छ धरून । क्रिया केली ब्राह्मणानें[1] ॥ जवळ होता हलकाऱ्या घोडा आणविला त्यानें । राजा गेला चालून ॥ सीताबर्डीवर चालुन गेला आपल्या जातीनें । बसविला हात धरून ॥ जवळ होता सोजर तंबुर वाजविला त्यानें । तुरूप पडला जाऊन ॥ तवां तो राजा ह्मणे हाल होतिल या जिवाशीं । कुणि नाहीं माझ्या पाशीं ॥ उमा० ॥६॥

बाणापाठीं बाण गणपतरावानें मारला । फिरंगी थरथर कांपला ॥ रामचंद्र वाघानें गोळा सणाटा भरला । आवाज तोफेचा केला ॥ माय टाकी लेंकरूं पळे जीव आपला घेऊन । मराठ्यानें धरलें रान ॥ अवघे गेले पळुन बाणी राखिली आरबानें । देहवळा मारी क्रोधानें ॥ फिरविल्या तोफा जिन घोड्याचें उतरून । फिरंगी जातो येथून ॥ फिरवला जरिपटका पहा रामचंद्र वाघानें । लढाई बंद केली त्यानें ॥ या आदितवारीं लढाई करावि नेमाची । मदत आहों तुह्माशीं ॥ उमाबाई० ॥७॥

---

१ या ब्राह्मणाचें नांव विनायकराव. याचे वंशज सधन असून प्रस्तुत राज्यकर्त्यांची एकनिष्ठतेनें सेवा करीत आहेत. यांजकडे मोठ्या हुद्याचें काम आहे ह्मणून ऐकतों.

तेरा रोज आरब भांडले पहा फिरंग्याशीं । कुणितरी मदत नाहिं त्यांशीं ॥ दोन हत्ती रुपये कबूल झाले आरबाशीं । आरब ना मानी फिरंग्याशीं ॥ फोडूं पंडितजीची कोठी जाऊं देशाला । तवां समजलें दुनियेला ॥ तवां तो गोरा चालुन गेला राजाचे पाशीं । कटारी लावी छातीशीं ॥ "दे द्वाही आरबाशीं, नाहिं तरि मारितों तुशीं"। असें बोलला राजाशीं ॥ ह्मणे राजा निर्मळ असवें टाकी धरणीशीं । लीहून दिलें आरबाशीं ॥ उमाबाई० ॥ ८ ॥

राजा धरला ह्मणून बातमी उमाबाईला । अंग टाकिलें धरणीला ॥ तूं धर्माचा पिता करुणा येऊंदे तुला । विनवी रामचंद्र बाबाला ॥ दे सोडून राजाला आह्मी दोघें जातों काशीला । राज्य देऊं फिरंग्याला ॥ सुवर्णाच्या पांच पायऱ्या बांधिन अंबाळ्याला[1] । धर्म वांटिन लोकांला ॥ चालतां न बोलतां दया आली पंडितजीला । राजा त्यानें सोडवीला ॥ फार केले नवस देव पावला बाईशीं । राजे आले महालाशीं ॥ संगें देऊन सोजर राजे आले महालाशीं । पाणी ठेविलें अंघोळिशीं ॥ उमाबाई पुसे कशी गत झाली राजाशीं । बसले तोंड धुयाशीं ॥ तंव तो राजा ह्मणे उद्यां मी पुसीन अवध्याशीं । बातमी

---

[1] अंबाळें या नांवाचें एक मोठें तळें रामटेक गांवीं आहे. हें मोठें तीर्थ मानिलें आहे.

कळली बाईशीं ॥ कोणीं धरिला राजा, कोणीं सोडविलें राजाला । पुसा रामचंद्र वाघाला ॥ हाणा आमचा वैरी उद्यां मारिल आह्मांला । कैद करावें राजाला ॥ तैसे चौघे चालुन आले पहा त्या महालाला । कैद केलें राजाला ॥ उमाबाई ह्मणे भोजन वाढुं द्या राजाशीं । ढकललें उमाबाईशीं ॥ उमाबाई० ॥ ९ ॥

तवां ती बाई ह्मणे पाठवा कलकत्त्यावर । राजा जाऊं दे लौकर ॥ नामी होता सरदार गंगासिंग अपुल्या जातीवर । पलटुन उभे राहिले सारे ॥ किल्ल्यांतुन बाहिर काढिले राजे सुंदर । कुणिकडे गेला ईश्वर ॥ राजा प्राण्याविना महाल सुना दिसतो सत्वर । कसा कोपला ईश्वर ॥ राजा प्राण्यासाठीं कैक लोक झाले फिकिर । रडतें नागपूर सारें ॥ राजा प्राण्यासाठीं त्यजिलें अन्नपाणी सारें । बरें ना वाटे घरदार ॥ खळ खळ रडतो राजा आसु टाकी धरणीवर । कुणिकडे गेलें चंद्रपूर ॥ गंगासिंगाची नजर गेली राजाचे वर । आसवां पुसे लौकर ॥ " कां ह्मणून जी दिलगिरि, कुणि नाहीं आपला जवळ" । "आपला आहे ईश्वर" ॥ समजले महाराज गंगासिंग सांग लवकर । जाणें कलकत्त्यावर ॥ आला भोग भोगाया त्यास व्हावें सादर । जसा एक दैवाचा फेर ॥ हरिश्चंद्राचे मागें लागला विश्वामीत्र । तारामती सुंदर ॥ डोंबाघरीं पाणी वाहिलें सत्वर ऐकीलें । स्त्री विकुनी दान केलें ॥ उमाबाई० ॥ १० ॥

हत्ती दिला सोडून तिसऱ्या मुक्कामावर । राजे काढले बाहेर ॥ गंगासिंग तो घेउन चालला राजा सत्वर । महादेवाच्या[1] जवळ ॥ गंगासिंगाशीं आली निद्रा निजले लौकर । राजे होते हुषार ॥ महादेव पार्वती आली त्या राजाजवळ । खुण सांगे दिल्ली शहर ॥ " येथ नको राहुं चल असिरच्या[2] किल्ल्यावर । फिरंगी आहे येणार " ॥ गंगासिंगाची झाली निद्रा उठले लौकर । राजे होते हुषार । अदृश्य झाले देव, राजा पाहतो सत्वर । कुणिकडे गेला ईश्वर ॥ गंगासिंग तो घेऊन चालला राजा सत्वर । पहा असिरच्या किल्ल्यावर ॥ उमाबाई० ॥११॥

राजा सुटला ह्मणून बातमी कळली फिरंग्याला । फिरंगी मनांत घाबरला ॥ कुणिकडे गेला राजा, कुणिकडे जाऊं पाहण्याला । "राजा कुणिकडे गेला" ॥ तवां ती बाई ह्मणे बातमी समजली मला । महादेवाच्या पहाडाला ॥ बारा हजार आणि लाडसाब[3] चालून गेला । महादेवाच्या पहाडाला ॥ घडिभर झडली चकमक गगनीं सूर्य झाकुळला । बाप ओळखेना लेंकाला ॥ पंचमोडीचा[4] राजा मोहनसिंग तो एक अलबेला । बातमी

---

१ मध्य प्रदेशांत एक प्रसिद्ध देवस्थान आहे, हें पंचमडी पर्वतांत आहे. २ असिरगड हा बऱ्हाणपुराजवळ ७ कोसांवर आहे. ३ मध्यप्रांतांत हुद्देदार साहेब लोकांस " लाड " ह्मणण्याची चाल आहे. ४ हा पर्वत आहे. ज्याप्रमाणें 'महाबळेश्वर' आपल्या इकडे आहे त्याप्रमाणें हा पर्वत मध्यप्रांतीं आहे.

सांगे फिरंग्याला ॥ येथ नाहीं राजा चल असिरच्या किल्ल्याला । राजा तेथं राहिला ॥ बारा हजार आणि लाड-साब चालुन गेला । पहा असिरच्या किल्ल्याला ॥ चौदा हजार पेंढारि[1] पहा शिंद्याचा सूटला । मदत राजाकडे झाला ॥ पदरीं नव्हती खर्ची हुक्का राजानें विकला । किंमत काय साठ हजारांला ॥ फोडिले खजिने लुटून दिले कैकांला । लढाई घ्या ह्मणून बोलला ॥ कैक गेले पळून, कैक पडले धरणीला । गणती नाहीं मुरद्याला ॥ सलाम तलवार सवाई झाली भोंसल्याची । रुपये वांटा फौजेशीं ॥ आपासाहेबानें तैलंगा खुप गारद केला । टोपी आली नागपुराला ॥ उमाबाई० ॥ १२ ॥

राजा सुटला ह्मणून बातमी उमाबाईला । बहु समजावी मनाला ॥ पदरीं नव्हती खर्ची राजा कुणिकडे गेला । कुणिकडे जाऊं पाहण्याला ॥ नळानिळासारखी कशि गत झाली राजाला । कंठ बाईचा शोषला ॥ राजा राजा करतां करतां प्राण बाईचा गेला । शव मग पडलें धरणीला ॥ मेली उमाबाई बातमी कळली राजाला । कसा दैव मजवर कोपला ॥ भगवीं केलीं वस्त्रें, राख लावी आंगाला । जोग राजानें केला ॥ सत्रंजी उतरुनि शिखांच्या मुलखांत गेला । ईश्वर मदत होता

१ पेंढाऱ्यांचा नाईक 'चितु' ह्या आपासाहेबांस भेटल्याचें आपासाहेब-प्रकरणीं सांगितलें आहे.

त्याला ॥ देवधर्म अवघी बरकत गेली काशीला । रोजमार अवघ्यांचा बुडाला ॥ तिकडे कसें जाहलें इकडे ठाऊक नाहीं आह्मांला । पोवाडा बापूनें केला ॥ बापू मराठा ह्मणे ह्मोर युद्ध होईल भारी । लढाई झाली नागपुरीं ॥ उमाबाई० ॥ १३ ॥

---

## १२. परशुरामपंत भाऊ पटवर्धन,

### यांवर पोवाडा.

परशुरामपंत भाऊ पटवर्धन हे दक्षिण महाराष्ट्र देशांतील तासगांव येथील जहागीरदार असून पेशव्यांच्या फौजेचे मुख्य सरदार होते. हे मोठे शूर व महत्वाकांक्षी होते. यांचें कोल्हापूरच्या राजाबरोबर वैमनस्य होतें. त्यामुळें कोल्हापूरकरांच्या व पटवर्धनांच्या लढाया झाल्या, त्यांपैकीं पट्टणकुंडीच्या लढाईत परशुरामभाऊंस जखम लागून ते पडले. एकवेळ सवाई माधवराव पेशव्यांनीं परशुरामभाऊंस आज्ञा केली कीं, तुह्मीं कोल्हापुरच्या राजास कैद करून तेथें आपलें ठाणें बसवावें, व तीन लक्षांची खंडणी घेऊन ती पुण्यास पाठवून द्यावी. परशुरामभाऊ लागलेच तासगांवास आले व आपले चिरंजिव रामचंद्रपंत-अप्पा ह्यांचेबरोबर दहा हजार फौज देऊन कोल्हापुरास पाठविलें. पुढें पटवर्धनांची व कोल्हापुरकरांची अळतें मुक्कामीं लढाई झाली. ह्या लढाईस अळत्याची लढाई ह्मणतात. ह्या लढाईंत पटवर्धनांचा पराभव झाला व रामचंद्रपंत कोल्हापूरकरांच्या हातीं सांपडले. रामचंद्रपंतांचा कोल्हापुरच्या महाराजांनीं सत्कार केला, व

त्यांस उत्तम पोषाख बक्षीस देऊन व कांहीं दिवस ठेवून घेऊन स्वदेशीं रवाना केलें. आपल्या मुलाचा पराभव झाला हें परशुरामभाऊंस आवडलें नाहीं. मग त्यांनीं मोठें सैन्य घेऊन कोल्हापुरावर स्वतः स्वारी केली. ह्या स्वारींत पटवर्धनांस यश आलें. मग कोल्हापूरकरांकडून ओलीस घेऊन परशुरामपंत तासगांवास परत आले. ह्या दोन्ही प्रसंगांचें वर्णन पुढील पोवाड्यांत केलें आहे.

हा पोवाडा कोल्हापूरचा राहणारा जिवाजी पांचाळ ह्यानें केला.

चाल—दक्खनच्या पेशव्याशीं घाला कधीं नवता आला ।
गंगाधरशास्त्रीचे वरून राज्याचा नाश झाला ॥

चाल दुसरी—श्रीमंताच्या बावन पागा त्यामधीं बावन सरदार। रघु० ॥

तासगांव अपूर्व परशुरामभाऊचें शहर । गणपतीचा उत्साह होतो हरिस्मरण गजर ॥ ध्रुपद ॥

भाऊसाहेबांचा नित्य नेम त्याचें दर्शन घ्यावें अगोदर। असे एक धनी श्रीमंत त्याला पेशव्यांचा आधार । पुण्य प्रताप नांव थोर आलें श्रीमंताचें पत्र । पाहिला वाचून मजकूर ॥ (चाल) ॥ मग आणूनियां ध्यानांत । डेरे दिले पाहून मुहूर्त । वाजे नगारा नौबत । कुचावर कुच करीत ॥ (चाल) ॥ गेले साळप्याच्या घाटा धनी उमराव । तेथें बसून मसलत केली जलदीनें यावें । मुळेमुठेवर पुणें गांठावें । असें कळेल श्रीमंताला हुजूर धाडावें । धाडुनियां हुजूर भाऊशीं आणिलें वाड्यांत । श्रीमंताच्या भेटी झाल्या बहु आनंदांत । तासगांव किल्ला अजब तऱ्हा

झाली रचनुका केली दक्षिणेंत । परशुरामभाऊंनीं केली चौखंडा कीर्त ॥ तासगांव० ॥ १ ॥

सवाई माधवराव भाऊशीं बोले वचन । करवीर कोल्हापूर आतां तुह्मीं घ्यावें जाऊन । तीन लाखांची खंडणी हुंडी घ्यावी उतरून । महाराजाशीं[1] कैद करावें बसवावें ठाणें । श्रीमंतांचें वचन हृदयीं धरिलें भाऊनें । आणलें जरतार पांघरूण । वस्त्रें केलीं पेशव्यानें । चालले निरोप घेऊन । सोडिलें त्या दिवशीं पुणें ॥ (चाल) ॥ मग निघालें लष्कर । केले कुचाचे नगारे । नदी उतरून झाले पार । ढाल दिली कात्रजेवर तळ पाहून । आले रहिमतपुरावर चालून । दरकुच करीत चालले कड निकडीनें । आले तासगांवाशीं केलें देवदर्शन । घेऊनियां दर्शन मग भाऊ गेले वाड्यांत । पाहून आपासाहेबास[2] भाऊंनीं केली मसलत ॥ तासगांव० ॥ २ ॥

भाऊसाहेब आपासाहेबाशीं काय बोले । सरंजाम कराया आपासाहेबांनीं पत्र लिहिलें । गांवोगांवास लिहिलीं पत्रें खासे मिळविले । सरंजाम करून डेरे राहुट्या बाहेर दिले । घेतला निरोप आपासाहेब बाहेर आले । गणपतीशीं नमन करून मग पालखींत बसले । हत्ती

१ कोल्हापुरास ह्या वेळीं शिवाजीमहाराज गादीवर होते. हे फार दयाळू, परोपकारी व सत्त्वशील होते. २ आपासाहेब हे परशुरामभाऊंचे चिरंजीव रामचंद्रपंत आपा.

कुंजर शृंगारिले । भडकं जरीपटके सोडिले । पुढें चालती कोतवाले । भगवी ढाल पुढें चाले । मग निघाले सरदार तळ नेमिला कोलापुरा । ढाल रोविली येऊनि मोर । गांवोगांवचे शिलेदार । असे जमले कीं दहा हजार । भडक सरदार । दरकुच सोडिले तव उतरले मोर । येऊनि ढाल रोविली कृष्णातीर । तें बसूनि आपासाहेबांनीं केला विचार । तोफा लावाव्या आळत्यास नका उशीर । सुभेदारासंगें तोफा दिल्या बरोबर । घेऊनियां गारदी फिरंगी गेले अळत्यावरतीं । दुहेरी लाविल्या तोफा वेढा पडला सभोंवतीं ॥ तासगांव० ॥ ३ ॥

सकाळचा दिवस प्रहरभर आला उगवून । गांवकुसवाशीं तोफा लाविल्या सुभेदार जनोबानें । खर खर खर खर लिहून पत्रें जासूद धाडून । फोडूनियां लखोटे वाचिले आपासाहेबानें । केलें सैन्य तयार सडी स्वारी संगें घेऊन । जरीपटक्याचा हत्ती बिनीवर चाले निशाण । गेले अळत्यावर चालून । हल्ला नेमिला रायानें । मारिती बाणावर बाण । शिरले वाड्यांत जाऊन । लुटली पेठ फिरंग्यानें । लुटला गांव पाहुण्यानें । केला अळत्याचा संहार । दिस होता दोन प्रहर । गेली महाराजास खबर । धनी बसले सदरेवर ॥ ( चाल ) ॥ मानकरी मिळाले थोर थोर प्रितांजी[1] चवाण । मग सरजे-

---

१ प्रीतिराव चव्हाण, सरजेराव घाटगे आणि हैबतराव गायकवाड हे शिवाजीमहाराजांच्या पदरीं मोठे शूर सरदार होते.

राव घाटगे आले चालून । बोले रत्नाकर[1] आपाजी फौज स्वाधीन । हैबतराव गायकवाड बिनी स्वाधीन । मोह-रक्याला लाविले हत्ती तक्त निशाण । महाराज निघाले इतकें सैन्य घेऊन । आले अळत्याचे जवळ । बाजीराव माने खिंडींत । दोन टोळ्या करून पुढें गेले रत्नाकरपंत ॥ तासगांव० ॥ ४ ॥

घनचकर मांडलें लागलें तोंड झुंजाचें । खणन खणन तलवार अशुद्धें वाहती रक्तार्चे । आपा साहेबांनिं उठून पाहिले लोक राजाचे । हाणा हाणा बोलती मार उडाले गोळ्याचे । स्वार भाले वारूवर सळ सोडिले फिरंगीचे ॥ ( चाल ) ॥ हैबतराव गायकवाड ओढला हत्ती निशा-णाचा । वेढा पडला फौजेचा । क्रोध चढला झुंजायाचा । गुंडाळा केला दहापांचांचा । धडा मग केला जिवाचा ॥ ( चाल ) ॥ आपा साहेब सरदार । फिरफिरून मारी तलवार । असे दहापांच केले ठार । आले सरजेराव

१ रत्नाकरपंतअप्पा हे ब्राह्मण असून कोल्हापूरकर शिवाजी राजांचे मुख्य कारमारी होते. रत्नाकरपंत हे मोठे धार्मिक, शूर; व स्वामिकार्यतत्पर होते. रत्नाकरपंतानें राज्यकारभार उत्तम प्रकारें केला; इतकेंच नाहीं, तर त्यांनीं पुष्कळ लढायांत यश मिळवून आपलें शूरत्व जाहीर केलें. अळत्याच्या लढाईत रामचंद्रअप्पाचा मोड होऊन ते पळून जात असतां रत्नाकरपंतांनी त्यांस धरून पालखींत घालून कोल्हापुरास नेलें. पुढे पट्टणकुंडी येथें लढाई झाली तींतही रत्नाकरपंतांनीं अप्रतिम शौर्य दाखविलें.

हंबीर । आपा साहेब धरावा धीर । मग जाऊन धरले कर । आणा पालखी चला लवकर घेऊन । आपासाहेब आंत बसविला सर्जेरावानें । महाराज बसले होते पाहिले त्यानें । झाली हस्तभेट दोघांची चला घेऊन । गेले कोल्हापुराशीं केलें देवदर्शन । राव राहिले महिनाभर बहु प्रीतीनें । दिले बादली पोषाख नवीं पांघरुणें । मंदिल मोत्यांचा तुरा दिला राजानें । तीन पदरी मोहनमाळ जडित कोंदण । दोन गांवें बक्षिस दिलीं हातीं निशाणें । आपा साहेबाशीं चालवा महाराज बोले त्वरीत । घालवीत चालले संगें सवाशें राऊत ॥ तासगांव० ॥ ५ ॥

इतकी खबर ऐकून मग भाऊ झाले खिन्नास[1] । कोला-पुरची माती आणून मिळवीन कृष्णेस । गांवोगांवांशीं लिहिलीं पत्रें मिळविले खासे । सरंजाम करून तळ ने-मला कुपाड्यास । आकलीवर उतरले ढाल दिली कृष्णा तिरास । खरखरखरखर लिहून पत्रें धाडिलीं मिरजेस । धनी बाळा साहेब बैसले होते सदरेस । वाचून पाहिलें जीन ठेविलें वारूस । चिंतामण रायानें हुकूम केला फौ-जेस । अंबारींत बसून राव मग आले अकलीस ॥ (चाल) ॥ फार सांगितलें भाऊस जाऊं कोल्हापुरास । आतां नाहीं पुरवत रहायास । याच प्रसंगीं घेईन यश । मान नाहीं केला शब्दास । कागद लिहिले बावास । पत्र पाहतां या

१ खिन्न; दुःखी.

अकलीस। केले कुचहुकूम ढालीस। गेले इचलकरंजीस। तिथेंच तळ पडला चार दिवस ॥ (चाल) ॥ तिथें जमाव सारा झाला। तळ उचगांवचा नेमला। ढाल दिली पंचगंगेला। त्या टेमलाईच्या माळाला। केली पेंढाऱ्यानें हल्ला। कोणी खाईना उसाला। दिले मोर्चे चौं बाजूंला। सोमवारीं नेमिली हल्ला भाऊ साहेबांनीं। मोर्चांत बसविले लोक खासे निवडून। आले महाराजांचे लोक बाहेर निघून। केली मोर्चावरती हल्ला पडले येऊन। शेंपन्नास केले जखमी गेले परतून। ह्मणे भाऊ साहेब आतां तुह्मी असा बंदोबस्त। नका करूं गडबड कोल्हापुर घेईन क्षणांत ॥ तासगांव० ॥ ६ ॥

मंगळवारचे दिवशीं भाऊंनीं केली ताकीद। गांवकुसवाशीं तोफा लाविल्या केली हिकमत। महाराजांचे लोक ते एकशूर नामांकित। स्वार झाले वारूवर आले जितीच्या वढ्यावरत। भाऊसाहेबांनीं कमर बांधिली पट्टा हातांत ॥ ( चाल ) ॥ घेतला पट्टा हातांत। गेले जितीच्या वढ्यावरत। झूंज मांडलें पटांगणांत। सूर्य झळकला गगनांत। केली फिरंग्यानें मात। घातले मोडून गांवांत। गांव मग आणिला वेजीत। लागली सल्लुयाची मसलत ॥ ( चाल ) ॥ घ्या खंडणी ह्मणून बोलले मग लखोटे लिहिले। जासुदा हातीं धाडिले। लोक रदबदलीशीं आले। तीन लाखांवर ठरविले। लोक ओलीशीं

घेतले । भाऊ माघारें परतले । मिरजेचे मुक्काम केले । भाऊ तासगांवाशीं आले । गणपतीचें दर्शन केलें । लोक नगरींचे खुशाल । कडीं तोडे बक्षिसा दिले । संक्कुपचे देश-मुख आले ॥ ( चाल ) ॥ गजदंत हत्ती दिला राव दे-सायाशीं । चौखंडामधें कीर्त सांगायाशीं । केला भाऊचा पोवाडा मिरजदेशीं । गांव कोल्हापुर ठिकाणा जागा रहिवाशी । कवि जिवाजी पांचाळ आणा ध्यानाशीं । गुरुरायाची कृपा आह्माला प्रसन्न नागनाथ । डफावर पांच निशाणें त्रिशूळ झळकत । तासगांव० ॥ ७ ॥

---

## १३. परशुरामभाऊ पटवर्धन ह्यांनीं कर्नाटकावर स्वारी केली,

### यावर पोवाडा.

चाल—दोदिवसांची तनु हे साची सुरतरसाची करुनि मजा ।
गमजा करितां मनिं उमजाना हें सुख पुढें पडेल वजा ॥

—रामजोशी.

पटवर्धनकुळीं फत्ते तलवार परशुरामभाऊची । ह्मण-वून दिलीं वस्त्रें स्वारी नेमिली कर्नाटकची ॥ ध्रुपद ॥

तक्त दक्षिणेमधिं एक शहर पुणें अजब नमुना । बाद-शाही तक्तांत रावश्रीमंत आहे नाना । नित्य हमेषा झडे चवघडा बाजे नौबत खनखना । बुद्धिवंत ते राव भले रणशूर रणीं हाटना । श्रीमंतानें हुजुर जासुदा जोडी केली

रवाना । तासगांवीं पोंचले भाऊसाहेब मुजरे घेना ॥ (चाल) ॥ लाखोटे टाकिले वाचूं लागले भले उमराव । भाऊचें चौखंडामधिं नांव । ज्यानें निशाणीं घातला घाव । मिळाली स्वारी सोडला गांव ॥ (चाल) ॥ तोफेचा भाडिमार मिळाले लहान थोर । झाला त्या दिवशीं गजर । झाला जयजयकार । श्रीमंतांशीं भेटले सांगूं लागले गोष्ट जिवींची । हुकूम रावसाहेबाला खोड मोडावी टिपूची ॥ पटवर्धन० ॥ १ ॥

दिला भरजरी पोषाग निशाण चौघडा बक्षीस हत्ती । बावन पागा त्याचेबरोबर कशी मुजरा झडती । राऊत गाडा शिपाई घोडा लढाई घेऊं ह्मणती । छत्रपतीचा भगवा झेंडा वैरी दूर पळती । जरीपटक्याशीं घेऊनि निघाले सेना गुण घेति । परशुराम अवतार भाऊला प्रसन्न गणपती ॥ (चाल) ॥ मुक्काम कृष्णातिरीं धारवाडावरी करा हल्ला । भाऊसाहेबानें चढ दिल्ला । अवघड गडबाका किल्ला । किल्लयाचे भवतालीं अमराई गर्द बसली । झाडें किरमिची ठसलीं त्याला दुरून फौज दिसली । फत्तेबुरजावरून गोळा मारितो लढाई दोघांची । टक्कर खाऊन पेठ रगडली शर्यत भाऊची ॥ पटवर्धन० ॥ २ ॥

धुमधडाका हमेष होतो किल्लया भवतालीं । तोफेच्या दणक्यानें राव कैकांचा धरसुटला । मेघश्शामबापूचा पुत्र भाऊनिशाणीं चढला । उडी घातली रणांत रणशूर हा-

टून तटून पडला । धायगुडे थोरात पांढरे लगड होते बि-
नीला । सहामहिने झुलविले किल्लेदारानें मार बसाविला ॥
( चाल ) ॥ पुढें ऐका समस्त लोटली सेना दलभार ।
देवडीजंबुऱ्याचा मार । किल्ला त्यांनीं केला जर्जर । सुटती
बाणावर बाण । कैकांचे घेतले प्राण । मुडद्यावर मुडदे
चार झाडी तोडून केलें मैदान । त्यासमयीं झाली गर्दी
दुसरी हल्लाकिल्याची । गोळे मारून केले घाबरे जोत
जरिपटक्याची ॥ पटवर्धन० ॥ ३ ॥

चवतर्फी केली हल्ला किल्लेदाराची शुद्ध हरली । फिरं-
ग्यानें तोफ डागिली फत्तेबुरजावरूनी । तिळतिळ तुकडे
उडूं लागले मग धासत पडली । रणामधिं रणशूर ते
कशी रंजक झडली ॥ ( चाल ) ॥ लाखों सेनेमधिं कधिं
सुरमर्द झांकेना । कृष्णराव बुद्धिवंत शहाणा । मारी तल-
वार हटकून प्राणा । वाजल्या तोफा दणदणा । करुणा
ईश्वराला ॥ ( चाल ) ॥ अवचित गोळा आला मस्तक
छेदूनि गेला । धड पडलें धरणीला पुत्रशोक करूनि गोष्ट
ऐकिली सरदारांची । रणांत रणशूर थोर हिम्मत है राव
दादाची ॥ पटवर्धन० ॥ ४ ॥

किल्ल्याहून तोफा होतो भडिमार । ह्या तोफखान्याची
आहे इभ्रत फार । एक गोळा नेऊन केला थंडगार ।
जोखून पाहिला पक्का बारा शेर ॥ ( चाल ) ॥ किल्लेदार
सांपडला कैद केला भाऊनें । बसविलें पेशव्याचें ठाणें ।

**हजार पांचशांचा बंद धरून । कापून काढिले पार । रक्ताचे वाहिले पुर । गेले तुंगभद्राचे पार । पुढें भारी युद्ध होणार । नारो त्रिंबकाकडे रंगेल जोडी मौजेची । खिनांत ज्यानें खोड मोडली सिद्याभवान्याची ॥ पट० ॥५॥**

---

## १४. चिंतामणराव ऊर्फ अप्पासाहेब पटवर्धन सांगलीकर, यांवर पोवाडा.

चिंतामणराव ऊर्फ अप्पासाहेब पटवर्धन हे पेशव्यांचे प्रसिद्ध सरदार गोविंद हरी पटवर्धन ह्यांचे पौत्र. हे शूर असून खर्ड्याच्या लढाईंत प्रसिद्धीस आले. पेशवाई नष्ट झाल्यावरही बरींच वर्षें हे हयात होते.

हा पोवाडा आनंदफंदीकृत आहे. आनंदफंदी हे सांगली, मिरज वगैरे दक्षिण महाराष्ट्र देशांतील शहरें पहावयास गेले होते, त्या वेळेसच हा पोवाडा त्यांनीं रचिला असावा.

पिराजी संतोबा गोंधळी हा सांगलीकरांचा आश्रित याजकडून हा पोवाडा मिळाला.

**चाल**—कटावाची.

**वसविली सांगली । चिंतामणरायें चांगली ॥ ध्रुपद ॥**

**सर्वांचा मुकुटमणी । मुख्य पटवर्धन चिंतामणि । कर्ममार्गामाजी सुलक्षणी । सर्व यजमानची मनास आणी । वचन जें निघेल तोंडांतुनि । करावें मान्य सर्वत्रांनीं । दौलतीचा खांब मुख्य स्थानीं । आज्ञा त्याची कोण न**

मानी । किल्ला सांगली राजधानी । प्रजा उभी जोडुनि द्वयपाणी । ज्याला जितुकें पाजतील पाणी । त्याला पिणें प्राप्त मुक्यांनीं । लौकिक ज्याचा जगत्र वानी । शिपाई मूळचे पुण्य प्राणी । गजानन ज्याचा पक्ष धरोनि । करीत संरक्षण संतोष मानी । कानीं नित्य पडावें गानीं । गायन करिती महा महा गुणी । विणे पखवाज कितीक कोण गणीं । कुशल जात्या ममतेशील धनी । न लागे जेथें किंचित पाणी । तेथें प्रभु यत्किंचित खणी । पाणीच पाणी रानोरानीं । किल्ल्याची कीर्ति नग वाखाणी । चुंबीत गगन मनोरे गगनीं । कोठांत कोठ बाहेरूनि । सभोंता खंदक मग रेवणी । वेष्टिला वरूनि चिल्हारीनीं । चहूंकडे कीर्ति फांकली ॥ वसविली सांगली० ॥ १ ॥

भक्ति गजाननाची भारी । तो मोरेश्वर देतो उभारी । चिंतामणी सर्वांला तारी । जेथें बिघडेल तेथें सवारी । चिंतामणीची चिंता वारी । धर्मिष्ठ अधर्मास धिःकारी । पटवर्धन जाणती संसारी । घालिती उड्याच जैशा घारी । फत्ते केल्याविण माघारी । उलटों नयेची मारी मारी । म्हणावें हेच मनांत खुमारी । ऐसे थोडे पुरुष अवतारी । वडिला वडिलीं नामधारी । सप्त पिढ्या लौकिक उद्धारी । वृत्तिधर्मा जागली ॥ वसविली सांगली० ॥ २ ॥

खेरीज बाहेर पुरे वसविले । एकाहुन एक सरे । बंदोबस्ती गस्ती पाहारे । लोक सुखवस्ती बांधूनि घरें ।

राहती स्वस्थ नांदती बरें। कौल सर्वांला ताकीद फिरे। धन्याची आज्ञा नांदा कींरे। शिवालय देवालय सुंदरे। घाट बांधूनिया कृष्णातिरे। आत भरचक्का चुनार चिरे। कृपा केली श्रीमोरेश्वरें। पुण्य सामुग्री भागली ॥ वसविली सांगली० ॥ ३ ॥

शेंकडों चारी दुकानदार। जोहोरी बोहोरी शेट सावकार। बनविला बाग चांगला फार। रुमाली रस्ते बांधुन चार। आंत मांडव द्राक्षांचे गार। सुरूचीं झाडें मनोहर। फुलें हरजिनशी अपरंपार। पाचदवणा मरवा कचनार। गुलाब चमेली गुले अनार। मोतिया मोगऱ्याचे हार। सोनचाफे मकरंद बाहार। गणित करतांना वाटेल फार। ह्मणूनि सांगितले सारासार। आंत उमराव जुने सरदार। अश्वरथ गाड्या कुंजर बहार। पालख्या शिवाय घोडेस्वार। तलावे देती चक्राकार। दुपेट शेले भरीजरतार। एकापरीस एक दवलतदार। भले लोक संग्रहीं धनदार। पुण्य त्या चिंतामणीचें सारें। मुख्य सर्वांला तोच आधार। दान धर्माला बहुत उदार। आल्या गेल्याचा आधीं सत्कार। कल्पना बुद्धीचें भांडार। न लागे ज्याचा अंत ना पार। पाहिलें ही एक राजद्वार। विवेकी विचार सारासार। कविता आनंदफंदी करी। ताल सुर नमुदा लागली ॥ वसविली सांगली० ॥ ४ ॥

---

## १५. याच विषयावर दुसरा पोवाडा.

चाल—आला हो वनवास पती गेला नवतीचा गडे चाहणारा ।
आतां समजलें राजा भर्तृहरी भरतपूरचा राहणारा ॥

द्वापारयुगीं गोकुळामध्यें कृष्णदेव धनी अवतारी । तद्न्याय सांगलींत कलीमध्यें आहेत चिंतामणराव बहिरी ॥ ध्रुपद ॥

जरब व्याघ्रगणअवतारीं आपासाहेब शूरमर्द भले । कानीं प्राणीमात्रांच्या छप्पन देशांमध्यें कीर्ति झुले । शाण्णव कुळीं राज्यामधीं क्षेत्रीं पटवर्धन बाके ठरले । चिंतामणरावसाहेबाचे शत्रूंवर डंके गर्जले । फणसळकर पांढरे कवडे धोंडजी वाघ ज्यानें खपवले । दिल्लीअटकेपर्यंत जरब चिंतामणराव सांगलीवाले । चला अशी सांगली आहे चांगली कृष्णातिरीं द्वारका वसविली । घाटघाट कृष्णातिरीं बसले वक्रतुंड पहा गजानन । देवादिदेव करी सर्वत्रांच्या पीडा हरण । अष्टौ प्रहर पहा वाद्यें वाजती झडती नगारखाने कालुकर्णें । अशी सांगली आहे चांगली गरीबाशीं शीतळ सावली । कृष्णातिरीं द्वारका वसविली । द्वापारयुगीं गोकुळामध्यें कृष्णदेव धनी अवतारी ॥ तद्न्याय० ॥ १ ॥

। हरामाचा कसबी प्राणी चालून येतो सांगलीला । कसमाची पारख करील चिंतामणराव मोतीवाला । सुगडपणाचा भाल होउनि रवाना होती त्याला । चहूं

खुंटामध्यें खुंट सांगली आसरा कसबी लोकांला। अठाराही कारखाने झुलती जपून नाहीं पैशाला। शके सत्राशेंवीसमध्यें काम लाविलें किल्ल्याला। नजर पहाणी विश्वासानें गणेश बुरजाची छाव न्यारी। द्वापारयुगीं गोकुळामध्यें कृष्णदेव धनी अवतारी॥ तदन्याय० ॥ २॥

बागबगीचे बंगले नामी, ठाईं ठाईं बैठकी सिरा। खासा बाग अमराई गारमळा ताडमाड आहे सुरूबरा। ठायीं ठायीं अश्वाच्या पागा एकापक्षीं एक तेजी खरा। गजदंत शाम सुंदर हत्तीवर भरगच्चीच्या झालरा। कामदार इतर मंडळीचे वर विश्वास सारा। फडनीस बुद्धिमान चांगले लिहिल्या मध्यें बहुसिरा। बापु साहेब शाहापूरकराचा फिरता सुभा आहे न्यारा। गोविंदराव बिनीवाला तो शत्रूचा फिरवी मोहरा। अशी मंडळी उघड पदरीं आपापल्या हुद्यावरी। हुशारीनें करितात चाकरी। हुशारीचे पोटीं बीन फिकीरी तेथें आहे लक्ष्मी खरी। द्वापारयुगीं गोकुळामध्यें कृष्णदेव धनी अवतारी॥ तदन्याय० ॥ ३॥

भले लोक शिलेदार बारगीर एकापेक्षां एक रणदुले। हासमजीलिबजरांत बाणदार चोपदार शाहींत झुले। शिवाय संत्री लोक आला दे विजार सजीन टोपीवाले। जासूद झेंडेवाले अंकुश गणपति शिक्केवर जडले। गजानन कुलस्वामी गणपति प्रसन्न सर्वांला झाले। तात्या

साहेब प्रभु जन्मतां दुप्पटीचें बळ नवें आलें । अशी खुश्मली सर्वत्रांला । पुण्याई पहा आली कामाला । जाफर नरसु कवि बोलला । थोडासा पोवाडा गाईला । कासम विठु दाजी रामाजी केली धन्याची स्तुति खरी । शके सत्राशें बाहात्तर श्रावण माशीं शुक्रवारीं । द्वापारयुगीं गोकुळामध्यें कृष्णदेव धनी अवतारी ॥ तदन्याय० ॥ ४ ॥

---

## १६. थोरले बाळासाहेब पटवर्धन मिरजकर, यांवर पोवाडा.

हा पोवाडा आनंदफंदीकृत असून आह्मांस धोंडी संतोबा गोंधळी याजकडून मिळाला. संतोबा गोंधळी हयात असतां आनंदफंदी हे मिरज सांगली या प्रांतांत गेले होते. त्याच वेळीं हा पोवाडा केला आहे.

चाल—कुंकु कपाळीं शोभत नाहीं रत्नागिरीच्या जोतिबा ।
माझें रूप स्वरूप पारखें झाला आहे तोबा तोबा ॥

प्रतापी बाळासाहेब पुण्यश्लोक मुखीं सर्वत्रांच्या । हेंचि ऐकण्यांत आलें बहुधा कानीं प्राणिमात्रांच्या ॥ध्रु०॥

मोठ्या परि मोठ्याशीं भाषणें लहान्याशीं बोलुनें बरें । जिकून बसविले तिकून साजिरे अष्टपैलू चौकून चिरे । दयावंत बुद्धिवंत चतुर साधारण वचनाचे खरे । रयतेचे कनवाळु सभोंतें गजाननाचें चक्र फिरे । आल्याचा सत्कार करिती भेटी घेती सत्पात्राच्या ॥ प्रतापी० ॥ १ ॥

समोंताला खंदक किल्ल्यामधेंच उंट घोडे हत्ती। झडत असे चवघडा पदरचे भले लोक त्यांतच राहती। बाग-बगीचे नानापरीचे हवा लहान मोठे पाहती। शिवाय आणखी घाट बांधिला दक्षिणेस कृष्णा वाहती। लोक-वस्तीची कीर्ति वाखाणती गोविंदपुत्राच्या॥ प्रतापी०॥२॥

मुख्य दैवत समनापीर दैवत जागृत वस्तीचा वाली। तेथें उपद्रव होउं न शके पीर मिरजेचा रखवाली। तशांत शूर पटवर्धन बाके कीर्ति जगन्यांत झाली। भयाभीत जो होऊनि आला त्याला पाठीशीं घाली। तृणप्राय परशत्रु जैसा उभ्या बाहुल्या चित्राच्या॥ प्रतापी० ॥ ३ ॥

वस्ती अति गुलजार फार बाजार भरे बृहस्पतवारीं। शनवारामध्यें चौक तेथें जोहारी बोहरी। व्यापारी राफा-चारी तमाम इमाम रस्त्या शेजारीं। उदमाची धडामोड होतसे बजान पट्टेकट्यारी। आनंदफंदीचे छंद जखमा जशा जिव्हारी शस्त्राच्या॥ प्रतापी० ॥ ४ ॥

---

## १७. आनंदराव धुळप, यांवर पोवाडा.

आंग्र्याप्रमाणेंच धुळप हे मराठ्यांच्या आरमाराचे मुख्य सरदार होते. सवाई माधवरावांच्या कारकीर्दींत वाघापूर मुक्कामीं इंग्रजांची व आनंदराव धुळपांची एक लहानशी लढाई झाली. ह्या प्रसंगाचें वर्णन पुढील पोवाड्यांत केलें आहे.

ह्या पोवाडा मिकुबाळा नांवाच्या कवीनें पुणें मुक्कामीं रचिला.

चाल—हा फंदी फांकडा मज सांपडला गुंडा ।
चालूंदे प्रीत शेवटा देवा मार्तंडा ॥

धोशा धुळपाचा अति आनंदराव रणशूर । मारिला + + + + ॥ ध्रुपद ॥

फाल्गून मासीं राव निघाले बाहेर । पाले गुलाब त्यांनीं सजवुनियां आरमार । ओढिले नांगर पुढें जायाचा करार । राहिलें वारें केला मुक्काम वाघापुर । दुसऱ्या दिवशीं आलें इंग्रजांचें आरमार । सत्तावीस मनोरे भरोनी वाहे भरपूर । अभिमान भारी इंग्रजांस अहंता फार । रामचंद्रांनीं वधिला दशशीर[3] ॥ १ ॥

बाहिर सावध होया आहेत राहत्यारे राज्याची । लावली नाळ केली हंकारणी पालाची । जलदी केली भर उमेद लढायाची । अडकलें तारूं फिरंगी रयत कोणाची । हिरे हिरे मारून सोई धरिली किनाऱ्याची । दया संपूर्ण धुळपावर रामलिंगाची । पुढें शाहुचा जरीपटका विनीवर । उडविला चांचा त्यानें ओढुनि केलें दीनमोर ॥ २ ॥

विलायत जंजीरा नवकुलपांचें तारूं । शिरीं हात ठेवून पाठविला दक्षण वारू । घेतली गुजराथ वसई केली जेरू । लढुनि शिंद्याशीं पाडाव केले डेरू । कपींद्र भारी नऊ पालखीचे सरदारू । राव धुळपांनीं त्यांना मारून केलें जेरू ॥ ३ ॥

---

१ कीर्ति. २ गलबतांचीं नांवें. ३ रावण.

मसलत होती हैदरावर जायाची । बोट ओढती सातशें गारदी त्याची । रामप्रसाद आहे गुरूब चालीची । लक्ष्मण धुळप ऐके न गोष्ट कोणाची । सोडिले मचवे लोक चढती काठीवर । राव ते मोठे बुद्धीवंत सरदार । दांतीं तृण धरुनी उडी टाकिती बाहेर ॥ ४ ॥

इंग्रजांला धास्ती नव्हती कधीं काळाची । अवचित गांठ पडली आनंदराव धुळपाची । नदी वाहते वाहते हो अशुद्धांची[2] । तीन साठ शिरें उडविलीं त्यानें + + + । + + + + + । घायाळ मुर्दे घुमति राव फार ॥ ५ ॥

रत्नागिरीचे कागद पुण्याला गेले । रावसाहेब वाचुनि खुशाल झाले । सांगे श्रीमंताला धुळपांनीं नांवाचे नक्षे केले । सत्तावीस गोरे धरुनि त्यानें आणीले । अठ्ठावीस गोरे धरुनि त्यानें कापीले । डफ झांज वाजताती चावडीवर । पोवाडा केला पुण्यामध्यें बसूनी । पोवाडा केला भिक्या बाळा यांनीं ॥ ६ ॥

---

## १८. परशुरामपंत प्रतिनिधी,

### यांवर पोवाडा.

परशुरामपंत प्रतिनिधी हे प्रसिद्ध भवानराव प्रतिंनिधींचे चिरंजीव. सन १७७७ त भवानराव निवर्तले व त्यांच्या मरणाच्या

---

१ गलबताचें नांव. २ रक्ताची.

दुसऱ्याच दिवशीं परशुरामपंत ह्यांचा जन्म झाला. नाना फडनवीस व भवानराव प्रतिनिधी ह्यांचें फार सख्य होतें, व त्यामुळें नानांनीं आपल्या स्नेह्याच्या मुलास तो पाळण्यांत असतांच अधिकाराचीं वस्त्रें देवविलीं. सन १७९५ त ह्मणजे आपल्या वयाच्या अठराव्या वर्षीं परशुरामपंत आपल्या जहागिरीचा स्वतः कारभार पाहूं लागले. हे शरीरानें सुदृढ असून आपल्या तीर्थरूपांप्रमाणेंच शूर होते. सन १८४८ त परशुरामपंत निर्वतले. हा पोवाडा दाऊ बहुरूपी ह्यानें केला, असें पोवाड्याच्या शेवटल्या चरणावरून समजतें.

**चाल**—शिपाई चाकरी गेले नागपुराला ।
तेली वाणी उदमी डाली बांधूं लागला ॥

बालस्वरूप अगम्य रूप परशुरामपंत । प्रत्यक्ष परशुराम अवतार भवानरायाचे पुत्र ॥ ध्रुपद ॥ भवानराव काशीबाई पुजला ईश्वर पुत्र आले पोटांत । बत्तीस लक्षणी चतुर पुत्र पाहून सामुद्रिक केवळ राम अवतार। जगदंबा प्रसन्न चालविती राज्यभार । जसा गोकुळामध्यें वाढला पहा कृष्णनाथ । इंद्रपुरीमधें राजा राज्य करितां इंद्रजीत ॥ बालस्वरूप० ॥ १ ॥

काशीबाई यमुनाताई दोघी बहिणी जाणा । दोघी-पोटीं एक बालक दुसरा वांचेना । विसावा होऊं न देई जें बालक पितांना । पाळण्यांत घालुनि हालविती माता यमूना । रुप्याचे लावुनि सोटे चौरंग दोरी हातांत । गणेशपंत दिवाण पाळणा केला एका क्षणांत ॥ बालस्वरूप० ॥ २ ॥

मावशीबाई नांव सवाई बहुकीर्त केली । पंताचे मार्गे जाहागीर ठासून राखिली । पेशवे श्रीमंत नाहीं त्याला भ्याले । एक जिल्हेचे धनी कुलकानु कशी आपली । देणें महाराजाचें कुणाचें चालून नाहीं येत । जोंवर चंद्र सूर्य तोंवर राज्य करितील पंत ॥ बालस्वरूप० ॥ ३ ॥

पंत बसले सदरेशीं मनसुबा करितील लहानथोर । चिंतोपंत फडनीस कारभारी धुरंधर । आबाराव सुगदेव कुलकानुशीं अखत्यार । मोरोपंतभाऊ आहे तयावर प्यार । जिवाजीपंत गडबड भारी बोले रागांत । भिवराव सुभेदार ऐका बोलण्याची मात ॥ बालस्वरूप० ॥४॥

मंगळवारीं निघाली स्वारी रायापंताची । पालखींत बसली जशी काय मूर्त वामनाची । शिरीं पहातां शोभे मांदिल प्रभा सूर्याची । जसा अस्मानीं तारा चमकला जोत चंद्राची । भालदार चोपदार लोक चालती जिलिबींत । दाऊ बहुरूपी कवींश्वर दक्षिण देशांत ॥ बालस्वरूप० ॥५॥

---

## १९. फलटणचे निंबाळकर,

### यांवर पोवाडा.

ह्या पोवाड्यांत मुधोजीराव व त्यांची पत्नी सगुणाबाई ह्यांचें व त्यांच्यानंतर फलटणच्या गादीवर बसलेल्या निंबाळकरांचें वर्णन केलें आहे. मुधोजीराव हे जानोजी निंबाळकरांचे चिरंजीव. ह्यांस

सन १७४८त फलटण संस्थानचा अधिकार मिळाला. सन १७६५त मुधोजीराव निवर्तले. ह्यांच्या मरणानंतर कांहीं काळपर्यंत त्यांची पत्नी सगुणाबाई ह्यांनीं कारभार चालविला. परंतु पुढें थोरले माधवराव पेशवे व सगुणाबाई ह्यांचें वैमनस्य पडल्यामुळें माधवरावांनीं सगुणाबाईच्या हातांतून अधिकार काढून सोहिराजी नांवाच्या मराठ्यास संस्थानचा सर्व अधिकार दिला. सन १७७४ त सगुणाबाईंनीं मालोजी नांवाचा पुत्र दत्तक घेतला व पुढें थोड्याच दिवसांनीं सवाई माधवराव पेशवे ह्यांनीं फलटण संस्थानचा कारभार सगुणाबाईच्या हवालीं केला. सन १७७७ त मालोजी मरण पावले व त्यांचे दत्तक चिरंजीव जानराव ह्यांस अधिकार मिळाला. सन १८२५ त जानराव मरण पावल्यावर सातारच्या छत्रपतींनीं संस्थान जप्त केलें. परंतु पुढें इंग्रज सरकारच्या मध्यस्थीनें बनाजी निंबाळकर ह्यांस सन १८२७ त फलटण संस्थानचा अधिकार मिळाला. बनाजी हे ९ महिने कारभार करून सन १८२८ त मे महिन्याच्या १७ व्या तारखेस निवर्तले. पुढें सातारकरमहाराजांनीं हें संस्थान पुनः जप्त केलें. सन १८४१ त बनाजीची पत्नी जीजीबाई आईसाहेब ह्यांनीं सातारकरांस तीस हजार रुपये नजराणा दिल्यावर संस्थान परत मिळून, त्यांस मुधोजीराव नांवाच्या मुलास दत्तक घेण्याची परवानगी मिळाली. हे मुधोजीराव ऊर्फ बापुसाहेब हल्लीं संस्थानचे अधिकारी आहेत.

हा पोवाडा विकनदास हैबती व आपा सवाई ह्यांनीं केला असें पोवाड्याच्या शेवटल्या चरणांवरून समजतें

**चाल**—ब्राह्मणी राज्य जोरदार घोड्यावर स्वार होते शिपाई ।
जबरदस्ती कैकांनीं पाहिली शत्रु ठेविले नाहीं ॥

—**रामजोशी.**

**काय हो मुंडे बादशाहा चौऱ्यांशीला[1] शीतळ छाया ।
चौराज्यांमधीं महशूर झेंडा लाविला भडकाया ॥ ध्रुपद ॥**

**ओंदी[2] उमराव शहर फलटणचे आहेत संस्थानी । जाहगिरी सरदेशमुखी सनदा दिल्या बादशाहांनीं । माई मोर्तब शिक्के कटार मुतलक निशाणी । पोषाग मोरचेल चवघडे बक्षीस रविवार दिन मानी । वंशपरंपर राज्य करावें कमाल मेहेरबानी । ऐसी अगाध झाली देणगी प्रसन्न चक्रपाणी । राज्य एक छत्री चालत आलें या ठायां ॥ १ ॥**

**मोठे प्रतापी मुधोजी साहेब होते प्रभुराज । झाले कैलासवासी चौऱ्यांशीचे सीरताज । राज्याला अधिकारी सगुणाबाई धनी साजे । सोहिराजी[3] साहेबांनीं घेतलें जबरीनें राज्य । सगुणाबाई ह्मणे रामा तुला माझी लाज । बालेघाटी तीर्थ डोकीस गेलें काम काज । झाला हुकूम वकिलाशीं जावें बोलाया ॥ २ ॥**

**आज्ञा वंदुन वकील पुण्याशीं गेले लवलाहीं । श्रीमंताशीं केली विनंती धनी पेशवाई । नानाफडनवीस ह्मणे**

---

१ चौऱ्याशीं परगणे. २ मराठे सरदारांत निंबाळकर फार जुने अशी कीर्ति आहे. ३ सन १७६५ त सोहिराजीनें माधवराव बल्लाळ पेशव्यांच्या मदतीनें सगुणाबाईस पदच्युत करून आपण राज्य बळकाविलें.

वहीण सगुणाबाई । स्वार गारदी कुमक दिली ...दा व शीपाई । आंबारीमधें बसून बयानें केली लढाई । सोयराजी साहेबास हटविलें फिरविली द्वाही । काय शर्तीनें राज्य चालविलें नलगे पुसाया ॥ ३ ॥

राज्य करिती सगुणाबाई देव अवतार । सुदाम पुरी पेठ कौलाची भरला बाजार । थोर थोर उदमी गुजर मारवाडी सावकार । लाखों रुपयांची घडामोड होती करती व्यापार । आनंदामधें प्रजा निंबाळकर करितो दर- बार । कोण्या गोष्टीची ददात नाहीं सुख फार फार । अशी कीर्ति झाली जगन्यामधें वर्णाया ॥ ४ ॥

अयोध्येहून गोऊन वचनीं आणिले सीतापती । शिवा- लय बांधिलें ओवऱ्याचौभोंवतीं । द्वारीं उभे जय विजय पुढें गरुड मारुती । ठाईं ठाईं केली कीर्त सगुणाबाई जितसती । काशीयात्रा करून गयावळ तीर्थ भागीरथी । रामेश्वराला बेल दवणा वाहून निश्चिती । चंदीचंदा- वरीचा तो राजा आला भेटाया । हत्ती घोडे नजर आ- णिली वाहिले रघुराया ॥ ५ ॥

रामचंद्राचा उत्साह होतो कीर्तन हरोहरी । पांच दिवस वहनावरतीं निघती ही स्वारी । सहावे दिवसीं रथ निघतो जनयात्रा भारी । अमीर उमराव भले भले सरदार लखसेना सारी । मारुतीकडे बाजार भरतो करिती दुकान-

दारी । देशोदेशींचा माल किराणा येती व्यापारी । खरेदी हर जिनसाची बसले विकाया ॥ चौऱ्यांश- मधीं० ॥ ६ ॥

पुण्यप्रतापी सगुणाबाई महशूर अवघ्यांला । काय शर्तिनें राज्य चालविलें खुप लौकिक केला । जाते वेळीं जानरायाचे शिरीं हात ठेविला । आमच्यामागें राज्य चालवा संभाळ रयतेला । जानराव प्रभु लहान या मालक गादीला । छत्तीस वर्षें राज्य केलें डंका वाजवीला । आनंदामध्यें प्रजा लाविली सुख भोगाया ॥ ७ ॥

फाल्गुन शुद्ध नवमीस होता शुक्रवार । जानरायाशीं आले बलाऊं[1] सत्य करार । रामचंद्र ह्मणून ठेविला देह झाले पार । लाल हरपला शहरामधीं पडला अंधकार । झाला आकांत बाईसाहेब तोडी शृंगार । हत्ती घोडे गाईवत्स हंबरती फार । स्वारी करून चालिले अलम मोकलती धाय ॥ ८ ॥

झाली घावरी बाईसाहेब बोले मंजूळवाणी । कोण आह्माला मालक आह्मी तर पडलों अडाणी । आमचे जन्माचा जोडा गेला गेली निशाणी । जहाज बुडवीलें दर्यामधीं कसें भगवंतानीं । आमचे कपाळचें कुंकुं पूसलें काय रामचंद्रानीं । तुमचे मनाला आलें कायहो

1 स्वर्गीनें बोलावणें आलें.

चक्रपाणी । सातारकर महाराजांनीं बेत केला दौलत राखाया ॥ ९ ॥

बाईसाहेब जाऊन राहिल्या माहुली तीर्थाशीं । तीन वर्षें तेथें राहून तेथून गेल्या पुण्याशीं । बजाजीसाहेब झटूं लागले कायहो राज्याशीं । आलफीष्टन साहेबाची चकदी आली महाराजाशीं । बोलावून बेजाजी[1] साहेब दिलीं वस्त्रें त्याशीं । नऊ महिने राज्य केलें रयत उदासी । जाऊन फिर्यादी हुजूर पडल्या नलगे पुसाया ॥ १० ॥

बाईसाहेबाचे वकील सूज्ञ होते बोलण्यांत जाब भाब करीत होते राज दरबारांत । बजाजीसाहेबांशीं कील काय बोलतात । अकरा कलमें बाईसाहेबांचे रहावें हुकुमांत । याप्रमाणें तुह्मीं याद द्यावी सरकारांत । दौलत राख बुडवूं नका समजावें मनांत । नाहीं ऐकिलें केला गर्व गेला तो वायां ॥ ११ ॥

पाहून संधी वकील विनंती करी महाराजास । राखा निंबाळकरी बाणा मानकरी खासे । महाराजांनीं याद पाठविली बरी विलायतेस । कोडत होऊन इनसाफ झाला केला कयास । आली चकदी बादशाहाचें देणें निंबाळकरास । झाला हुकुम राज्य द्यावें बाईसाहेबास । महाराज ह्मणे पाठवावें बाईस आणाया ॥ १२ ॥

---

१ क्यांबेलसाहेबांचें ग्याझेटीअर पुस्तक १९ पृष्ठ ६२० मध्यें हें नांव धनाजी असें दिलें आहे.

काम काज पाहती रावसाहेब मुख्य कारभारी । नाना-साहेब खासगीवाले कूल अखत्यार । साहेब खान रीसाल-दार हुकूम सरकारी । रावजी देशमूख तात्या कोकणे न्यायनीसदारी । चौऱ्यांशीचे ताळेबंद जमाबंदी सारी । शाहा मनसूरचे दास बिकन हैबती लागे पायां । आ[illegible] सवाई हागे असूं द्या कृपेची छाया ॥ कायहो मुंडे [illegible] शाहा० ॥ १३ ॥

---